# राजर्षी छत्रपती शाहू

(राजर्षी शाहू छत्रपतींच्या भाषणांचा
टीका-टिप्पणीसह चिकित्सक अभ्यास)

संपादक
डॉ. एस. एस. भोसले



आवृत्ती पहिली, १९७५

संपादक : डॉ. एस्. एस्. भोसले

प्रकाशक : कोल्हापूर जिल्हा परिषद, कोल्हापूर

सुधारित आवृत्ती, नोव्हेंबर, १९९१

प्रकाशक

सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई : ४०० ०३२



मुद्रक

श्री. व्यंकटेश प्रिंटिंग प्रेस
२४०२/६, 'ए,' वरुणतीर्थ वेस,
कोल्हापूर : ४१६ ००२

मूल्य : रुपये रु. ४५ फक्त



पुण्यश्लोक जिजामाता,

करवीर राज्य संस्थापिका
छत्रपती ताराबाई

आणि

ध्येयवादी सहधर्मचारिणी
सावित्रीबाई फुले

यांच्या स्मृतीस



# निवेदन

आधुनिक काळात महाराष्ट्राची जडणघडण करणाऱ्या महान नेत्यांमध्ये कोल्हापूरचे राजर्षी शा  छत्रपती यांचे स्थान वैशिष्टयपूर्ण आहे. एकोणिसाव्या शतकात महात्मा जोतीराव फुले यांनी स्वाभिमानाचे व समतेचे बी पेरुन जे झाड लावले त्याला खतपाणी घालून काळजीपूर्वक वाढविले ते शाहू छत्रपतींनी. या झाडाला कर्मवीर भाऊराव पाटील, केशवराव जेधे, डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या कर्तृत्वाच्या रुपाने पुढील काळात नवनवीन धुमारे फुटले शेकडो वर्षे जे ज्ञान, सत्ता, संपत्ती यापासून वंचित राहिले त्यांना माणूस म्हणून स्वाभिमानाने जगता यावे, शिकता यावे आणि विकासाच्या वाटा खुल्या व्हाव्यात असा शाहू छत्रपतींनी आयुष्यभर ध्यास घेतला होता. राजकीय स्वराज्य मिळविण्याचा प्रश्न त्यांना गौण वाटला. सामाजिक व धार्मिक समतेची प्रस्थापना करण्याच्या प्रश्नाला त्यांनी नेहमीच अग्रक्रम दिला.

विविध संस्थांच्या वतीने आयोजित करण्यात आलेल्या सभा-समारंभात कधी अध्यक्ष म्हणून तर कधी उद्घाटक किंवा मुख्य पाहुणे म्हणून शाहू महाराजांनी जी भाषणें केली त्याचे संग्रह अनेक वर्षापूर्वी प्रसिद्ध झाले होते. मात्र जसजसा काळ लोटतो तसतसे या भाषणांचे संदर्भ पुढील पिढयांना समजावून घेणे अवघड होत जाते. अशा स्थितीत कोणी ही भाषणे टिपा–टिप्पणीसह चिकित्सक वृत्तीने प्रसिद्ध केली तर नव्या पिढीच्या वाचकांची व अभ्यासकांची सोय होते. महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाच्या वतीने महाराष्ट्रातील परिवर्तनवादी चळवळींचे एक साक्षेपी अभ्यासक डॉ. एस्. एस्. भोसले यांनी राजर्षी शाहू छत्रपतींच्या भाषणांचा टिपा–टिप्पणीसह केलेला हा चिकित्सक अभ्यास वाचकांना उपयुक्त वाटेल असा विश्वास वाटतो.

**य. दि. फडके**
अध्यक्ष,
महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ

मुंबई :
८ जानेवारी, १९९१

# पहिल्या आवृत्तीची प्रस्तावना

खरे सांगायचे म्हणजे ही प्रस्तावना लिहिताना माझ्या मनाला फार संकोच वाटत आहे. थोर राष्ट्रपुरूष राजर्षी शाहू छत्रपती यांच्या भाषणांच्या संग्रहाला प्रस्तावनेची मुळी गरजच काय ? या भाषणांतून व्यक्त झालेले त्यांचे विचार इतके स्पष्ट, इतके बोलके आणि इतके परखड आहेत की, त्यांचा परिचय इतर कुणीही करून देण्याची मुळी आवश्यकताच नाही आणि अशी आवश्यकता आहे असे घटकाभर गृहीत धरले तरी तो प्रस्तावना लिहायची कोणी ? माझ्यासारख्या अकिंचित्कर व्यक्तीने ? मनाला पटत नाही. थोर पुरूषांच्या कृतीचे गुणगान करायलाही थोर व्यक्तीच हव्यात. ‘स्तवार्थ तुझिया तुझ्यासम कवी कधी जन्मती ?’ असे मोरोपंतांनी म्हटले नाही का ? आणि असे असूनही ही प्रस्तावना लिहिण्याला मी उद्युक्त झालो, हे माझे धाष्टर्य होय आणि त्यामुळेच मनाला फार संकोच वाटतो, हे प्रामाणिकपणे नमूद करणे अवश्य आहे.

श्री. बाळासाहेब माने यांनी ही प्रस्तावना लिहिण्याचा मला जवळजवळ आदेशच दिला. माझ्या पूर्वसंमतीची वाटही न पाहता, दोनचार दिवसात प्रस्तावना लिहून पाठविण्याची त्यांनी मला आज्ञा केली आणि तरीही प्रस्तावना लिहिण्यासाठी मन तयार होत नव्हते. पण डॉ. एस्. एस्. भोसले यांनी संपादन केलेल्या राजर्षींच्या भाषणांचा हा संग्रह जेव्हा मी चाळू लागलो तेव्हा माझे लक्ष त्यातील पहिल्याच भाषणाकडे गेले. राजर्षींचे हे पहिले भाषण आहे असे नाही, तर या संग्रहात छापलेले ते पहिले भाषण आहे आणि ते राजर्षींनी अखिल भारतीय मराठा परिषदेच्या अकराव्या अधिवेशनप्रसंगी खामगाव येथे १९१७ च्या शेवटच्या महिन्यात केलेले आहे.

‘खामगाव’ हा तळटीपेतील शब्द वाचताच माझ्या पूर्वस्मृती जागृत झाल्या. माझे हायस्कूलचे शिक्षण खामगाव येथेच झालेले. या शिक्षणासाठी मी मलकापूर सोडून खामगाव येथे गेलो तो १९२२ च्या जुलैमध्ये, म्हणजे राजर्षींनी खामगाव शहराला भेट दिल्यानतर साडेचार वर्षांनी. त्यांच्या भेटीला साडेचार वर्षे उलटलेली असली तरी त्यांच्या त्यावेळच्या भाषणाचे डिंडिम तेथे अजून वाजत होते. त्या भाषणातील क्रांतिसूक्तांचे पडसाद वातावरणात निनादत होते. बहुजन समाजातील अनेक पुढारी खेड्यापाड्यांतून फिरुन जोतिबा फुले व राजर्षी शाहू छत्रपती

यांचा संदेश जनतेत पसरवीत होते. त्या निमित्ताने, राजर्षींच्याच शिकवणुकीखाली तयार झालेले श्री. पंढरीनाथ पाटील गावोगावी जलसे करीत होते. त्याचे निनाद आमच्या कानावर येत होते. या सर्व वातावरणाचे संस्कार माझ्या मनावर झाल्याशिवाय कसे राहतील ? या संस्कारांमुळे मला एक नवीन दृष्टी आली. भोवताली घडणाऱ्या घटनांचा अर्थ एका विशिष्ट दृष्टीने लावण्याची जाण माझ्या मनात विकसित होऊ लागली.

याचे एक उदाहरण अजूनही स्पष्टपणे माझ्या डोळ्यासमोर आहे : मी व माझे सहाध्यायी खामगावच्या सरकारी शाळेच्या वसतिगृहात राहात होतो. या वसतिगृहाच्या आवारात मागील बाजूला भोजनालय होते. भोजनालयाच्या दोन्ही बाजूंना सारख्याच आकाराचे दोन हॉल होते व मधे स्वयंपाकघर होते. या हॉलमध्ये भोजनाला बसण्या–साठी विद्यार्थ्यांची विभागणी कशी केली असेल असे वाटते ? स्वयंपाकघराच्या एका बाजूच्या हॉलमध्ये फक्त ब्राह्मण विद्यार्थी आणि दुसऱ्या बाजूच्या हॉलमध्ये बाकी सर्व, म्हणजे मराठे, कुणबी, तेली, इतकेच नव्हे तर मुसलमान सुद्धा ! ब्राह्मण विद्यार्थी ज्या हॉलमध्ये बसत तो अर्धाअधिक रिकामाच असे, आणि इतर सर्व विद्यार्थ्यांना दुसऱ्या हॉलमध्ये बसण्याला पुरेशी जागाही नसे. त्यामुळे कित्येकदा पहिली पंगत झाल्यावर पाण्याने धुतलेल्या तेथील ओल्या जागेवरच आम्हाला बसावे लागे. साहजिकच मनात प्रश्न असा उभा राही की, पहिल्या हॉलमध्ये जागा शिल्लक असूनही तेथे आम्हाला बसू का देत नाहीत ? उत्तर स्पष्ट होते : ब्राह्मण विद्यार्थ्यांना आमचा विटाळ होईल ना ? ब्राह्मण हे सर्व वर्णांचे गुरु. त्यांचा श्रेष्ठपणा जन्मजात. ही श्रेष्ठपणाची जाणीव पोसण्या-साठी त्यांना भोजनासाठी एक स्वतंत्र हॉल आणि तेथे इतरांना प्रवेशाची बंदी ! मुख्याध्यापक हेच वसतिगृहाचे पर्यवेक्षक होते. तेही याच ब्राह्मण वर्गाचे. त्यांनीच ही व्यवस्था केलेली. हे सर्व पाहून मनाला पीळ पडत असे. वाटत असे की ब्राह्मणांच्या जन्मजात श्रेष्ठत्वाचा ठसा इतर जातीजमातींच्या विद्यार्थ्यांच्या मनावर बालपणापासून उमटण्यासाठीच तर ही व्यवस्था नसेल ना ? पण हे सर्व विचार मनातल्या मनात. बोलून दाखविण्याची सोय नव्हती. नाहीतर वसतिगृहातील प्रवेशाला मुकावे लागले असते. तोंड दाबून बुक्क्यांचा मार सहन करावा लागत होता. त्यातून एक उत्तम गोष्ट निर्माण झाली ती अशी की, भोजनासाठी दुसऱ्या हॉलमध्ये बसणाऱ्या आम्हा इतर विद्यार्थ्यांमध्ये विशेष जवळीक व आपुलकी निर्माण झाली. हा मराठा, तो कुणबी, तो तेली – असा

भेदभाव आमच्यामध्ये राहिलाच नाही. सहभोजनामुळे जातीपातीची बंधने गळून पडून एका विशिष्ट पातळीवर एकात्मता कशी निर्माण होते, त्याचे ते प्रात्यक्षिक होते. वसतिगृहातील या व्यवस्थेचा हा एक महत्वाचा सुसंस्कार आपल्या मनावर घडला तरी ब्राह्मणासाठी स्वतंत्र हॉल असल्यामुळे आम्ही इतर सर्व ब्राह्मणेतर आहोत हीही भावना त्यामुळे मनात निर्माण झाली आणि रुजली हे सत्य होते. या भोजनव्यवस्थेकडे अशा दृष्टीने पाहाण्याची जाणीव माझ्या ठिकाणी निर्माण होण्यास, त्यावेळी खामगाव येथे येऊन गेलेले श्री. शाहू छत्रपती आणि त्यांच्या भाषणामुळे आसमंतात निर्माण झालेले वातावरणच कारण नाही काय ? माझे मत घडविण्यात अप्रत्यक्षपणे राजर्षी कारणीभूत झाले असे मी म्हटले तर ते चुकीचे होणार नाही. राजर्षींचे हे अप्रत्यक्ष ऋण फेडण्या–साठीच प्रस्तावना लेखनाचे हे धाष्टर्य मी करीत आहे.

प्रस्तुत संग्रहाचे संपादक डॉ. भोसले यांनी या संग्रहाला ‘ क्रान्तिसूक्ते ’ हे नाव दिले आहे ते यथार्थ होय. ‘ क्रांती ’ म्हटली म्हणजे आमच्यासमोर फक्त राजकीय क्रांतीचा विचार येतो. एका हातात रुधिराने लाल झालेले तळपते शस्त्र आणि दुसऱ्या हातात परकीय शत्रूचे छाटलेले मुंडके अशी आमची क्रांतीदेवतेविषयीची कल्पना आहे. सामाजिक उत्थापनाचा जणु त्यात समावेशच होत नाही. राजकीय आणि सामाजिक सुधारणा बरोबरच झाल्या पाहिजेत; "या सुधारणा स्वतंत्र नाहीत. या दोन सुधारणा राष्ट्रोन्नतीच्या गाड्याची दोन चाकेच होत; पण त्यात आधी मग पाहायचेच झाले तर आधी सामाजिक सुधारणा झाल्या पाहिजेत. शिक्षणाने व योग्यतेने सर्वांत समानता निर्माण झाली पाहिजे, अस्पृश्यता नष्ट झाली पाहिजे, जातीजातीतील बंधने तुटली पाहिजेत, वर्णविषमतामूलक विषमता खणून काढली पाहिजे. असे झाले तरच आम्हाला स्वराज्याचे फायदे मिळतील.’ असे छत्रपतींनी ठासून सांगितले. राजकीय क्रांतीकडे जनतेला एकजुटीने नेऊ शकणारी सामाजिक क्रांती हीच खरी क्रांती होय, असा राजर्षींचा दृष्टीकोण त्यांच्या अनेक भाषणांतून स्पष्ट होतो. या क्रांतीची तुतारी प्रथम महात्मा फुले यांनी मुळामुठेच्या काठावर फुंकली. तिचे निनाद विरू लागण्यापूर्वीच पंचगंगा नदीच्या तीरावरून या क्रांतीचे रणशिंग राजर्षी छत्रपतींनी फुंकले. महात्मा जोतिबा फुले द्रष्टे पुरुष होते. त्यांच्या काळच्या पुढाऱ्यांना परकीय राजसत्तेत तेवढी गुलामगिरी दिसली. जोतिबांच्या तेजस्वी आणि अंतर्भेदी दृष्टीला मात्र राष्ट्राच्या सर्व थरांतील गुलामगिरीचे दर्शन झाले. सामाजिक, धार्मिक आणि एका दृष्टीने राजकीय गुलामगिरी देशावर कुणी आणि कशी

लादली हे त्यांनी अचूक ओळखले. या गुलामगिरीवर त्यांनी सर्व बाजूंनी हल्ला चढविला. याच्या मुळाशी त्यांची मानवतावादी दृष्टी होती. रंजल्यागांजल्यांचे दुःख नाहीसे करण्याची तळमळ होती, सर्वसामान्य जनतेच्या उद्धाराची पोटतिडिक होती. जोतिबांना जे ' सत्य ' गवसले ते त्यांनी उर्ध्वबाहू करून कंठरवाने ओरडून सांगितले आणि ते सर्व बाबतीत आपल्या एकट्याच्या आणि अल्प साहाय्यकांच्या मदतीने अंमलातही आणले. आपले अवतारकार्य करीत जोतिबांची पावले काळाकडे वाटचाल करू लागली त्याच वेळी या क्रांतीची पताका आपल्या खांद्यावर घेऊन राजर्षी छत्रपतींच्या रुपाने नव्या उत्साहाचा, नव्या कर्तृत्वाचा क्रांतीवीर उदयाला आला. आपल्या या क्रांतिकार्यासाठी त्याने ज्या तुताऱ्या फुंकल्या, जी रणशिंगे वाजविली, जे डंके पिटले त्याचे गगनभेदी आवाज या ' क्रांतिसूक्तां ' त आजही आपणाला सापडतात.

पण याचा अर्थ राजर्षी शाहू छत्रपती म्हणजे जोतीबांचा प्रतिध्वनि होय, असा मात्र नव्हे. जोतिबा एक सर्वसाधारण ब्रिटिश प्रजाजन होते, तर राजर्षी हे ब्रिटिशांच्या राजवटीतील एका संस्थानाचे राजे होते. जोतीबांचे पुणे हे जसे ब्राह्मण्याचे माहेरघर होते तसेच कोल्हापूर हेही होते. धार्मिक, सामाजिक आणि राजकीय क्षेत्रात ब्राह्मण्याचा पगडा असल्यामुळे गरीब शेतकरी, मजूर, अस्पृश्य व इतर अब्राह्मण जनता यांचे शोषण होत असल्याचे जसे जोतीबांच्या नजरेला आले तसेच ते आपल्या संस्थानात होत असल्याचे राजर्षींच्या अनुभवाला आले. या ब्राह्मण्याचा अत्यंत कटु अनुभव त्यांना वेदोक्त प्रकरणामुळे आला. या ब्राह्मण्याची आग जोतीबांच्या वैयक्तिक जीवनाला जितकी होरपळत होती त्याच्या कितीतरी पटींनी अधिक प्रमाणात राजर्षींच्या जीवनाला तिचे चटके बसत होते. या आगीतून जोतीबांचे चातुर्वर्ण्यविरोधी समतेचे आणि मानवतेचे सत्यशोधक तत्त्वज्ञान जसे निर्माण झाले तसे राजर्षींचेही तत्त्वज्ञान निर्माण होणे अपरिहार्य होते राजर्षी संस्थानाधिपती होते. त्यामुळे आपले तत्त्वज्ञान आपल्या संस्थानांत अधिकाराच्या जोरावर अंमलात आणणे जसे त्यांना शक्य होते तसे जोतिबांना नव्हते. जोतिबांच्या कार्याकडे, मनात जळफळ असतानाही मानवतावादी दृष्टिकोणातून पाहाणे शक्य होते. पण राजर्षींनी केलेल्या त्याच कार्याकडे त्यांची ब्राह्मण जनता, विशेषतः पुरोहित व नोकऱ्यातील अधिकारी वर्ग दडपशाहीच्या दृष्टिकोणातून पाहू लागली. आणि त्यांच्या या दृष्टिकोणाचा पुण्यातील तथाकथित राष्ट्रवादी पण सना नी वृत्तपत्रांच्या नेत्यांनी पाठपुरावा केला व राजर्षी विरुद्ध टीकेचा प्रचंड गदारोळ निर्माण केला. त्याला

बाणेदारपणाने सडेतोड उत्तरे देताना त्यांच्या वाणीतून क्रांतिकारक विचारांचे जे स्फुल्लिंग वेळोवेळी बाहेर पडले ते त्यांच्या भाषणांच्या या संग्रहात पानापानांवर आढळतील.

जोतिबांचा आणि राजर्षींचा तो काळ लक्षात घेतला म्हणजे या क्रान्तिसूक्तांचे महत्त्व कळून येईल. या पार्श्वभूमीवरच ' जर हल्लीची जातिव्यवस्थाच कायम राहिली तर ज्या रीतीने हल्ली सुराज्याचा अर्थ समजला जातो ते स्वराज्य म्हणजे मूठभर लोकांच्या हाती सत्ता जाणे होय', ' जातिभेद मोडून समाजाचा पाया शुद्ध केल्याशिवाय आम्हाला सेल्फ गव्हर्मेंट दिले तरी नको', ' केवळ अल्पसंख्य उच्चवर्गीयांच्या हातातच सत्ता जाण्यात स्वराज्याचे पर्यवसान होऊ नये. म्हणून निदान दहा वर्षेपर्यंत तरी आम्हाला जातवार प्रतिनिधी निवडून देण्याचा हक्क असला पाहिजे.' इत्यादी सूक्तांचा विचार केला पाहिजे. त्याचप्रमाणे राजर्षी छत्रपती एक संस्थानिक होते आणि संस्थानाधिपती या नात्याने आपल्या मानवतेच्या व समानतेच्या तत्त्वज्ञानाची प्रत्यक्ष कार्यवाही करणे त्यांना शक्य होते ही गोष्ट लक्षात ठेवूनच त्यांनी आपल्या भाषणांत, धूर्तपणे जागोजागी केलेल्या ब्रिटिश सम्राज्ञी आणि अधिकारी यांच्या स्तुतिस्तोत्रांचा अर्थ लावला पाहिजे. इतिहासाच्या आणि समाजशास्त्राच्या अभ्यासकांना हे निराळे सांगायची आवश्यकता नाही. राजर्षींच्या वाणीतून बाहेर पडलेली इतर अनेक सूक्ते त्यांच्या भाषणांच्या या संग्रहात आलेली आहेत. उदा : ' दुसऱ्याचे दुःख ते आपले दुःख व दुसऱ्याचे सुख तेच आपले सुख ', ' ज्यांना राजकारण करणे आहे त्यांनी मनुष्याला मनुष्याप्रमाणे वागविले पाहिजे ', ' इंग्रजी शिक्षणापासून भारतीयांना तिसरा डोळा आला आहे ', ' आपली उन्नती आपणच करुन घेतली पाहिजे. दुसरा आपल्याकरिता काही करील, अशी अपेक्षा करणे केव्हाही कमीपणाचे आहे, ' ' जोपर्यंत आमच्यामध्ये जातिजातीतील मतभेद आणि मत्सर जिवंत आहेत, तोपर्यंत आम्ही आपआपसात झगडत राहणार आणि आमच्या हितवृद्धीस अपाय करुन घणार ', ' व्यक्तीच्या दृष्टीने धर्माची बाब महत्त्वाची असेल, पण राष्ट्रीय बाबतीत ती केव्हाही आड यंता कामा नये.', 'देशाची म्हणजे देशबंधूंची सेवा करणे, जनी जनार्दन शोधणे व पाहणे हाच खरा धर्म आहे.', ' सर्वांना समानतेने वागविले पाहिजे. सर्वांना विद्यादान दिले पाहिजे व सर्वांचा धार्मिक हक्क समान समजला पाहिजे.' अशा अनेक सुभाषित सूक्तांची खाण म्हणजे राजर्षींच्या भाषणांचा हा संग्रह होय. यातील काही निवडक सुभाषिते विद्यालयातील भिंतीवर म्हणींच्या स्वरूपात लावण्यात आली तर विद्यार्थ्यांच्या मनावर त्याचा सुपरिणाम झाल्याशिवाय राहणार नाही.

राजकीय, धार्मिक आणि सामाजिक बाबतीतील राजर्षींच्या कर्तृत्वाची स्पष्ट व ठसठशित चित्रे या भाषणांतून दिसतात हे तर खरेच, पण त्यांच्या इतर कर्तृत्वाचीही काही रेखा-चित्रे, पुसट स्वरुपात का होईनात, पण त्यात उमटलेली आढळतात. राजर्षींची दृष्टी अत्यंत व्यापक होती. आपल्या प्रजेच्या सर्वांगीण उन्नतीसाठी आवश्यक असलेल्या सर्व बाबींकडे त्यांचे बारकाईने लक्ष होते. सक्तीच्या प्राथमिक शिक्षणाकडे जसे त्यांनी लक्ष दिले तसे, खेड्यापाड्यांतील गरीब विद्यार्थ्यांना हे शिक्षण घेणे शक्य व्हावे म्हणून वसतिगृहांच्या निर्मितीलाही त्यांनी प्रोत्साहन दिले. असे करताना वसतिगृहात जातिनिरपेक्षतेने प्रवेश देण्याची सुरुवात करून छत्रपतींनी शिक्षणाचा प्रसार व सामाजिक समतेची स्थापना, या दोन्ही गोष्टी साधल्या. आपल्या संस्थानातील शासनयंत्रणेत मागासलेल्या वर्गासाठी शेकडा पन्नास टक्के जागा राखून ठेवून एका नव्या प्रशासकीय क्रांतीचे बीजारोपण केले. आपल्या क्रांतिकारक विचारांच्या व कार्याच्या प्रसारासाठी आवश्यक त्या शिक्षणशाळा काढून नेतृत्वाचे एक नवीन दर्शन घडविले. संस्थानातील प्रजेच्या हितासाठी आगगाडीचा रस्ता, धरण, गिरणी वगैरे निर्माण करून कोल्हापुरातील औद्योगिक व हरित क्रांतीचा पाया घातला. मजुरांची स्थिती लक्षात घेऊन त्यांचे संघ स्थापन होण्याची आवश्यकता त्यांनी प्रतिपादली. महाराजांची भाषणे महाराष्ट्रात तर झालीच पण महाराष्ट्राबाहेर भावनगर, नवसारी, कानपूर, दिल्ली, हुबळी इत्यादी ठिकाणीही झाली. त्यावरून त्यांच्या कार्याचे व्यापक राष्ट्रीय स्वरूप लक्षात येते. राजर्षींच्या कर्तृत्वाची अशी अनेक चित्रे या भाषण-संग्रहातून आढळतात. भूतकाळाच्या पार्श्वभूमीवर वर्तमानाचे सूक्ष्म निरीक्षण करून भविष्याचा अचूक वेध घेणारे त्यांचे व्यक्तिमत्व अलौकिक होते. त्याचे दर्शन इथे घडते. ' कालो वा कारणं राज्ञ: राजा वा कालकारणम् ' असा प्रश्न राजर्षींच्या बाबतीत व्यर्थ आहे. काळाने, भोवतालच्या परिस्थितीत त्यांना घडविले हे तर खरेच, पण आपल्या कर्तृत्वाने त्यांनी नवीन काळही घडविला यात शंका नाही.

अशा थोर राष्ट्रपुरुषाच्या भाषणांचा हा संग्रह 'क्रान्तिसूक्ते' या नावाने प्रसिद्ध होत आहे ही आनंदाची गोष्ट होय. श्री शाहू छत्रपतींची काही भाषणे १९२० मध्ये, म्हणजे छत्रपतींच्या जीवनकालातच प्रसिद्ध झाली होती. बरीच वर्षे ती दुर्मिळ होती. राजर्षींच्या ' निर्वाणाला पन्नास वर्षे पूर्ण होत आहेत.' या निमित्ताने प्रा. श्याम ना. येडेकर यांनी ती पुन्हा संकलित व संपादित केली. या दरम्यान भ. ब. जाधव यांनीही 'राजर्षी शाहू महाराजांची भाषणे ', आर्थिक झीज सोसून प्रकाशित केली आहेत. आता राजर्षींच्या जन्मशताब्दीच्या निमित्ताने महाराष्ट्राचे लक्ष पुन्हा राजर्षींकडे वळले आहे. त्यात महाराष्ट्र शासनाने पुढाकार घेतलेला आहे हे विशेष होय. कोल्हापूर जिल्हा परिषद यांनी या

कार्यात लक्ष घातले हे स्वाभाविक होय. कोल्हापूर ही राजर्षींची राजधानी. आजचे कोल्हापूर हे राजर्षी छत्रपतींनी घडविले आणि वाढविले आहे. तेथील जनतेने त्यांचे ते ऋण फेडण्यासाठी पुढे येणे योग्यच होय. प्रा. श्याम येडेकरांनी संकलित केलेल्या राजर्षींच्या भाषणांच्या संग्रहाच्या मुद्रणाला कोल्हापूर नगरपालिकेने बहुमोल आर्थिक साहाय्य दिले आहे. आणि आता जिल्हा परिषदेने तर राजर्षींच्या संबंधीच्या सहा ग्रंथांच्या प्रकाशनाचा संकल्प सोडला आहे. याबद्दल कोल्हापूर जिल्हा परिषदेचे आणि विशेषत: तिचे अध्यक्ष श्री. बाळासाहेब माने यांचे मन:पूर्वक अभिनंदन करणे अवश्य आहे. जिल्हा परिषदेने " रस्ते, दवाखाने, शाळा, इमारती आदी समाजाच्या प्रगतीसाठी, सर्व तऱ्हेच्या भौतिक सुविधा उपलब्ध ' करुन तर द्याव्यातच पण तिने वैचारिक व्यासपीठ निर्माण करुन विचारमंथनातून समाजाची प्रगती साधावी व राष्ट्र संवर्धनासाठी प्रयत्नशील असावे," ही विशाल दृष्टी श्री. माने यांनी आपल्या पुरस्कारात व्यक्त केली आहे. त्यावरून श्री. शाहू छत्रपतींचे कोल्हापूर वैचारिक दृष्टीनेही कसे प्रगत झालेले आहे याची साक्ष पटते. त्यांच्या संकल्पित सहा ग्रंथांपैकी 'क्रान्तिसूक्ते: राजर्षी छत्रपती शाहू' हा एक ग्रंथ होय.

या ग्रंथाचे संपादनही डॉ. भोसले यांनी जाणीवपूर्वक केलेले आहे. श्री. शाहू छत्रपतींची कित्येक समयस्फूर्त भाषणे अनेक कारणांमुळे आज उपलब्ध नाहीत, याबद्दल त्यांनी व्यक्त केलेली खंत यथार्थ आहे. अजूनही छत्रपतींची काही भाषणे उपलब्ध होण्याची शक्यता त्यांनी बोलून दाखविली आहे, ती लक्षात घेऊन या कार्याचा कुणीतरी, एखाद्या व्यक्तीने वा संस्थेने पाठपुरावा करणे अवश्य वाटते. सुदैवाने कोल्हापूर येथे श्री शाहू संशोधन केंद्र स्थापन झालेले आहे. या संस्थेकडून अशा कार्याची अपेक्षा केल्यास ती चुकीची ठरु नये.

प्रस्तुत संग्रहात डॉ. भोसले यांनी राजर्षींची मराठी भाषणे तेवढी संगृहीत केली आहेत. राजर्षींच्या इंग्रजी भाषणांचा वेगळा संग्रह ' A Royal Philosopher Speaks ' या सुरेख मथळ्याने सिद्ध झाला आहे. प्रा. भोसले यांनी 'क्रान्तिसूक्ते' मध्ये राजर्षींची मराठी भाषणे विषयवार विभागणी करून ती छापली आहेत. डॉ. भोसले यांनी परिश्रमपूर्वक तयार केलेले 'टिपा आणि टिप्पणी' हे सदर आजच्या अभ्यासकांना फार उपयुक्त होईल. त्यावरून डॉ. भोसले यांच्या संपादनकुशलतेची उत्तम साक्ष पटते. या कार्याबद्दल मी त्यांचे अभिनंदन करतो. राजर्षींच्या भाषणांचा असा हा सुंदर संग्रह सर्वांच्या आदरास पात्र होईल यात शंका नाही.

नागपूर

वि. भि कोलते

## संपादकीय

१९७५ साली, राजर्षी शाहू महाराजांची जन्मशताब्दी साजरी झाली. त्या निमित्ताने कोल्हापूर जिल्हा परिषदेने ' राजर्षी शाहू ग्रंथमाला ' मधून पाच ग्रंथ प्रकाशित केले.

त्यामध्ये ' क्रान्तिसूक्ते : राजर्षी छत्रपती शाहू ' व 'A Royal Philosopher Speaks' ही राजर्षी शाहूंच्या अनुक्रमे मराठी व इंग्रजी भाषणांची संपादने होती. पूर्वसूरींना वाट पुसत, अनुपलब्ध भाषणे मिळवून टिपा-टिप्पणीसह ती मी संपादित केली होती. कोल्हापूर जिल्हा परिषदेचे त्यावेळचे अध्यक्ष श्री रा. शं. उर्फ बाळासाहेब माने यांची यामागे मुख्य प्रेरणा होती.

ह्या पुस्तकांची निकड सतत जाणवणारी राहिली.

' क्रान्तिसूक्ते ' ची, मराठी / इंग्रजी एकत्रित भाषणे, संदर्भामध्ये अधिक भर, प्रदीर्घ प्रस्तावना इत्यादी स्वरूपात ही सुधारित आवृत्ती प्रकाशित होत आहे. महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने ही जबाबदारी उचलून यथाकाल पार पाडली.

एतद्विषयक काम करणारे कष्टाळू पूर्वसूरी, मंडळाचे आदरणीय अध्यक्ष डॉ. फडकेसर, मंडळाचे मान्यवर सदस्य, मंडळाचे निवृत्त सचिव श्री. सूर्यकान्त देशमुख, दिवंगत सचिव कै. पंढरीनाथ पाटील, सांप्रतचे सचिव श्री. चं. रा. वडे व कार्यालयीन कर्मचारी या सर्वांचा, त्यांच्या साहाय्य व सहकार्याबद्दल मी मनःपूर्वक आभारी आहे.

औरंगाबाद
२५ फेब्रुवारी, ९१

एस्. एस्. भोसले

अनुक्रमणिका



डॉ. एस्. एस्. भोसले



# कोल्हापूर संस्थान
## १८९३-९४ ते १९२१-२२

S = कोल्हापूर संस्थान

F = जहागीर

B = ब्रिटिश प्रदेश






साधन :- कोल्हापूर संस्थान :- सर्व साधारण प्रशासन अहवाल १९१२-१३

एक

# शिक्षण : स्वराज्यासाठी !



राजर्षी शाहू महाराजानी शिक्षणाचे महत्त्व विशद करताना म्हटले आहे, " शिक्षणानेच आमचा तरणोपाय आहे, असे माझे ठाम मत आहे. शिक्षणाशिवाय कोणत्याही देशाची उन्नती झाली नाही, असे इतिहास सांगतो. अज्ञानात बुडून गेलेल्या देशात उत्तम मुत्सद्दी व लढवय्ये वीर कधीही निपजणार नाहीत. म्हणूनच सक्तीच्या व मोफत शिक्षणाची हिंदुस्थानला अत्यंत आवश्यकता आहे." त्यानंतर भारतीय सामाजिक इतिहासाचा आढावा घेताना, " मनू आणि त्यांच्या मागून आलेल्या शास्त्रकारांनी कमी जातीच्या लोकांना विद्यामंदिराचे दरवाजे बंद करण्यात आले", असे त्यांनी निर्भयपणे सांगितले आहे.

राजर्षींच्या मते 'स्वराज्या' ऐवजी आपण प्रथम शिक्षण घेतले पाहिजे. " जोपर्यंत हिंदुस्थान जातिबंधनांनी निगडित राहील, तोपर्यंत स्वराज्य स्थापनेपासून मिळणारे संपूर्ण फायदे त्यास घेता येणार नाहीत. म्हणून निरनिराळ्या समाजातील लोकांना शिक्षण देण्याची पद्धत मी काळजीने अनुसरीत आहे." राजर्षींच्या या शैक्षणिक धोरणामुळे ते 'स्वराज्यद्रोही' आहेत असा आरोप त्यांच्यावर करण्यात आला.

त्यास, 'शिक्षण : स्वराज्यासाठी !' या भाषणात राजर्षी शाहू महारजांनी चोख उत्तर



खामगाव : २७ डिसेंबर, १९१७
अ. भा. मराठा शिक्षण परिषदेचे अकरावे अधिवेशन :
शाहू महाराजांनी अध्यक्षपदावरून केलेले हे इंग्रजी भाषण, सरदार रावसाहेब सरनोबत यांनी मराठीत वाचून दाखविले.

दिले आहे. छत्रपती शिवरायाप्रमाणेच आपणही चातुर्वर्ण्याच्या विरोधी आहोत, असे मत त्यांनी व्यक्त केले आहे. शेवटी ते सांगतात: "आमच्या थोर देशाच्या नैतिक आणि सांपत्तिक प्रगतीच्या कामी व सार्वजनिक हितासाठी निरनिराळ्या जातींचे एकीकरण करण्याचे आपण शक्य तितके प्रयत्न करू या. अशा स्थितीत मिळणाऱ्या स्वराज्याचा अर्थ मूठभर लोकांच्या हाती सत्ता जाणे हा होय!" म्हणून बहुजन समाजात शिक्षणाचा प्रसार होणे आवश्यक आहे, असे राजर्षींचे, पाया तयार करून देणाऱ्या शिक्षणाचे तत्त्वज्ञान आहे.

✪

## एक

# शिक्षण : स्वराज्यासाठी !



'मराठा समाजा'ने आजच्या प्रसंगी हजर राहण्याबद्दल मजला मनोभावाने आमंत्रण केले, याचा मला अतिशय बहुमान वाटत आहे. मी येथे महाराजा या नात्याने आलो नाही, परंतु एक ' मराठा ' असे समजूनच आलो आहे. आपण सर्व मजला आपल्या–पैकीच एक मानाल अशी आशा आहे. आपण मला हवे तर शिपाईगडी म्हणा, अगर शेतकरी म्हणा किंवा जे काही रुचेल ते म्हणा. माझ्या कुलपरंपरेच्या वहिवाटीस अनुसरुन आपणापैकी रणशूर, मला शिपाईगडी मानतील, आणि शेतकरी असतील ते पाटील किंवा शेतकरी असे मानतील. कार्यबाहुल्यामुळे अगदी शेवटच्या घटकेपर्यन्त या परिषदेस हजर राहण्याचा मला निश्चय करता येईना. परंतु आपणा सर्वांना, येथे भेटण्याची बहुमोल संधी हातची दवडू नये, असा मी निश्चय केला. माझे वडिलोपार्जित गाव वेरूळ येथून जवळच आहे. येथेच माझ्या घराण्याचा पहिला उत्कर्ष म्हणजे पाटीलकी वतन आम्ही संपादिले. या वतनाबद्दल मला अद्याप अत्यंत आदर वाटत आहे, म्हणूनच मी माझ्या स्वतःच्या मंडळींमध्ये एक शेतकरी व पाटील या नात्याने आलो आहे. म्हणून माझा आनंद द्विगुणित होत आहे.

सद्गृहस्थहो, आमच्या समाजापैकी दोन सुप्रसिद्ध व्यक्तींचा उल्लेख कृतज्ञतापूर्वक करणे जरूर आहे ! ते गृहस्थ म्हणजे श्री. खासेसाहेब पोवार व मि. खासेराव जाधव हे होत. त्यांच्याच अत्याग्रहामुळे मला येथे येणे भाग पडले आणि याबद्दल मी त्यांचे अंतःकरणपूर्वक आभार मानतो. मि. खासेरावसाहेब यांची कर्तबगारी, स्वार्थत्याग आणि अनेक बाबतीत दिसून येणारी हुषारी, ही सुप्रसिद्ध आहेत. ती सांगण्याची जरूरी नाही. आमच्यामध्ये त्यांनी श्रेष्ठत्व मिळविले आहेच आणि जरी त्यांच्यामध्ये महत्त्वाकांक्षेचा अभाव आणि नशिबावर हवाला ठेवण्याची थोडीबहुत प्रवृत्ती हे दोन दोष असले तरी ते आज कोणत्या दर्जाला पोचले असते, याची कल्पना आपणच करावी. माझ्या मते ते आज हिंदुस्थानातील एक प्रमुख पुढारी आहेत आणि त्यांची कर्तबगारी, बुद्धिमत्ता आणि समाजातील दर्जा,

याबद्दल मला त्यांचा हेवा वाटतो. श्री खासेसाहेब यांच्या अंगचा उत्साह आणि कर्तबगारी या दोन गुणांमुळे ते जेथे जातील तेथे त्यांची प्रशंसाच होईल. सरदार घराण्यातील लोकांमध्ये हे खरोखरच भूषण आहे, आणि त्यांचेबद्दल मला फारच अभिमान वाटत आहे. त्यांच्या योग्यतेचे आणि कर्तबगारीचे आणखी थोडेतरी राजपुत्र आमच्यामध्ये निपजावेत, अशी माझी इच्छा आहे.

शिक्षणानेच आमचा तरणोपाय आहे, असे माझे ठाम मत आहे. शिक्षणाशिवाय कोणत्याही देशाची उन्नती झाली नाही, असे इतिहास सांगतो. अज्ञानात बुडून गेलेल्या देशात उत्तम मुत्सद्दी व लढवय्ये वीर कधीही निपजणार नाहीत.म्हणूनच सक्तीच्या व मोफत शिक्षणाची हिंदुस्थानला अत्यंत आवश्यकता आहे. या बाबतीत आमचा गतकाल म्हटला म्हणजे इतिहासातील एक अंधारी रात्र आहे. फक्त एकाच जातीने विद्येचा मक्ता घेतला होता. मनू आणि त्यांच्यामागून झालेल्या शास्त्रकारांनी, त्या त्या वेळच्या ध्येयाला अनुसरून निरनिराळ्या जातींच्या व्यवहारास बंधनकारक असे निर्बंध रचले आणि खालच्या कमी जातीच्या लोकांना विद्यामंदिरांचे दरवाजे बंद करण्यात आले. त्यांचे स्वतःचे धर्मग्रंथ आणि वेद हे सुद्धा वाचण्याची त्यांना मनाई होती. हिंदुधर्माशिवाय इतर कोणत्याही धर्माने अशा आंधळ्या व दुःखकारक परिणाम करण्याबद्दल अग्रेसरत्व मिळविले नाही. गेल्या साठ वर्षांमध्ये म्हणजे इ. स. १८५७ सालानंतर प्रजावत्सल ब्रिटिश सरकारने सर्वांना सरसहा शिक्षणाची द्वारे खुली केली आहेत आणि त्यामुळे मला वाटते, आम्ही बरीच प्रगती केली आहे.

'स्वराज्य हवे' अशी ओरड चोहोकडे ऐकू येत आहे. आम्ही स्वराज्यास पात्र आहोत किंवा नाही, हाच एक अत्यंत महत्त्वाचा प्रश्न आहे. स्वराज्य आम्हास पाहिजे आहेच. त्या योगानेच आमच्या सैन्यात चैतन्य उत्पन्न होईल. सार्वभौम ब्रिटिश सरकारनेच, आमच्या मनात स्वराज्याची कल्पना पेरली आहे आणि जिंकलेल्या लोकांच्या प्रगतीला ते बिलकूल प्रतिकूल नाहीत. मनूप्रमाणे त्यांनी प्रगतीला अडथळा केला नाही याबद्दल आम्ही त्यांचे फार कृतज्ञ आहोत. इतकेच नव्हे, तर आमची प्रगती व्हावी म्हणून ते निरंतर उत्सुक असतात. स्वराज्यासारख्या अत्यंत महत्त्वाच्या आणि व्यापक प्रश्नांचा सांगोपांगरीतीने विवेचन करण्याचा आजचा प्रसंग नाही. तथापि याबाबतीत लॉर्ड सिडनहॅमसाहेबाप्रमाणेच माझे मत आहे. ते माझे मित्र असून मी त्यांच्या गुणांचा चाहता आहे. लॉर्ड सिडनहॅम साहेबांचे असे मत आहे की; जोपर्यंत हिंदुस्थान जातिबंधनात निगडित राहील, तोपर्यंत स्वराज्य संस्थेपासून मिळणारे संपूर्ण फायदे त्यास घेता येणार नाहीत. त्यांना अशी भीती वाटते की, येथील सत्ता उच्च वर्गाच्या हाती जाईल. विचारान्ती माझे मत झाले आहे की,

आमची सध्याची जातिबंधने तोडून टाकण्याचा काळ येईलच येईल. आमच्या नैतिक आणि प्रगतीच्या हिताकडे लक्ष देऊनच वरील स्थिती यावी, अशी माझी इच्छा आहे. जोपर्यंत आमच्यामध्ये जातिजातीतील मतभेद आणि मत्सर जिवंत आहेत, तोपर्यंत आम्ही आपआपसात झगडत राहाणार आणि आमच्या हितवृद्धीस अपाय करून घेणार आमच्यातील अंत:स्थ कलह नाहीसे करण्यास आणि आम्हाला स्वराज्यास पात्र करून घेण्याकरिता ही अनर्थकारक जातिपद्धती झुगारून देणे आम्हाला अत्यंत आवश्यक आहे, हे आपल्या लक्षात आले असेलच.

' क्षत्रियांच्या निर्मूलनाविषयीच्या पौराणिक कथेचा येथे निर्देश करणे अप्रासंगिक होणार नाही: मराठे लोक आपल्यास क्षत्रिय म्हणवितात, हे आपणास माहीत आहेच. पांडवांच्या कालापासून ते लढवय्ये लोकांत प्रमुख आहेत. आमच्या क्षत्रिय कुळाचे निर्मूलन झाले आहे, असे आम्ही बिलकूल कबूल करीत नाही. आमचा सध्याचा अगणित समाजच या गोष्टीला खोटे ठरवितो. एकवेळ नव्हे, तर एकवीस वेळा पृथ्वी नि:क्षत्रिय केल्याचा पौराणिक कथेचा अर्थ, निराळ्या तऱ्हेने लावता येईल. शेतकी आणि लढवय्येपणा हे दोन्ही गुण नेहमी एकत्र असतात आणि शेतकरी वर्गाला तिसऱ्या वर्गाच्या हलक्या पायरीला पोचविल्यामुळेच ही निर्मूलनाची कल्पना अस्तित्वात आली असावी आणि तिचे खंडन वेळीच न झाल्याने तिजवर विश्वास बसला असावा. अशा प्रकारच्या नेहमी आढळून येणाऱ्या ' स्मृती ' तील लेखांवरून क्षत्रियांचा प्रचंड समुदाय नाहीसा झाला असावा, असे मानण्यात आले. त्यापुढील काळात, होऊन गेलेल्या लेखकांनी एक पाऊल पुढे टाकून क्षत्रियांना वैश्यांच्या पायरीवरून ढकलून देऊन थेट शूद्रांच्या पायरीस आणून पोचविले. हा सर्व पक्षपाती समाजाच्या चळवळीचा परिणाम आहे. जगाच्या इतर भागांत, उदाहरणार्थ; जपान देशात, जे काही घडून आले आहे; त्यावरूनही आमची जातिपद्धती मोडण्याची जरूर आहे, असे माझे ठाम मत आहे. अशाप्रकारचा अवश्य फेरफार घडवून आणणे हे आमचे ध्येय असावे. मराठा आणि ब्राह्मण यांनी मला या कामी पूर्ण पाठबळ दिल्याशिवाय, मला किंवा माझ्या दर्जाच्या कोणाही मनुष्याला यश येण्याची आशा करणे कधीतरी शक्य आहे काय ?

हल्लीच्या स्थितीत, आमचे ध्येय साध्य करण्यासाठी जे कर्तव्य आम्हास करावयाचे, ते आमचा समाज सुशिक्षित करणे व त्यांची मने तयार करणे हे होय. ह्या अत्यंत महत्त्वाच्या प्रश्नाचा उलगडा करण्याचा हा फक्त एकच मार्ग आहे; म्हणूनच प्रत्येक समाजाने, आपल्या समाजातील प्रत्येक व्यक्तीच्या कल्याणाकरिता झटणे अगत्याचे आहे. निर–निराळ्या समाजांतील लोकांना, शिक्षण देण्याची पद्धत मी काळजीपूर्वक अनुसरीत आहे

आणि माझ्या आयुष्याच्या पुढील काळात तीच पद्धत सुरू ठेवण्याची माझी इच्छा आहे. निरनिराळ्या जातींना स्वतःची उन्नती करून घेण्याच्या प्रयत्नास, मी प्रोत्साहन दिले आहे, हे कळविण्याची मला परवानगी असावी. मराठा जातीतील प्रमुख कुटुंबांना, मी याच दिशेने मदत करण्याचा प्रयत्न केला आहे. पुन्हा जरूरीची गोष्ट ही की, जातिपद्धतीच्या शृंखला तोडून टाकण्याचे ध्येय साध्य करण्याकरिता आणि परस्परांची मने एक करणे असेल तर परशुरामास रामाने जिंकले, तो राम क्षत्रिय होता आणि परशुराम हा ब्राह्मण होता असल्या प्रकारच्या गतकालीन एतिहासिक गोष्टी आम्ही साफ विसरल्या पाहिजेत. जर असल्या गोष्टींची आठवण आम्ही सदोदित ठेवू लागलो, तर राम आणि परशुराम यांच्यासारखीच भांडणे आमच्यामध्ये चालू राहातील अशी मला खात्री आहे. हे जातिकलह कायमचे नाहीसे केले पाहिजेत. उच्च कुलामुळे अथवा वतनदारपणामुळे येणारा सामाजिक दर्जा जगात सर्व देशात व सुधारलेल्या समाजात प्रचलित आहेच. राष्ट्राची उभारणी करण्याच्या बाबतीत हा दर्जा कधीही आड आलेला नाही. जातिपद्धती इतकी ही गोष्ट वाईट नाही. जन्मसिद्ध हक्कांबरोबर कर्तव्यकर्मे व जबाबदारी यांची जोड असते.

सुधारणेच्या सर्व चळवळीत पुढाकार घेणे हे उच्चवर्णियांचे कर्तव्य आहे. जपान देशातील 'सामुराई' जातीने म्हणजे त्या राष्ट्रातील क्षत्रिय वर्णाने त्यांचे जाति निर्बन्ध मोडून टाकण्याच्या बाबतीत पुढाकार घेतला. सतराव्या शतकात होऊन गेलेल्या आमच्यातील थोर व पूज्य विभूती श्री छत्रपती शिवाजी महाराज यांनी आपणापुढे ठेविलेले ध्येय आज विसाव्या शतकात आपण आपल्या नजरेपुढे ठेविले पाहिजे व त्यांचे अनुकरण केले पाहिजे. मला सांगण्यास दिलगिरी वाटते की, 'मीमांसा संस्थे' च्या स्थापनेपासून जुन्यापुराण्या व निरुपयोगी कल्पनांचे पुनरुज्जीवन होण्याचा संभव आहे. आपले पुढारी अर्वाचीन ध्येयाकडे लक्ष देण्याची जितकी जादा काळजी वाहातील तितके चांगले. थोर शिवाजी महाराजांनी, जे उदाहरण घालून दिले आहे, त्याकडे त्यांनी दुर्लक्ष करू नये. फलटणच्या निंबाळकर घराण्यापैकी एका पुरुषाने मुसलमानी धर्माची दीक्षा घेऊन एका मुसलमान स्त्रीशी लग्न केले होते. त्या पुरुषाला त्या थोर विभूतीने पुन्हा आपल्या जातीत घतले आणि आपल्या परमपूज्य जिजाबाईसाहेब यांच्या संमतीने त्यांनी निंबाळकरांच्या मुलाशी आपल्या स्वतःच्या मुलीचा विवाह करून दिला.

खरोखरीच राष्ट्राची उभारणी, राष्ट्राची घटना, या दोन गोष्टींचे हे एक उदाहरण आहे. आपल्या देशातील या थोर विभूतीला बहुमान व अत्यादर दाखविण्याचा अेकच मार्ग म्हटले म्हणजे त्यांनी घालून दिलेला कित्ता गिरविणे व त्यांच्या मार्गाचे अवलंबन करणे, हा होय

जितक्या लवकर आम्ही आमची जातिबंधने मोडून टाकू तितक्या लवकर आपली स्वराज्या बद्दलची लायकी वाढत जाईल. हे तत्त्व, ज्या दिवशी, आमचे मनात बिंबेल, तोच राष्ट्राचा सुदिन होय. जपान देशाने अेका तडाख्यात जातिबंधने नाहीशी केली, असे सांगतात आणि त्याचा परिणाम आपणास दिसतच आहे. त्या राष्ट्राची आजकाल जगातील अत्यंत बलाढ्य व प्रमुख राष्ट्रांमध्ये गणना होत आहे. 'महात्मा' शिवाजी महाराज आणि अकबर यांचा चाहता आहे. सर्व हिंदुस्थान देश एकवट करण्याइतकी त्यांची दूरवर दृष्टी व उदात्त ध्येय होते. या राष्ट्र विभूतींचे आम्ही अनुकरण केले पाहिजे. या सात्त्विक पुरुषांबद्दल बहुमान वाटत असल्यामुळे नुकत्याच उल्लेख केलेल्या चातुर्वर्ण्य व्यवस्थेच्या स्थापनेची चळवळ मला पसंत नाही आणि याच कारणासाठी सत्यशोधक समाज, ब्राह्मो समाज किंवा ज्या समाजाच्या योगाने निरनिराळ्या जातींमध्ये मत्सरभाव उत्पन्न केला जाईल अशा कोणत्याही समाजाशी मी संबंध ठेवू इच्छित नाही. या आमच्या थोर देशाच्या नैतिक आणि सामाजिक प्रगतीचे कामी आणि सार्वजनिक हितासाठी निरनिराळ्या जातींचे एकीकरण करण्याचे आपण शक्य तितके प्रयत्न करू या. जर हल्लीची जातिव्यवस्थाच कायम राहिली तर ज्या रीतीने हल्ली सुराज्याचा अर्थ समजला जातो ते स्वराज्य म्हणजे मूठभर लोकांच्या हाती सत्ता जाणे हे होय. याचा अर्थ मी स्वराज्याच्या चळवळीच्याविरुद्ध आहे, असे समजावयाचे नाही; हे मी पुन्हा एकवार सांगतो. आम्हाला स्वराज्य पाहिजेच. जातिभेदापासून होणारे अनिष्ट परिणाम नाहीसे होईतोपर्यंत हल्लीच्या प्रसंगी आपणास ब्रिटिश सरकारचा आश्रय व मार्गदर्शकता यांची जरुरी आहे. केवळ अल्पसंख्यांक उच्चवर्गियांच्या हातातच सत्ता जाण्यात स्वराज्याचे पर्यवसान होऊ नये म्हणून निदान दहा वर्षेपर्यंत तरी आम्हाला जातवार प्रतिनिधी निवडून देण्याचा हक्क असला पाहिजे. यामुळे आमचे हक्क काय आहेत याचे आम्हाला शिक्षण मिळेल. एकवार ते समजले म्हणजे प्रतिनिधीत्त्वाची जरूर राहणार नाही. जातवार प्रतिनिधी देण्याचा हक्क नसल्याने काय अवस्था होते याबाबत आमच्या म्युनिसिपालिटीचा शोचनीय अनुभव आम्हापुढे आहेच. या संस्थांतून कनिष्ठ जातींचे प्रतिनिधीत्व नावाचेच आहे, म्हणून अशातऱ्हेची चूक पुन्हा होऊ देऊ नये. यास्तव शिक्षणाचा प्रश्न आणि त्यांची निरनिराळी स्वरुपे याजकडे प्रथमतः आमचे लक्ष गेले पाहिजे. आम्ही शेतकरी किंवा सैनिक होऊन राहावे ही स्थिती आम्हाला समाधानकारक नाही. म्हणून व्यापार-धंदे व इतर उच्च प्रतीचे व्यवसाय यात आम्हास शिरण्याची जरूरी आहे. हल्ली आम्ही व्यापार व उदीम यात पडतच नाही. विसाव्या शतकात राष्ट्राची उन्नती व्यापार व तत्संबंधीची चळवळ यावर अवलंबून आहे, खरोखरच व्यापार हा पाश्चिमात्य राष्ट्रांचा धर्मच झाला आहे. येथे धर्म म्हणजे 'बुद्धियुक्त स्वहित' साधणे असे मी समजतो. व्यापार करण्याचे साहस आम्ही केले नाही, तर आमच्या सर्व चळवळी निस्तेज व निरर्थक होतील. व्यापारासंबंधीच्या चळवळीवर माझा पूर्ण विश्वास

असल्यामुळे मी माझ्या दोघा मुलांना व आप्तांना व्यापारात घातले आहे आणि मला सांगण्यास समाधान वाटते की, त्यांनी तो धंदा मोठ्या आनंदाने स्वीकारला आहे. एवढेच नाही, तर त्यात ते चांगल्यारीतीने पुढे येत आहेत. शेतकीच्या व्यवसायामध्ये जरी आमच्यातील बहुतेक लोक गुंतले आहेत तथापि त्यातसुध्दा शिक्षणाची आम्हाला जरुर आहे. शिक्षणाची जरुरी नाही अशी कोणतीही चळवळ नाही.

आम्ही कसे खावे, श्वास कसा घ्यावा, हेही आम्हास शिकले पाहिजे हे सांगणे जर चमत्कारिक दिसते. तथापि ही गोष्ट खरी आहे. हल्लीच्या काळी शेतकी इतकी पद्धतशीर झाली आहे की, ज्याला त्यात यश मिळवावयाचे आहे, त्याला त्या विषयावरील पुस्तके वाचता आली पाहिजेत व समजली पाहिजेत. सांप्रतच्या महायुध्दात मराठी लोकांनी आपल्या इतिहासप्रसिद्ध रणवीरांची कीर्ती कायम ठेविली आहे. त्याचप्रमाणे आपल्या राजकर्त्यां– विषयी राजनिष्ठा दाखविली आहे. जरी आजची लोकसंख्या मोठी आहे, तरी आमच्या दुर्बलतेमुळे या राक्षसी लढाईत, साम्राजाच्या कामी, द्रव्यबळ क मनुष्यबळ यांची पुरेशी मदत करता आली नाही. तथापि या आणीबाणीच्या प्रसंगी आम्ही सरकारला, यथाशक्ती द्रव्यबळ, मनुष्यबळ, सैन्यबळ यांची मदत करण्याचा झटून प्रयत्न केला पाहिजे. अर्वाचीन युद्ध पद्धतीत, शिक्षणाची अत्यंत जरुरी आहे. प्रत्येक सैनिकास संग्रामशास्त्रावरील पुस्तके वाचता आली पाहिजेत. या ठिकाणीसुध्दा शिक्षणाचा प्रश्न आपल्यापुढे येतो. जर मराठे लोकांना शिक्षण मिळेल, तर ते खात्रीने अधिक चांगले योद्धे होतील. हल्लीच्या लढाईच्या दिवसात, तोफखान्यावरील लोक उत्तम गणिती असले पाहिजेत. म्हणून हीच गोष्ट पुन्हा पुन्हा सांगावी लागते आणि सर्व स्थितीचा विचार करता एकच तत्त्व निघते, ते हे की, प्रत्येक मराठा चांगला सुशिक्षित झाला पाहिजे. हल्लीच्या लढाईने आपणास साम्राज्याची सेवा करण्याची सुसंधी आणून दिली आहे. असली संधी पूर्वी कधीच आली नव्हती व पुढे कदाचित् येणार नाही. अर्थातच अशा प्रसंगी आपल्या सरकारला मदत करणे, हे सर्व जातींच्या व पंथांच्या लोकांचे कर्तव्य आहे असे मी समजतो आणि याप्रसंगी त्यांनी पुढे येऊन क्षात्रतेजाच्या परंपरेला शोभेल, असे वर्तन केले पाहिजे. यावेळी जर आम्ही कर्तव्यपराङ्मुख झालो तर त्याबद्दल आम्हाला नेहमी शोक करावा लागेल.

माझ्या तेरा लाख जमाबंदीच्या व सहा लाख लोकवस्तीच्या संस्थानाने हल्लीच्या लढाईच्या प्रसंगी कोणती कामगिरी केली आहे व करावयाची योजिली आहे, हे आपणां– पुढे ठेवण्यात मला आनंद वाटत आहे. आम्ही युद्धकर्जाकडे वीस लाखाहून जास्त रक्कम दिली आहे आणि इतर रीतीनेही दोन लाख रुपयापेक्षाही जास्त रक्कम पोचविली आहे. शिवाय आमच्याकडे लष्कर भरतीचे काम सोपविल्यापासून दरमहा सुमारे दोनशे

रिक्रूट, म्हणजे नवे सैनिक, आम्ही पुरवीत आहोत. या महिन्याचा आकडा तीनशपर्यंत वाढेल हे कळविण्यास मला आनंद वाटत आहे. आत्मश्लाघेच्या प्रेरणेमुळे वरील सविस्तर हकीगत मी सांगत आहे, असे नसून माझे साम्राज्याबद्दलचे जे कर्तव्य आहे, तिकडे पूर्ण लक्ष देवून ते मी नम्रपणे करीत आहे; हे दाखविण्याकरिताच मी वरील गोष्टीचा उल्लेख करीत आहे. 'आधी करावे, मग बोलावे,' या तुकाराम महाराजांच्या वचनाला अनुसरून मी माझे कर्तव्य करीत आहे. म्हणून माझे तुम्हा सर्वांना असे सांगणे आहे की, सार्वभौम सरकारसंबंधी जे तुमचे कर्तव्य आहे, ते शक्य तितक्या उत्तम रीतीने पार पाडा.

आमच्या सामाजिक चालीरीतीत सुधारणा करणे, इत्यादी अनेक विषयांचा उल्लेख करण्याची माझी इच्छा होती. माझे मित्र खासेसाहेब पोवार हे या ठिकाणी आमच्यामध्ये आहेत, म्हणूनच मला आनंद वाटतो. गेल्या सालच्या, सातारा येथे भरलेल्या परिषदेचे अध्यक्ष या नात्याने त्यांनी या प्रश्नाचे मुद्देसूदरीतीने व सविस्तरपणे विवेचन केले आहे की, त्यावेळी केलेला उपदेश इतका उत्तम आहे की, त्या वेळेस केलेल्या सर्व सूचना येईपर्यंत त्या उपदेशाचा पुनः पुन्हा कितीही वेळा उच्चार केला, तरी योग्यच होईल. ज्याअर्थी माझी मते त्यांच्या मताशी जुळतात, त्याअर्थी माझ्यावतीने या विषयावर बोलण्याबद्दल त्यांनाच सूचना करण्यापलिकडे मी काही अधिक करीत नाही.

आपली रजा घेण्यापूर्वी, माझ्या जातीच्या समाजामध्ये, हजर असण्याबद्दल व यंदाच्या बैठकीच्या अध्यक्षत्वाचा मान मला दिल्याबद्दल मी आपले पुन्हा एकवार आभार मानीत आहे. या सभेचे सर्व अधिवेशन संपेपर्यंत काही निकडीच्या कामामुळ मला हजर राहता येत नाही म्हणून दिलगिरी वाटत आहे. यापासून आपल्याला पुष्कळ निराशा उत्पन्न होईल याची मला जाणीव आहे, परंतु या अधिवेशनाच्या मध्येच मी आपणास सोडून जात आहे याबद्दल मला किती वाईट वाटत आहे; याची कल्पना आपणास होणे शक्य नाही. हे जग तडजोडीचे आहे. आपल्या प्रगतीच्या चाललेल्या कामी मला खरोखर कळकळ वाटत आहे. हे दाखविण्याकरिता मला आपल्या सहवासात थोडातरी काळ घालवावा असे वाटत होते आणि जरी शरीराने मी आपल्यामध्ये हजर नसलो, तरी असल्या प्रसंगी मी मनाने हजर आहेच; या गोष्टीवर आपण मेहेरबानी करून विश्वास ठेवावा. ईश्वर आपल्या हल्लीच्या प्रयत्नात साहाय्य करील आणि आपल्या सुधारणेच्या मार्गात, आपणावर कोणतेही संकट न येवो, असे मी इच्छितो !

ज्या थोर सार्वभौम ब्रिटिश छत्राखाली अभिमानास्पद हक्क आपणांस प्राप्त झाला आहे. त्या राष्ट्राला सांप्रतच्या युद्धात [विजयश्री माळ घालो अशी आपण सर्व, त्या परमकृपाळू परमेश्वराची मनोभावे प्रार्थना करू या !

दोन

# रिलिजस ब्युरॉक्रसी



नासिकच्या श्री उदाजी मराठा वसतिगृहामध्ये सर्व जातींच्या मुलांना प्रवे
राजर्षी म्हणतात: " सर्व जातींच्या मुलांस या वसतीगृहाचे प्रवेशद्वार
चालकांनी आपल्या मनाचा थोरपणा व उज्ज्वल देशभक्ती दाखविली आहे
ईश्वराची लेकरे असल्याने त्यांचे परस्परांशी बंधुत्वाचे नाते आहे . . - -
पुढाऱ्यांना माझे सांगणे आहे की, आपली दृष्टी दूरवर ठेवा. पाश्चापुरं
जातिभेद मोडणें इष्ट आहे, जरूर आहे. जातिभेद देशोन्नतीच्या मार्गात अ

देशोन्नतीच्या मार्गातील हा महान अडथळा कशामुळे निर्माण झाला हे सां
सांगतात: " जातिभेदाचे कार्य जातिद्वेष हे आहे. जातिद्वेष हा हिंदुस्थानच्या
रोग आहे. त्यासाठी जातिभेद मोडून आपण एक होऊ या."

राजर्षीचे हे मत असूनही ' लोकसंग्रह ' च्या संपादकानी राजर्षीच जातिद्वे
असा आरोप केला. त्याला उत्तर देताना राजर्षी म्हणतात: " जपानातील
लोकांनी आपला जन्माने प्राप्त झालेला उच्च दर्जा सोडून दिला म्हणून
ऐक्य होऊन त्या देशाची उन्नती झाली आहे. त्याप्रमाणे ब्राह्मणांनी जातिभ
शिवाय आमच्या लोकांची उन्नती होणार नाही. सर्व जातींना हात देऊन त्य
बरोबर घेऊन सर्वांची स्थिती सुधारणे हे काम क्षत्रियांनी अवश्य के
राजर्षीनी याचसाठी कोल्हापुरात सर्व जातींच्या लोकांसाठी, निरनिराळ्या व



नासिक : १५ एप्रिल, १९२०
श्री उदाजी मराठा विद्यार्थी वसगृतिहाच्या इमारतीच्या पायाभरणी समारंभ
पाहुणे या नात्याने शाहू महाराजांनी केलेले भाषण

द्वारे शैक्षणिक सुविधा प्राप्त करून दिल्या. त्यामुळे जातिद्वेष वाढण्याऐवजी कमी होण्यालाच मदत झाली.

राजर्षी शाहू महाराजांवरील दुसरा आक्षेप म्हणजे, राजर्षी " आपल्या प्रजेस स्वराज्य देण्यास बिलकूल कबूल करीत नाहीत." याला उत्तर देताना राजर्षी म्हणतात : " कोल्हापूर हे ' विद्यार्थी वसतिगृहाची माता ' आहे. सर्व जातीचे लोक पुढे येऊन सामाजिक, औद्योगिक, शिक्षणविषयक, सरकारी नोकरी वगैरे सर्व बाबतीत आपली जबाबदारी पार पाडण्याचे सामर्थ्य त्यास येणे, याला मी ' जातवार प्रतिनिधीत्व ( Communal Representation ) म्हणतो. " असे जातवार प्रतिनिधीत्व द्यावयाचे तर लोकही शिकले पाहिजेत. त्यांच्या मते, " माझी सर्व प्रजा मराठी तिसरी इयत्ता तरी शिकून तयार झाली असती तर त्यांना राजकारभाराचे हक्क आनंदाने देऊन मी आजच विश्रांती घेतली असती ... ... तेव्हा इंग्रजी अधिकाऱ्यांच्या हातून सत्ता काढून घेऊन ती विद्यासंपन्न अशा अल्पसंख्यांक ब्राह्मण वर्गाच्या हाती देणे मला बिलकूल पसंत नाही. "तसे केले तर पुन्हा पेशवाई येईल ही भीती राजर्षींना वाटत होती. त्या संदर्भात ते म्हणतात : " खालच्या वर्गाच्या लोकांच्या बुद्धीवर व ज्ञानावर जे जड व जुलमी जू लादले गेले आहे ते झुगारून देण्याची शक्ती बहुजन समाजाच्या अंगी येण्यास " सक्तीच्या व मोफत प्राथमिक शिक्षणाची फार जरूरी आहे असले शिक्षण कोल्हापूर संस्थानच्या रयतेस देण्यास प्रारंभ झाला आहे. " त्यामुळे समाजातील ' सुशिक्षितांची ब्युरॉक्रॅसी ' – मक्तेदारी –मोडून काढता येईल; यावर राजर्षींची श्रद्धा आहे. त्यांच्या मते " आधी राजकीय सुधारणा की आधी सामाजिक सुधारणा" हा वाद याच ब्युरॉक्रसीच्या प्रवृत्तीतून जन्मलेला आहे.

शेवटी ' रिलिजस् ब्युरॉक्रसी ' मध्ये राजर्षी सांगतात, " मिळालेल्या स्वराज्याच्या हक्काची जबाबदारी ओळखून पुढारलेले लोक स्पर्शास्पर्शाचे बंड मोडून, इतर सुधारलेल्या लोकांप्रमाणे सर्व प्रजाजन आपले देशबांधव आहेत अशी जाणीव बाळगून निःपक्षपात बुद्धीने त्यांना विद्या देतील अशी मी आशा करतो. " सारांश, या देशाची उन्नती व्हावयाची असेल तर जातिभेदाचा अडथळा नष्ट करणारे शिक्षण सर्वांना मिळाले पाहिजे. ते त्यांच्यापर्यंत नेऊन पोचविले पाहिजे असे, राजर्षींच्या जीवनाचे कृतिशील ध्येय होते.

## दोन

# रिलिजस ब्युरॉक्रसी



माझ्या प्रिय मराठे बंधूनो, मराठा विद्यार्थी वसतिगृहाच्या पायाचा दगड बसविण्याच्या महत्त्वाच्या समारंभास मला बोलाविले याचा मला मोठा आनंद वाटत आहे. मी हे काम मोठ्या हौसेने करीत आहे.

ही संस्था मराठ्यांचे कैवारी व उदार दाते श्री. उदाजीराव पोवार महाराजसाहेब धार यांच्या औदार्याने व प्रेमाने उदयास आली. हे जे रोपटे येथे लावले गेले त्याला पाणी घालून व योग्य तऱ्हेने खत देवून त्याची वाढ करण्यास माळीही उत्तमच मिळाले. निरलस, स्वार्थपराङ्मुख, कर्तव्यनिष्ठ, सत्यावर अचल श्रद्धा असणारे, परोपकारी व आत्मीयता असणारे असे सेवक मिळाल्यावर कोणत्या संस्थेची वाढ होणार नाही? मराठ्यांचे पुढारीपण स्वीकारून त्या त्या कालास अनुरूप अशी नावाजण्यालायक कामगिरी आमच्यातील पाटीलवर्ग हमेशा करीत आला आहे, असे मराठ्यांचा इतिहास वरवर पाहाणाऱ्यास देखील दिसून येईल. मोठमोठ्या लढाया मारून, देश जिंकण्याच्या कामात ते कोणास हार गेले नाहीत. या सध्याच्या शांततेच्या काळातही हे मर्द अज्ञानरूपी लोकशत्रूशी झगडत आहेत. हे पाटील कुलभूषण कोण आहेत हे आपण जाणतच आहात. ते माझे मित्र रावबा थोरात पाटील, वणीकर व दादा मोरे पाटील, पिंपळगाव बसवंत हे आहेत. त्यांनी या संस्थेच्या उन्नतीकरिता किती झीज व कष्ट सोसले आहेत व स्वार्थत्याग केला आहे हे मजपेक्षा आपणास जास्त माहिती आहे. त्यांना साहाय्य करणारे आस्थेवाईक लोक पुष्कळच आहेत. त्या सर्वांची नावे सांगणे शक्य नाही. थोडी नावे सांगून बाकीच्यांची गाळणे उचित नाही. त्या सर्वांना त्यांच्या कामगिरीबद्दल मी शतशः धन्यवाद देतो.

वरच्या प्रपंचाची हेळसांड करून आपल्या मुलाला समाजसेवेस वाहू दिल्याबद्दल रा. भाऊसाहेब थोरात पाटील, वणी यांचेही समाजावर फार फार उपकार आहेत. ‘जसे बीज तसा अंकुर.’ मुलग्याने बापाला मागे टाकावे अशीच शहाण्या बापाची इच्छा असते. भाऊसाहेबांची इच्छा पूर्ण झाली म्हणून ते धन्य आहेत.

या बोर्डिंगचे धोरणही अनुकरणीय आहे. मराठा शिक्षण परिषदेच्या प्रसंगी मराठे लोकांच्या औदार्याने याची स्थापना झाली असताही सर्व जातींच्या मुलास याचे प्रवेशद्वार खुले ठेवण्यात चालकांनी आपल्या मनात थोरपणा व उज्ज्वल देशभक्ती दाखविली आहे. सर्व माणसे एकाच ईश्वराची लेकरे असल्याने त्यांचे परस्पराशी बंधुत्वाचे नाते आहे हे सत्यशोधक समाजाचे मुख्य तत्त्व प्रचारात आणून आपले मनोधैर्य व सत्यनिष्ठा स्पष्टपणे दाखविल्याबद्दल येथील चालकांची तारीफ करावी तितकी थोडीच. हे ' कॉस्मापॉलिटन तत्त्व ' जितक्या संस्थांतून पसरेल तितके चांगले. त्या योगाने जातिभेद मंदावून ऐक्य होण्यास चांगले साहाय्य होते.

मी प्रथमत: अगदी कॉन्झर्व्हेटिव (Conservative) म्हणजे जुन्या मताचा कट्टा अभिमानी होतो. जातिभेद कायम राहिला पाहिजे व पाळला पाहिजे असे माझे मत असे. अशा दुराभिमानाने इतरांची उन्नती होण्याच्या मार्गात मी अडथळा करतो याची जाणीव मला नसे. दुसऱ्या जातीच्या लोकांनी भरविलेल्या सभेत जाऊन अध्यक्षस्थान स्वीकारणे म्हणजे आपला धर्म बुडविणे असे मला वाटे. आजही जाति परिषदांत अध्यक्ष होणे मला पसंत नाही. पण याचे कारण मात्र पूर्वीच्या कारणाहून फार भिन्न आहे. तेव्हा मी जात्याभिमान सोडतो हे वाईट आहे असे मला वाटे. मी जाति परिषदांस उत्तेजन दिले तर जातिभेद तीव्र केल्याचे पाप माझ्या डोक्यावर येईल अशी मला आज भीती वाटते.

सर्व जातींच्या पुढाऱ्यांना माझे सांगणे आहे की, आपली दृष्टी दूरवर ठेवा. पायापुरतेच पाहू नका. जातीभेद मोडणे इष्ट आहे. जरूर आहे. जातिभेद पाळणे हे पाप आहे. देशोन्नतीच्या मार्गात हा अडथळा आहे. हा दूर करण्याचे प्रयत्न जोराने केले पाहिजेत. ही जाणीद पक्की ध्यानात ठेवून मग ह्या दिशेचा प्रयत्न म्हणून जाति परिषदा भरवा. जातिबंधन दृढ करणे, जातिभेद तीव्र होणे, हा परिणाम ह्या परिषदांचा होऊ नये ही खबरदारी घेतली पाहिजे.

जातिभेद हा स्वाभाविक आहे व तो पाळणे व राखणे समाजाच्या उन्नतीस आवश्यक आहे असे प्रतिपादन बऱ्याच वेळा उच्च दर्जाच्या लोकांकडून करण्यात येते. आपला व आपल्या पुढील संततीचा उच्च दर्जा कायम राहावा व इतरांवर सत्ता गाजविण्यास मिळावी अशी तीव्र इच्छा या प्रतिपादनाच्या बुडाशी असते.

हिंदुस्थानात आहे या प्रकारचा जातिभेद पृथ्वीच्या पाठीवर कोणत्याही दुसऱ्या देशात

नाही. या विश्वात दुसऱ्या कोणत्याही ग्रहावर तरी तो सापडेल की नाही याविषयी संशयच आहे ! हिंदुस्थानला जी गुलामगिरी आज हजारो वर्षे भोगावी लागत आहे. तिचे प्रधान कारण हा जातिभेद आहे. जातिभेदापासून नुकसानीपेक्षा फायदाच जास्त झाला आहे असे कोणास दाखविता येईल काय ?

सर्व लोकांत जातीच्या रूपाने असे अनुल्लंघ्य भेद माजल्यावर त्यांच्यात एकी होणे फार कठीण; केवळ अशक्य आहे. काही थोडा वेळ स्वार्थ साधण्यासाठी हे भेद नजरेआड करण्याचा प्रयत्न होईल. पण यापासून फलनिष्पत्ती अगदी थोडी व तात्पुरतीच. सर्व देश-भर भेद मानल्यावर एकी कशी होणार ? ती मुळीच शक्य नाही. ' जातिभद असू द्या पण जातिद्वेष मात्र नको, ' असे म्हणणारे पुष्कळ आहेत. हे मत प्रामाणिकपणाचे असल्यास त्यांच्या अज्ञानाची कीव केली पाहिजे. कारण जातिभेदाचे कार्य जातिद्वेष हे आहे. तेव्हा कार्य नाहीसे करण्यास कारणही काढून टाकले पाहिजे.

जातिद्वेष हा हिंदुस्थानचा फार पुराणा रोग आहे. परशुरामाने नि.क्षत्रिय पृथ्वी केली, या म्हणण्यात जातिद्वेषाचे प्रतिबिंब पूर्णपणे पडलेले दिसेल. पेशव्यानी ब्राह्मणेतरांच्या घरावर गाढवाचे नांगर फिरविले याचेही कारण तेच. त्यांच्या शेंडया व जानवी श्री शिवाजी महाराज व मराठे वीर यांनी रक्षण केली तेच ब्राह्मण, 'मराठे शूद्र आहेत' असे बिनदिक्कत प्रतिपादन करतात याचे कारण दुसरे कोणते ? या जातिद्वेषाची उचलबांगडी करावयाची असेल तर जातिभेदच मोडला जाहिजे. जातिभेद मोडून आपण सर्व एक होऊ या.

माझ्यावर असा एक आरोप आहे की, मी जातिभेद नसावा अशा मताचा असूनही जाति मत्सर वाढवीत असतो. हा आरोप अगदी मिथ्या आहे. जातिमत्सर वाढविण्याचा माझा प्रयत्न मुळीच नाही. जात्याभिमानाच्या, शिवाजी महाराजांच्या किंवा धर्माच्या आड राहून मी गोळया मुळीच मारीत नसतो. अशा आडून गोळया मारण्याचा मी धि:क्कार करतो. माझ्या मागासलेल्या बंधू-भगिनींना गुलामगिरीत लोटू पाहातात त्यांचा मी धि:क्कार करतो. मागे पडलेल्यांना मी सारखे, म्हणजे एका जातीचे समजतो व त्यांना वर आणण्याचा प्रयत्न करतो. हे माझे पवित्र कर्तव्य आहे असे मी समजतो. असे मी न करीन तर मी कर्तव्यविन्मुख झालो असे माझे मन मला टोचील. या मागासलेल्या जातीला वर आण-ण्याचे प्रयत्न झाले नाहीत तर जातिभेदाचे कट्टे अभिमानी वीर तिला दडपून टाकल्या-शिवाय राहाणार नाहीत; यासाठी मागासलेल्यांचा कैवार घेणे हे जातिद्वेष वाढविणे नव्हे हे उघड आहे.

जातिभेद मोडून, केवळ जन्माच्या सबबीवर दुसऱ्यास हीन मानण्याचे नाहीसे होईल व या रीतीने जातिद्वेषाचा नायनाट होईल, तो सुदिन असे मी समजेन ! मी जातिभेद नसावा म्हणतो व जातिभेद मोडण्याचा जाहीररीतीने प्रयत्नही करतो. तथापि माझे सभोवतालचे लोकांतून जातिभेदाचे बंध मला तोडता येत नाहीत म्हणूनच मी तुमचा अध्यक्ष होण्यास खरोखरच योग्य नाही. मी असे काही मूर्ख लोक पाहातो की, ते आपल्या बंधुभगिनींना पशुपेक्षा व गोमयाहूनही नीच समजतात. पण सर्व लोकांचे आपण पुढारी आहो असे भासवून तुमचे चांगले करू अशा थापा देऊन फसविण्यात त्यांना शरम वाटत नाही.

जपानातील सामुराई लोकांनी आपला जन्माने प्राप्त झालेला उच्च दर्जा सोडून दिला म्हणून जपानमध्ये ऐक्य होऊन त्या देशाची उन्नती झाली. त्याप्रमाणे ब्राह्मणांनी जातिमत्सर सोडल्याशिवाय आमच्या लोकांची उन्नती होणार नाही. सर्व जातींना हात देऊन त्यांना आपल्याबरोबर घेऊन सर्वांची स्थिती सुधारणे हे काम क्षत्रियांनी अवश्य केले पाहिजे. ते त्यांचे कर्तव्य आहे. ब्राह्मण लोकांना जन्मसिद्ध धार्मिक बाबतीत श्रेष्ठपणा आहे. त्याच्या जोरावर त्यांची एक 'धार्मिक ब्युरॉक्रसी'च झाली आहे. ही ब्युरॉक्रसी मोडल्याशिवाय व सर्वांस धार्मिक बाबतीत सारखे हक्क मिळाल्याशिवाय कधीही देशोद्धार होणार नाही यासाठी आमच्या लोकांनी ब्राह्मणांकडून पूजा करविणे व त्यांच्याकडून धर्मकृत्ये चालविणे, हे सोडले पाहिजे. तसेच त्यांच्याकडून धर्मग्रंथ किंवा कथा, पुराणे वगैरे ऐकण हेही सोडले पाहिजे. नाहीतर ब्राह्मणांच्या श्रेष्ठपणाच्या कथाच आमच्या लोकांच्या कानावर येणार. आमचेच पूर्वज राम-कृष्ण यांची पूजा, ब्राह्मण लोक करितात यावरून ब्राह्मणाचा दर्जा व जात आमच्यापेक्षा हलकी आहे हे उघड आहे. असे असूनही ते आम्हांस हीन लेखतात. तेव्हा त्यांना सोडून आमची कामे आम्हीच चालवावीत असे माझे ठाम मत आहे. मी इतके स्पष्टपणे बोलत आहे त्याबद्दल माफी असावी.

मी ब्राह्मणांवर प्रेम करीत असताही जर ते माझा द्वेष व तिरस्कार करतील तर मलाही जशास तसे वागावे लागेल. त्यांची माझ्याशी प्रेमाची वागणूक आढळून येईल तरच मी माझ्या घरच्या देवांची पूजा व इतर धर्मकृत्ये ब्राह्मणांकडून करवून घेण्याचे चालू ठेवीन. नाहीतर ब्राह्मण पुजाऱ्यांना बंद करून माझ्या घरच्या देवाची पूजा मी मराठे पुजाऱ्याकडून करवून घेईन. ते मला मनुष्य समजत असतील तरच त्यांच्याकडे पुजारीपणा ठेवीन आणि जर का ते मला जनावराप्रमाणे समजतील तर मी ठेवणार नाही.

ब्राह्मणांनी एकतर सामुराई लोकांप्रमाणे जातिमत्सर सोडले पाहिजेत तरच जपानी लोकांप्रमाणे देशाची उन्नती होईल, नाहीतर मुळीच होणार नाही. क्षत्रियांचे मात्र कर्तव्य

आहे की, सर्व जातींना हात देऊन चालविणे. ब्राह्मणांची 'रिलिजस ब्युराक्रसी ( Religious Beauracracy ) तुटून पडल्याशिवाय कधीही देशोद्धार होणार नाही. सबब ब्राह्मण पुजारी व ब्राह्मणांकडून धर्म ऐकण्याचे सोडले पाहिजे.

'लोकसंग्रह' चे एडिटर विद्वान् व माझ्यापेक्षा शहाणे आहेत. मी त्यांचा कित्ता घ्यावा हे बरोबर आहे. त्यांनी माझ्या भाषणाचा विपर्यास केला आहे. सर्व भाषण वाचून माझी योग्य चूक दाखवून, तसे त्यांनी माझ्या पदरात घातले असते तर त्यांचे ते कृत्य वंद्य व पूज्य मानले असते. त्यांचा 'हम करेसो कायदा' चालणार नाही. प्रेमाने प्रेम वाढते व द्वेषाने द्वेष वाढतो. प्रेमाने जनावरास वागविले तर ते जनावरदेखील उलटे प्रेम करते. मी स्पोर्टस्‌मन आहे. मी माझा चित्ता आफ्रिकेहून आणविला आहे आणि तो कोल्हापुरापासून दोनशे मैलांवरील जंगलात सोडला. तेथून तो मालकास हुडकीत परत आला ! जनावरे प्रेमाने वागविली तर इतके प्रेम दाखवितात, तोच चित्ता जुलूमाने वागविला असता तर पळून गेला असता, मनुष्याला चावला असता; हे आमच्या पुढाऱ्यांना कळू नये काय? इतरांना हीन किंवा अस्पृश्य म्हणण्यात त्यांचा काय मोठेपणा वाढणार आहे?

मुंबई, सोलापूर, अहमदाबाद, अमृतसर व लाहोर वगैरे ठिकाणी जे दंगे झाले त्यात सुशिक्षित पुढारी मागे राहून गरीब लोकांवर प्रसंग आला, याचे कारण त्यांचे अज्ञान. पुढाऱ्यांचा कावा त्यांना समजला नाही. लोकांस थोडे जरी शिक्षण असते तरी असे प्रकार झाले नसते !

महात्मा गांधी, डॉक्टर सत्यपाल व किचलू यांच्याविषयी माझी मोठी पूज्यबुद्धी आहे. हे दंगे त्यांनी मुद्दाम करविले असे म्हणण्याचे धाष्टर्य मी केव्हाही करणार नाही. त्यांच्या हाताखालच्या लोकांच्या चुका झाल्या व या चुकांचे शितोडे या थोर विभूतींवर उडाले एवढेच मी म्हणतो. 'राजकारण' कर्त्यासारख्या मजवर टीका करणाऱ्यास माझी विनंती आहे की, त्यांनी माझे समग्र भाषण देऊन, प्रत्येक पॅरेग्राफसमोर त्यावर आपली टीका असेल ती छापावी. असे केले म्हणजे लोकांस आपले मत देण्यास बरे पडेल. अर्धाअधिक मजकूर गाळून थोडेसे अवतरण घेतल्याने माझ्या सांगण्याचा विपर्यास होतो. 'राजकारण' कर्त्यास अशी विनंती करणे हे मी मोठे धाडस करितो अशीही भीती वाटते. कारण मग त्यास विरुद्ध टीका करण्यास स्थळे कमीच मिळतील.

युरोपातील किंवा आमच्या देशातील थोर पुरुषांचे वर्तनभेद, त्या मोडण्याच्या आवश्यकतेची साक्ष देत आहे. ल्यूथर व श्री शिवाजी महाराज यांची चरित्रे आम्हास हेच शिकवितात.

श्री शिवाजी छत्रपतींनी तर मुसलमानांचे मराठे करून घेतले व देशकार्याकरिता महारमांगांचे रिसाले व तोफखाने तयार करून; स्पर्शास्पर्शाच्या विचारास जबरदस्त धक्का दिला.

आमचे खरे महात्मा बादशहा अकबर शहा हेच आहेत. ज्याने हिंदू-मुसलमानांची एकी घडवून आणली व खुद्द स्वतः जोधाबाई नावाच्या रजपूत स्त्रीशी लग्न करून तिला हिंदूच राहू दिले व सूर्याला अर्घ्य देण्याकरिता लाखो रुपये खर्च करून व्यवस्था केली, त्याची साक्ष हल्ली आग्र्याचा किल्ला देत आहे. जी गोष्ट विसाव्या शतकात अशक्य झाली आहे ती सतराव्या शतकात यवन बादशहाने शक्य केली होती.

इंग्रजी राज्याचे धोरण प्रजेस विद्या देणे हे आहे: इंग्रजी शिक्षणाची द्वारे सर्वांना खुली केली. महाराणी व्हिक्टोरिया व त्यांचे पुढील राजे यांच्या कारकीर्दीत सर्व जातींना विद्यामृतपानाची जशी संधी मिळाली तशी रामकृष्णाच्या काळीही कोणास मिळाली नाही. परंतु विद्यामृतपानाची मोकळीक सर्वांस झाली तरी या पोया बहुतांशी ब्राह्मणांच्या ताब्यात राहिल्याने हे अमृत ब्राह्मणेतरांपैकी फारच थोड्यांस मिळाले. बहुतेक फायदा ब्राह्मणांचाच जास्त झाला. यामुळे आता स्वराज्याच्या हक्काची मागणी करताना त्यांचीच ओग्ड जास्त आहे व स्वराज्याचे अधिकार मिळतील ते सर्व आमच्या ताब्यात राहावेत अशी त्यांची खटपट आहे. हे अधिकार त्यांच्या एकटयाच्या पदरात पडू नयेत, इतर जातीसही त्यात हिस्सा मिळावा असे प्रतिपादन करणारे लोक त्यास देशद्रोही, देशबुडवे दिसतात.जातवार प्रतिनिधींचा हक्क मागणाऱ्यांना अशा शेलक्या शिव्या व शाप देण्यात येत आहेत.

माझ्या चिमुकल्या राज्यातील प्रजाजनांनी एका बाबतीत तरी विशेष नाव कमावले आहे, हे मी अभिमानपूर्वक सांगतो. त्यांचे उदाहरण लोकांपुढे आल्याने हा कित्ता पुष्कळ ठिकाणी गिरविला गेला आहे. ब्रिटिश पार्लमेंटला 'मदर ऑफ पार्लमेंटस्' ( Mother of Parliaments ) असे मोठ्या अभिमानाने इंग्रजी व इतर लोक म्हणतात. त्याचप्रमाणे कोल्हापुरास 'मदर ऑफ बोर्डिंग हाऊसेस' ( Mother of Boarding Houses ) म्हणजे 'विद्यार्थी वसतिगृहांची माता' असे सार्थ यश मिळाले आहे. तेथे मराठा, जैन, लिंगायत, सारस्वत, मुसलमान, दैवज्ञ, पांचाळ, शिंपी, कायस्थ, प्रभु यांच्या मुलांकरिता विद्यार्थी वसतिगृहे आहेत. आर्यसमाज सर्वांस सारखे लेखून गुरुकुल चालवीत आहे. शिवाय अस्पृश्य लोकांच्या विद्यार्थ्यांकरिता अशी संस्था काढून अस्पृश्यांचा अस्पृश्यपणा काढून टाकण्यामध्येही गरीब अशा कोल्हापुरच्या लोकांनी पुढाकार

घेतला आहे. मागासलेल्या लोकांपैकी काही लोकांस वकिलीचीही परवानगी देण्यात आली आहे. समाजातील कृत्रिम उच्चनीच भाव नाहीसे करणे, तसेच स्त्रियांची योग्यता वाढविणे या संबंधाने समाजसुधारणेस साहाय्य करणारे असे प्रगतीपर कायदे करण्यातही कोल्हापुरचा पाय पुढेच आहे. या कामी मन:पूर्वक उत्साहाने मदत देणाऱ्या माझ्या लाडक्या प्रजेचे मी अभिनंदन करितो व त्यास धन्यवाद देतो !

सर्व जातीचे लोक पुढे येऊन सामाजिक, औद्योगिक, शिक्षणविषयक, सरकारी नोकरी वगैरे सर्व बाबतीत आपआपली जबाबदारी पुरी पाडण्याचे सामर्थ्य त्यास येणे याला मी 'जातवार प्रतिनिधित्व' ( Communal Representation ) म्हणतो. मागे पडलेल्यांना अशा प्रकारे पुढे येण्यास उत्तेजन देणे हे माझे कर्तव्य आहे असे मी मानतो. जनतेला व त्याचप्रमाणे हीन स्थितीतील लोकांस वर काढण्यास मी हातभार लावीत असतो. वयात आलेल्या व आपले हिताहित कळणाऱ्या मुलाकडे लक्ष देण्याची आईबापास जरूरी नसते. पण जी अज्ञान आहेत, ज्यांना चालता येत नाही, ज्यांना धड उभेही राहाता येत नाही त्यांची काळजी आईबापास घ्यावी लागते. कोणास हाताचा आधार द्यावा लागतो व कोणास उचलूनही घ्यावे लागते.असे करणारे आईबाप योग्य तऱ्हेने आपले कर्तव्य बजावितात असे होते. सर्व मुलांस सारखे वागवीत नसल्याने ते मुलामुलांत पक्षपात करतात असा त्यांच्यावर आरोप करणे हे अधमपणाचे होईल. हेच तत्त्व लक्षात घेऊन मी अगदी निकृष्ट स्थितीत असलेल्यांस जास्तीत जास्त उत्तेजन देत आहे. त्यांना नोकऱ्या सढळ हाताने दिल्या जात आहेत व वकिलीच्या सनदाही त्यांना देऊन त्यांचे शिक्षण, दर्जा व महत्त्व वाढविण्यात येत आहे. याप्रमाणे विद्यामृताचे झरेच त्या त्या जातींना दाखवून दिले असल्याने त्यांची उन्नती झपाटयाने होईल अशी मला मोठी आशा आहे ब्राह्मणेतरांनाही याच तत्त्वावर विशेष उत्तेजन मला द्यावे लागले. या माझ्या सरळ वर्तनास ब्राह्मणद्वेष असा खोटा दोष लावण्यात येत आहे. पण हा आरोप कदाचित् प्रामाणिकपणानेही करण्यात येत असेल !

अलिकडचे काही राजकारणी ब्राह्मण म्हणतात की, ब्राह्मणच आजपर्यंत पुढारीपणा घेत आले व आताही घेत आहेत. म्हणून त्याचा हेवा वाटून त्यांचे पाय मागे ओढण्याकरिता जातवार प्रतिनिधीसारख्या मागण्या केल्या जात आहेत. पण खरी स्थिती तशी नाही आमची ब्राह्मण बंधूस हीच विनंती आहे की, आपण या कामी फार पुढे गेलेले आहात् आपणास धावण्याची शक्ती आहे. आम्ही आता कोठे रांगत आहोत. थोडेथोडे पडतझडत उभे राहण्याचा प्रयत्न करीत आहोत. आमचे श्रम वाचविण्याकरिता आमच्यावरील प्रेमामुळ आपण आम्हास उचलून नेण्यास तयार आहात. पण आपल्या प्रेमाचा व कळकळीचा परिणाम आमच्या नुकसानीचा होईल. आम्हाला आपण रांगू दिले नाही व पडतझडत उभे

राहू दिले नाही तर आम्ही कायमचे पंगू होऊ. याकरिता आपण आमच्या रांगण्याचे व उभे राहण्याचे कौतुक करा व उत्तेजन द्या. प्रतिबंध करु नका. आमची धडपड आमच्या अंगी शक्ती येण्यासाठी आहे. आपल्या द्वेषामुळे आम्ही ती करितो ही समजूत चुकीची आहे, असे आम्ही आमचे पुढारी म्हणविणाऱ्यास नम्रपणे सांगतो.

काही वर्तमानपत्रकारांचा माझ्यावर असा आरोप आहे की, मी माझ्या लोकांस स्वराज्य देण्यास बिलकूल कबूल नाही. हा आरोप अगदी खोटा असून तो माझ्याविषयी गैरसमज व्हावा म्हणून, माझ्या म्हणण्याचा विपर्यास करून मुद्दाम करण्यात येत आहे. याबद्दल मला फार दिलगिरी वाटते. ज्या भाषणासंबंधाने हा आरोप करण्यात येतो ते भाषण करताना मी म्हणालो होतो :

†"But if I may be allowed to express an opinion at this stage, I would only say that I, for one, would hesitate to make any consitutional changes in my state in the direction of the Reforms until the general level of education among the masses has risen and is at lest, partially equalised with that of the higher classes."

यावरुन माझ्या म्हणण्याचा विपर्यास मुद्दाम कसा करण्यात आला हे आपल्या ध्यानी येईलच. मतदार संघास आपले हक्क समजून त्यांचा उपभोग घेण्याची पात्रता थोड्या बहुत अंशाने तरी त्यांच्या अंगी येण्यापूर्वी व लहानसहान जातीस देखील विद्येची गोडी लागण्यापूर्वी स्वराज्य देणे मला सुरक्षित वाटत नाही.

शेकडा ७० । ८० लोकांची तयारी नसताही असे अधिकार लोकांस दिले गेल्यास ते अल्पसंख्याकांच्या हातात पडतात व जातिभेदाने जखडलेल्या आमच्या देशात ते एकाच जातीच्या हाती जाऊन स्वार्थबुद्धीने त्यांना इतरांचे भयंकर नुकसान करण्यास संधी मिळते. आर्य व अनार्य यांच्यामागील इतिहास, त्याचप्रमाणे पेशवाईचा अलिकडील इतिहास या माझ्या म्हणण्यास भक्कम पुरावे देतील. स्वार्थाची साधने हाती आली म्हणजे चांगले लोकही वाईट व जुलूमी होतात. मग ज्यांनी आज पिढ्यान्‌पिढ्या इतरांस गुलामगिरीत खितपत ठेविले आहे व ज्यांची इच्छा तसेच वागण्याची रीत उघड उघड दिसत आहे; त्यांच्या हाती सर्व सत्ता जाऊ नये याविषयी खबरदारी घेण्याची केवढी आवश्यकता आहे हे सांगण्यास पाहिजे असे नाही. माझ्या भाषणाचा आशय असाच आहे. 'केसरी' वगैरे जहाल पत्रांचे धोरण व कावा कसा आहे हे आपणास माहीत आहेच.

***

† **"बहुजनसमाजाचा शिक्षणाबाबतीतला दर्जा वाढून, वरिष्ठ वर्गाच्या बरोबरीने अंशतः तरी तो आल्याशिवाय सुधारणेच्या दिशेने माझ्या संस्थानच्या राज्यकारभारात लोकांस हक्क देण्याविषयीचा बदल करण्याला हात घालण्यास मी धजावणार नाही"**

प्राथमिक शिक्षण सक्तीचे करण्याच्या अगोदर सध्या उपयोगात असलेली शाळागृहे विस्तृत व हवेशीर केली पाहिजेत व तिकडे खर्च करण्याची जास्त जरूरी आहे हें ' केसरी ' चे प्रतिपादन कोणाही सरळ बुद्धीच्या माणसास चीड आणील. (No cake to a few until all are served with bread) हे इंग्लंडातील मजूर पक्षाचे धोरण आहे. पण येथे शेकडा ९० लोक उपाशी आहेत व दहा लोक खात आहेत. उपाशी लोकांना कोंड्याच्या भाकरीचीही सोय करण्याअगोदर या दहांच्या पोळीवर साजूक तूपे वाढा असा ओरडा करणाऱ्यांना रयतेची कळकळ कितपत आहे हे उघड होत आहे. लिंगायत, जैन वगैरे व्यापारी कौन्सिलात जाऊन काय तागडी धरावयाची आहे ? शेतकऱ्यांनी काय तेथे नांगर चालवायचा आहे ? असे कुत्सित विचार आपल्या पत्रात घालण्याची व सभेत बोलण्याची यांना लाज कशी वाटत नाही हे मला समजत नाही. इंग्रज अधिकाऱ्यांच्या हातून सत्ता काढून घेऊन ती विद्यासंपन्न अशा अल्पसंख्यांक ब्राह्मण वर्गाच्या हाती देणे मला बिलकूल पसंत नाही. परशुरामाच्या वेळेपासून आजपर्यंत इतिहास काय सांगतो ? विद्येचा महिमा फक्त आपणाकडेच ठेऊन इतरांस विद्येपासून दूर ठेवण्याचा अखंड पद्धतशीर प्रयत्न सतत करून 'ब्राह्मण ब्युरॉक्रसी'ने या दक्षिणेत इतरांस गुलामाच्या स्थितीत कसे आणिले आहे ही गोष्ट विसरणे कठीण आहे.

खालच्या वर्गाच्या लोकांच्या बुद्धीवर व ज्ञानावर हे जे जड व जुलूमी जू लादले आहे ते झुगारून देण्याची शक्ती समाजाच्या अंगी येण्यास सक्तीच्या व मोफत प्राथमिक शिक्षणाची फार जरूरी आहे. असले शिक्षण मी माझ्या रयतेस देण्यास प्रारंभ केला आहे. त्याकरिता सक्तीच्या शिक्षणाचा कायदा करून तो जारीने अंमलात ठेविला आहे. यामुळे पुढील पिढी तरी लवकरच लिहिणारी / वाचणारी होईल अशी मला खात्री आहे.

प्राथमिक शिक्षणावर माझा भर आहे. तरी दुय्यम व उच्च शिक्षणाकडे माझे लक्ष कमी नाही. माझे संस्थान सातारा व बेळगाव या जिल्ह्यांपेक्षा लहान असताही आमच्याकडे सात हायस्कूले चालू आहेत. दोन लवकरच सुरू होतील. शिवाय युनिव्हर्सिटीचे पुरे शिक्षण देणारे एक कॉलेजही आहे.

माझ्या रयतेमध्ये प्राथमिक व उच्च शिक्षणाचा प्रचार करण्याची माझी इतकी जोराने खटपट चालली आहे; यावरून शक्य तितक्या लवकर रयतेस स्वराज्य देण्याचे माझे धोरण आहे हे आपले ध्यानी येईलच. माझी सर्व प्रजा, मराठी तिसरी इयत्ता जरी शिकून तयार झाली असती तरी त्यांना राज्यकारभाराचे हक्क आनंदाने देऊन मी आजच विश्रांती घेतली असती. आज पिढ्यान्‌पिढ्या जी रक्कम माझे पूर्वज व मी खाजगी खर्चाकरिता

घेत आहोत तितकीच रक्कम माझ्या प्रजेला विनंती करून त्यांच्याकडून घेऊन बाकीच्या उत्पन्नाची व्यवस्था माझ्या प्रजेच्या सुखाच्या व उन्नतीच्या प्रित्यर्थ खर्च करावी असे मी ठरविणार आहे.

आज राज्यकारभाराचे सर्व काम मलाच करावे लागत आहे. प्रजेवर फक्त कर देण्याची जबाबदारी आहे. पुढे कर देणे व योग्यतो खर्च करणे ही जबाबदारी रयतेवर पडल पण माझी प्रजा ही जबाबदारी घेण्यास अगोदर पूर्णपणे नसली तरी अंशतः तरी पात्र झाली पाहिजे. म्हणजे रयतेतील थोडासा भाग पूर्ण सुशिक्षित होण्यापेक्षा सर्व रयतेला प्राथमिक शिक्षणाचा थोडातरी अंश मिळाला पाहिजे असे माझे मत आहे. रयतेमधील मोठा भाग अडाणी राहिला, थोडेसे लोक विद्याचारसंपन्न झाले व प्रजेस अधिकार दिले तर ते या थोडया लोकांच्या हाती पडणार व 'स्वदेशी ब्युरॉक्रसी, तयार होणार. या 'सुशिक्षित ब्युरॉक्रसी ' चा कारभार आमच्या ओळखीचा आहे. फार लांब कशाला, मराठयांचा इतिहास पहा. शाहू महाराजांची भूल होऊन पेशव्यास अधिकाधिक सत्ता बळकाविण्यास संधी मिळाली. याचा परिणाम छत्रपतींचा कारागृहवास हा झाला. जातिभेद तीव्र झाले जातिमत्सर वाढला व अस्पृश्यास तर गळयात गाडगे व कंबरेस फेसाटी बांधून फिरावे लागे. हा प्रसंग कुठेही पुनः येणे चांगले नाही. याकरिता अधिकारदान करण्यापूर्वी सर्व लोकांत विद्याप्रसार करण्याकडे अगोदर लक्ष देणे जरूर आहे.

मुलगा कर्ता झाल्यावर त्यावर संसाराचा भार टाकून विश्रांती घेण्याची आमची आर्यपद्धती आहे. त्याप्रमाणे माझ्या प्रजेची योग्यता वाढवून, त्यांच्या हाती सर्व कारभार सोपवून मांझ्या खर्चापुरती एक ठरीव रक्कम पेन्शनदाखल• घेऊन मी केव्हा मोकळा होईन असे मला झाले आहे. हा माझा हेतू जगदीश कृपेने लवकरच पूर्ण होवो.

माझ्या म्हणण्याचा विपर्यास होऊ नये म्हणून मी पुन्हा माझे म्हणणे स्पष्ट करितो. गाडयाची दोन्ही चाके चांगली व मजबूत पाहिजेत. त्याशिवाय गाडा बरोबर चालणार नाही. तसेच गाडयाचे जू ही मजबूत पाहिजे. इंग्रजी मुलखात सुधारणेच्या नवीन कायद्याने नोकरशाही व लोकशाही यांच्यामध्येच सत्ता विभागली गेली आहे. यामुळे नोकरशाहीच्या हातची सत्ता क्रमाक्रमाने लोकांकडे जाण्याची तजवीज करण्यात आली आहे. पण संस्थांनी मुलाखात ही पद्धती उपयोगी पडेल असे वाटत नाही. कारण तेथे सत्ता चार ठिकाणी विभागली जाणार: प्रजा, लोकशाही, राजा व ब्रिटिश गव्हर्नमेंट. अशी चार शकले राजसत्तेची करून क्रमाने अधिकार प्रजेकडे देणे सोयीचे नाही. त्यापासून पुष्कळ अडचणी उत्पन्न होतील. माझ्या रयतेस कर्तव्याची जाणीव पूर्णपणे आली म्हणजे एकदम सर्व

राज्यकारभार त्यांच्याकडे सोपविण्यास मी केव्हाही तयार आहे. एवढी जबाबदारी ओळखण्याची पात्रता रयतेत येईपर्यन्त माझे मन फार साशंक राहील. प्रजेला पूर्ण हक्क दिले म्हणजे राजा फक्त नावाचा मार्गदर्शक. संस्थानची प्रजा ही ब्रिटिश सरकारास जबाबदार राहणार. अशी भिन्न परिस्थिती असल्याने खालसातील सुधारणांच्या योजना सर्वांशी लागू करणे धोक्याचे आहे. यासाठी ही सुधारणा घडवून आणण्यास उपाययोजना चांगली विचारपूर्वक झाली पाहिजे.

' आधी राजकीय सुधारणा की आधी सामाजिक सुधारणा ' हा वाद समंजसपणाचा नाही. या सुधारणा स्वतंत्र नाहीत. एकात एक गुंतलेल्या आहेत. जणु काय या दोन सुधारणा राष्ट्रोन्नतीच्या गाड्याची दोन चाकेच आहेत ! एकच चाक लावून गाडा सुरक्षित नेणे शहाणपणाचे होईल काय ? या गोष्टी विचाराने सिद्ध आहेत. पाश्चात्य देशांचा अनुभवही हेच सांगतो. राजकीय सुधारणा अगोदर पाहिजेत. सामाजिक सुधारणेची तूर्त जरूरी नाही असे प्रतिपादन ऐकू येते तेव्हा तेथेच काहीतरी पाणी मुरत आहे असे समजावे. हे बोलणे कपटी काव्याचे असते.

वास्तविक पाहाता इंग्रज सरकारने प्रजेत शिक्षणाचा सार्वत्रिक प्रसार करण्याचे काम आपल्या प्रत्यक्ष नजरेखाली घेऊन ते योग्यप्रकारे फैलावल्यावर मग स्वराज्याचे हक्क रयतेच्या स्वाधीन करणे हेंच योग्य आहे. बरे असो. आजपर्यंत झाले ते झाले. आता तरी मिळालेल्या स्वराज्याच्या हक्काची जबाबदारी ओळखून पुढारलेले लोक स्पर्शास्पर्शाचे बंड मोडून, इतर सुधारलेल्या लोकांप्रमाणे सर्व प्रजाजन आपले देशबांधव आहेत अशी जाणीव बाळगून, निःपक्षपातबुद्धीने त्यांना विद्या देतील व माझे मित्र रावबा थोरातांचे उदाहरण गिरवितील अशी मी आशा करितो.

क्वीन व्हिक्टोरिया या ईश्वरअंशी राज्यकर्त्या होऊन गेल्या. त्यांच्या कारकीर्दीत हिंदुस्थानची व सर्व ब्रिटिश साम्राज्याची फार भरभराट झाली. पुण्यकीर्ती जॉर्ज बादशहाची कारकीर्दही विशेष भरभराटीची होऊन सर्वांस उन्नती प्राप्त होऊन सुख लागेल अशी मला खात्री वाटत आहे.

शेवटी आजच्या प्रसंगी ' राजकारण ' पत्राचे सुप्रसिद्ध संपादक रा. दामले, बी. ए, एलएलबी; यांचे मनःपूर्वक आभार मानितो. कारण त्यांनी माझ्या बऱ्याच चुका माझ्या नजरेस आणिल्या आहेत. अशाच माझ्या चुका त्यांनी वरचेवर काढाव्या व मला सुधारावे. ते माझ्यापेक्षा अनुभवाने व म्हणून वयानेही वृद्ध आहेत. शिक्षणात तरी त्यांची माझी

तुलना होणेच शक्य नाही त्यांनी आपले आयुष्यच देशकार्यास वाहिले आहे. 'राजकारण' ( Politics ) हा तर त्यांच्या आवडीचा विषय. रात्रंदिवस या विषयाचा निदिध्यास. राजकारणी लोकांत यांचे हमेषचे वागणे. माझे सारे आयुष्य घोडे व जनावरे यांची पैदास करणे, शिकार खेळणे, मल्लविद्या व इतर शरीरवृद्धीचे खेळ यात गेले. राजकारणाचा अभ्यास माझ्या हातून झालेला नाही. दामले माझे गुरु होण्यास योग्य आहेत. त्यांनी माझ्या चुका वारंवार काढाव्यात व त्या दुरूस्त कराव्यात. त्यांनी मला भेटून युक्तिवादाने माझी खात्री करावी म्हणजे माझी वास्तविक सुधारणा होईल. माझी जी प्रामाणिक समजूत आहे किंवा होईल त्याप्रमाणे मी बोलतो व वागतो. याला पाहिजे तर दुराग्रह म्हणा. प्रत्येकाला भाषण स्वातंत्र्य, या दिवसात आहे अशी माझी समजूत आहे. त्याप्रमाणे मी वागत आहे. माझ्या कल्याणाची अशीच आस्था ' राजकारण ' कर्ते व इतर देशभक्त यांनी बाळगावी अशी माझी त्यांस विनंती आहे.



तीन

# हत्तीचे बळ



राजर्षींनी कोल्हापूर संस्थानात सक्तीच्या मोफत प्राथमिक शिक्षणाचा कायदा केला. तसेच माध्यमिक व उच्च शिक्षणाचीही सोय केली. कोल्हापूर शहराच्या विविध भागांत, गटागटाने अनेक जातवार वसतिगृहे सुरू केली. त्यामुळे मत्सराने पेटलेल्या ब्राह्मण पुढाऱ्यांनी त्यांच्यावर अनेक आरोप तर केलेच शिवाय त्यांनी ब्राह्मणेतरांच्या कार्यापासून परावृत व्हावे म्हणून जॅक्सन, रॅंड यांच्याप्रमाणे अवस्था होईल अशा धमक्याही दिल्या.

'हत्तीचे बळ' मध्ये, प्रारंभीच या भ्याड प्रवृत्तीचा राजर्षींनी समाचार घेतला असून त्या संदर्भात ते म्हणतात: " तेव्हा ब्राह्मण लोकांनी चिडून, खोटी कारस्थाने रचून इंग्रज सरकारचा गैरसमज केला व त्यांस ( साताऱ्याचे श्री प्रतापसिंह महाराज ) गादीवरून दूर करविले. अशीच भीती मलाही ते आज घालीत आहेत, पण मी ईश्वरी व इंग्रजी न्यायावर व आपल्यासारख्या खऱ्या देशप्रेमी स्नेह्यांच्या सहानुभूतीवर विश्वास ठेऊन, स्वस्थ मनाने माझे कर्तव्य करीत राहीन. आपले काम आपण करून आपण· लोकांनी - काय केले पाहिजे हे सांगताना राजर्षी म्हणतात, " अशा ब्राह्मणेतर सभा जागोजागी भरल्या पाहिजेत. . . प्यारे बंधू हो, एक व्हा, जोराचा यत्न करा व बौद्धिक गुलामगिरीतून सुटून जा. स्वतंत्रतेकरिता जीव द्या. काय वाटेल ते करा. परंतु तुम्हाला जे पशूप्रमाणे वागवितात त्यांच्यापासून स्वातंत्र्य मिळवा. बारीकसारीक भेद विसरून ....



हुबळी : २७ जुलै, १९२०

कर्नाटक ब्राह्मणेतर सामाजिक परिषदेच्या समारोपप्रसंगी शाहू महाराजांनी दिलेले भाषण

परमेश्वराच्या घरी जे ऋजू आहे व शुभ आहे तेच कृत्य करा; अन्यायानें वागू नका. यासाठी सामाजिक व धार्मिक सुधारणांमध्ये मनोधैर्य धरा आणि एक राष्ट्र करा. मग तुमच्यात राजकीय सुधारणेस जोर येईल."

ब्राह्मणेतरांना सर्वांगीण शिक्षणाच्या माध्यमातून 'आत्मबळ' देताना, सामान्यांच्या अंगामनामध्ये चेतावणी निर्माण करण्याची राजर्षींची अष्टावधानी सावधगिरी लक्षणीय आहे.



# तीन

# हर्तीचे बळ



काही वर्षापूर्वी काही ब्राह्मण पुढाऱ्यांनी लोकसेवेचा मोठा आव आणून प्राथमिक शिक्षण सरकारने दिले पाहिजे असा ओरडा केला. परंतु पुढे त्यांनी स्वत: काय केले ? फक्त तोंडाची वाफ दवडली एवढेच ! तेच दुसरे उदाहरण घ्या. आय. सी. एस्. ची परीक्षा हिंदुस्थानातही सुरु झाली पाहिजे अशी चळवळ सुरू केली, चालू ठेविली व कमिशन नेमून घेतले. परंतु आमच्या सुदैवाने त्यांत त्याना यश आले नाही. त्यातील इंगित आपण नीट ध्यानात घ्या. जर प्राथमिक शिक्षणाची खटपट ते मनापासून करते तर ज्याप्रमाणे आय. सी. एस्. परीक्षेकरिता फंड उभारला, त्याचप्रमाणे, प्राथमिक शिक्षणाकरिता फंड उभारून गावोगाव मास्तर पाठवून प्राथमिक शिक्षणास सुरुवात करणे त्यांना अशक्य होते काय ? आय. सी. एस्. च्या खटपटीला व कॉलेज स्थापन करण्याला मात्र भरपूर पैसा मिळतो. पण प्राथमिक शिक्षणास मात्र या लोकांजवळ पैसा नाही. का ? त्याच्या योगाने ब्राह्मणेतरांस फायदा झाला असता हेच त्यातील इंगित होय.

अनाथ बालिकाश्रमासारख्या संस्था सर्वांच्या पैशावर उभारल्या जातात. परंतु त्यांच्या नियमांचे निरीक्षण केल्यास मलई सर्व ब्राह्मणांच्याच पदरी पडते असे दिसून येते. त्यातील एकच नियम घ्या. ज्या जातीत पुनर्विवाहाची चाल नाही अशांच्या विधवांना फक्त या संस्थेमध्ये घेता येईल, असा तो नियम आहे. म्हणजे ब्राह्मण व मराठे अशा दोनच जाती राहिल्या. त्यात मराठ्यांत बहुतेक पडदा आहे. म्हणजे आश्रमाचा फायदा घेणारे फक्त ब्राह्मण राहिले. ब्राह्मणेतरांनी पैसे मात्र द्यावे. फायद्याची आशा धरू नये. अशा या ब्राह्मण–काव्यास फसू नका. आपले शिक्षण आपल्या हाती घ्या व उन्नतीच्या मार्गास झपाट्याने लागा.

ब्राह्मण व ब्राह्मणेतरांच्या वादास आता कोठे थोडे रूप घेऊ लागले आहे. वर्तमानपत्रात माझी नालस्ती सुरू झाली आहे.धाकधमकी दाखवून व त्यांच्या सभ्यतेला अनुरूप असे माझ्या व माझ्या घरच्या मंडळींविरूद्ध वर्तमानपत्रात रोज येत आहे. या उपरही जर मी भ्यालो नाही व अशा चळवळीतून अंग काढून घेतले नाही तर ज्याचा उपयोग त्यांनी जॅक्शन, रँड व जाधवराव यांजवर केला अशा अति नीच, भ्याड व सभ्यतेला न शोभण्याजोग्या त्यांच्या हत्याराची योजना माझ्याविरूद्ध केली जाईल अशीही मला ते भीती घालतात. परंतु असे भ्याड व मनुष्यजातीस लाजवणाऱ्या हत्याराचा उपयोग करून त्यांची मनीषा तरी ईश्वर तृप्त करो !

ब्राह्मणेतरांची उन्नती काही द्वेषी व उपद्व्यापी लोकांस इतकी असह्य होते की, त्या उन्नतीच्या मार्गात अडचणी आणाव्या अशी त्यांना इच्छा होते. आपली ब्राह्मणेतर परिषद करण्याचे ठरल्यावर हुबळी येथील बाजारास आग लागावी व गेल्या रात्रीच श्रीनंदीची मूर्ती भग्न व्हावी, या गोष्टी आमच्या मार्गात विघ्न आणण्याच्या उद्देशाने तर केल्या नसतील ? अशा गोष्टींनी नाउमेद होण्याचे कारण नाही. आम्ही मुळीच नाउमेद होणार नाही. उलट आमचा उत्साह असाच वाढणार आहे. असले प्रयत्न आमच्यातील बंधुप्रेम वाढवितील यात मला तरी शंका वाटत नाही.

इंग्रजी राज्यापासून आमच्या उन्नतीचे द्वार कसे मोकळे झाले आहे हे पुन: पुन्हा सांगण्याची जरूरी नाही. श्री प्रतापसिंह महाराज छत्रपती हे पेशव्यांचे ताब्यात असता लहानपणी लिहिणे, वाचणे शिकण्याचीही त्यांना बंदी होती. तेव्हा त्यांच्या पूज्य व धोरणी आईने त्यास रात्री बारा वाजता उठवून ब्राह्मणेतर पंतोजीकडून लिहिणे, वाचणे शिकविण्याचे काम केले. पुढे पेशवाई जाऊन इंग्रजाकडे राज्य आल्यावर आपले क्षत्रियत्वाचे हक्क परत मिळविण्याचे व ब्राह्मणांचे फाजील महत्त्व कमी करण्याचे काम त्यांनी हाती घेतले. तेव्हा ब्राह्मण लोकांनी चिडून, खोटी कारस्थाने रचून, इंग्रज सरकारचा गैरसमज केला व त्यास गादीवरून दूर करविले. तशीच भीती ते मला आज घालीत आहेत. पण मी ईश्वरी व इंग्रजी न्यायावर व आपल्यासारख्या देशप्रेमी स्नेह्यांच्या सहानुभूतीवर विश्वास ठेवून स्वस्थ मनाने माझे कर्तव्य करीत राहीन.

ब्राह्मण या शब्दाचे लक्षण 'स्मृती' ग्रंथातून दिलेले आढळते. त्या लक्षणाप्रमाणे ब्राह्मण ब्रह्मकर्मरत असतो. पण असा एक तरी मनुष्य हल्ली ब्राह्मण म्हणविणाऱ्यांत मिळेल काय? शंका आहे. आता नुकतीच सांगितलेली मनुष्यपणाला लाज आणणारी नीच कृत्ये करणाऱ्यास ब्राह्मण कसे म्हणता येईल ? असे असल्याने हल्लीच्या काळात खऱ्या

ब्राह्मणांच्या अस्तित्वाविषयीच संशय प्रकट केल्यास त्यात चुकले कोठे? नुकत्याच झालेल्या युद्धात आपला लोप झाला नाही असे क्षत्रियांनी सिद्ध केले आहे. वैश्य तर आपल्या व्यापाराने सधन होऊन उजळ मार्गाने फिरत आहेत. शूद्र बिचारे रात्रंदिवस सेवा करून आपली उपजीविका करीत आहेत. परंतु ब्राह्मणांनी मात्र कर्मलोप केल्यामुळे जुन्या वर्णव्यवस्थेप्रमाणे आपले अस्तित्व अजिबात लोप पावले आहे, असे कट्ट्या वर्णाश्रमाभिमान्यास देखील कबूल करावे लागेल.

आता आम्ही काय करावे हे थोडक्यात सांगतो : येथे भरल्या तशा ब्राह्मणेतरांच्या सभा जागोजागी भरल्या पाहिजेत. ब्राह्मणेतरांची चळवळ, यशस्वीपणाने कशी चालवावी हे आपणास मद्रासकडून शिकले पाहिजे. यासाठी मद्रासचे वक्ते आणू या. पुण्या व मुंबईस, त्यांनी केलेल्या कामाची जाणीव करून देऊ या. ते येतील अशी माझी खात्री आहे. ब्राह्मणेतरांच्या परिषदा भरवा. पुणे–मुंबई वगैरे ठिकाणी त्या लवकरच भरवा. मुंबई-पुणे येथील ब्राह्मणेतर या चळवळीच्या चिकाटीत मद्रासपेक्षा फारच मागे आहेत. तेथील ब्राह्मणेतरांच्या पुढाऱ्यांच्या शिक्षणापुढे आमचे पुढारी म्हणजे केवळ मुलांप्रमाणे शोभतील.

प्यारे बंधूहो, "एक व्हा, जोराचा यत्न करा व बौद्धिक गुलामगिरीतून सुटून जा ! स्वतंत्रतेकरिता जीव द्या, काय वाटेल ते करा. परंतु तुम्हाला जे पशूप्रमाणे वागवितात त्यांच्यापासून स्वतंत्रता मिळवा. बारीकसारीक भेद विसरून एक व्हा व जोराचा यत्न करा. परमेश्वराच्या घरी जे रुजू आहे तेच कृत्य करा; अन्यायाने वागू नका. मद्रासच्या ब्राह्मणेतर लोकांच्या परिसाने आपणही सोने बनू या.'

सामाजिक सुधारणांमध्ये धैर्य व स्थैर्य दाखविले नाही तर राजकीय बाबतीत तरी आम्ही काय करू शकणार ? आणि राजकीय बाबतीत आमचे अंगी स्थैर्य नसेल तर आमच्या राजनिष्ठेची काय किंमत ? यासाठी सामाजिक व धार्मिक सुधारणांमध्ये मनोधैर्य धरा आणि एक राष्ट्र करा; मग तुमच्या राजकीय सुधारणांस जोर येईल व तुमची राजनिष्ठा उज्ज्वल होईल.

ब्राह्मण तुम्हांस भिववितील. तुमची व तुमच्या कुटुंबातील माणसांची निंदा करतील. त्यांचा प्रतिकार केला पाहिजे. मी नागपूरच्या एका भाषणात सांगितले आहे की, एखाद्या विवक्षित जातीचे लोक 'तुम्हाला मदत करतो' असे म्हणून पुढे येतील, त्यांच्यावर विश्वास ठेवू नका व स्वस्थ बसू नका. " जो दुसऱ्यावरी विश्वासला त्याचा कार्यभाग बुडाला." हे ब्राह्मणेतर बंधूनो, पुष्कळ ब्राह्मण लोक सावधपणाचे ढोंग करून तुम्हास मदत करितो म्हणून पुढे येतील. परंतु त्यांच्यावर बिलकूल विश्वास ठेवु नका.

## हत्तीचे बळ : ३१

मी खामगाव येथील मराठा शिक्षण परिषदेत जातवार प्रतिनिधीची सवलत फक्त दहा वर्षे मागितली होती. ती मिळाली नाही. तरी नाउमेद होऊ नका. 'कम्युनल रिप्रेझेंटेशन'चे दान आता आम्हास नकोच आहे. 'We will firsr deserve and then desire.' 'कम्युनल रिप्रेझेंटेशन' दिले असते तर आम्ही थोड्या दिवसात लवकर पात्र झालो असतो. आमच्या ब्राह्मण बंधूबरोबर जोराने झगडून आमचे हक्क मिळविण्याचे कामी कष्ट सोसून, आम्ही चिकाटीने प्रयत्न केले पाहिजेत. पांडवांतील भीमसेनाची पाठ जमिनीस लागली म्हणजे त्यास शंभर हत्तींचे बळ येई असे सांगतात. यातील तात्पर्य तेवढं आपण घेऊ या. जितक्या जोराने आपणास प्रतिकार होईल, जितक्या अधिक अडचणी आपल्या मार्गात येतील तितक्या अधिक उत्साहाने, अधिक जोराने व अधिक इर्षेने आपण आपल्या कार्यास लागू या व यश मिळवू या.



# चार

## सोशल रिफॉर्म + एकी = स्वराज्य



विसाव्या शतकातील जीवनकलहातून मानवाला सुखाकडे नेणारे शिक्षण हे सर्वस्पर्शी साधन आहे. ते वापरून, स्वावलंबनाने स्वतःच्या पायावर उभे राहाण्याचा प्रयत्न प्रत्येकाने केला पाहिजे असे 'सोशल रिफॉर्म + एकी = स्वराज्य' मध्ये राजर्षींनी सांगितले असून तशा प्रयत्नांबद्दल निराश्रित सोमवंशीय समाजाच्या चालकांचे त्यांनी हार्दिक अभिनंदन केले आहे. त्यानुषंगाने स्वातंत्र्य, समता आणि बंधुता या अर्वाचीन युगातील मानवी मूल्यांचे महत्त्व विशद करताना, या जीवनमूल्यांसाठी झगडलेल्या व झगडत असलेल्या कार्यकर्त्यांच्या कार्यांचा त्यांनी मोठ्या स्वाभिमानपूर्वक गौरव केला आहे.

अशा स्वरूपाच्या कार्यामुळे भारतातील उच्चनीचतेची, जातिभेदाची दरी बुजून समाज एकसंध बनतो यावर शाहू महाराजांनी भर दिला आहे. या देशातील बहुसंख्य जनता सुखी जीवनाची भागिदार करावयाची असेल तर आधी 'सोशल रिफॉर्म' होऊन आपली एकी झाली पाहिजे, म्हणजेच आम्हाला स्वराज्याचे संपूर्ण फायदे मिळतील; ही आपली भूमिका राजर्षींनी निश्चयपूर्वकतेने मांडली आहे. यातूनच खरा देशाभिमान जागृत होऊन जनहितवर्धक राष्ट्रवाद वाढीला लागण्यास मदत होईल असे महाराजांनी स्पष्ट केले आहे.

शेवटी, अशा ह्या नव्या पुरोगामी राष्ट्रवादाला अडसर टाकणाऱ्या प्रतिगामी शक्तींचाही राजर्षींनी समाचार घेतला आहे. काही पुणेरी पत्रकारांनी, राजर्षी विशिष्ट जातीच्या



नासिक : १६ एप्रिल, १९२०
निराश्रित सोमवंशीय समाजाच्या सभेतील शाहू महाराजांचे अध्यक्षीय भाषण

उन्नतीसाठीच प्रयत्न करतात असा संकुचिततेचा आरोप त्यांच्यावर केला होता. त्यालाही या भाषणात, राजर्षींनी अव्वल कोटीक्रमाने, जाहीरपणे सडेतोड उत्तर दिले आहे.

राजर्षी शाहूंच्या पुरोगामी आणि आधुनिक मानवतावादी जीवनदृष्टीचे इथे घडणारे दमदार दर्शन, म्हणजे समृद्ध सामाजिक तत्त्वज्ञानाचा सूत्रात्मक प्रबंध आहे.



चार

# सोशल रिफॉर्म + एकी = स्वराज्य



मित्रहो ! आजच्या ह्या सभेच्या प्रसंगी तुम्ही मला प्रेमाने आमंत्रण केले, याबद्दल मी तुमचा आभारी आहे. तुमची ही संस्था पाहून मला फार संतोष वाटतो.

हल्लीच्या तीव्र जीवनकलहाच्या काळात कोणताही समाज शिक्षणसंपन्न असेल तरच तो टिकाव धरू शकेल, ही गोष्ट तुमच्यातील पुढाऱ्यांना पटली आहे; याचा मला आनंद वाटतो. तुमच्यासारख्या हतभागी व विपन्न ज्ञातीला पुढे यावयाचे असेल तर त्याबद्दलचा प्रयत्न तुम्हांतील पुढाऱ्यांनीच केला पाहिजे. स्वावलंबन ही यशाची किल्ली आहे. या दृष्टीने, या संस्थेचे चालक जे तुम्हांपैकीच आहेत, त्यांचे अभिनंदन करावे तितके थोडेच! या प्रसंगी मोकळ्या मनाने, माझ्या अंतःकरणातील तुमच्या हिताचे विचार मला कळवावेसे वाटतात. प्रथमतः तुम्हाला माझे सांगणे हे आहे की, तुमच्या उद्धाराच्या सर्व आशांची मदार आमच्या ब्रिटिश साम्राज्याच्या चिरस्थायीपणावर अवलंबून आहे. समतेच्या तत्त्वाच्या जोरावर तुम्हाला झगडावयाचे आहे व समता, बंधुता व स्वातंत्र्य यांचे उगमस्थान ब्रिटिश राष्ट्र हे आहे. गेल्या महायुद्धाच्या आपत्तीचे परिणाम जगाला आता कडक रीतीने जाणवू लागले आहेत. अशा वेळी आमच्यावर जर ब्रिटिश साम्राज्याचे छत्र नसते तर आपल्या कोटयवधी देशबंधूंना अन्नपाण्याशिवाय तडफडून मरण्याची पाळी आली असती. परंतु हल्ली या देशात एकही मनुष्य उपाशी मरत नाही. यावरून आमच्या साम्राज्याची महती किती वर्णन करावी? तरी या गोष्टी नेहमी डोळयांपुढे ठेवून तुम्ही ब्रिटिश साम्राज्याशी अंतःकरणपूर्वक राजनिष्ठ व कृतज्ञ राहून लढाईच्या अथवा शांततेच्या काळात साम्राज्याचे हित पाहिले पाहिजे. त्यास हरएक बाजूने मदत करण्यास तयार राहिले पाहिजे.

आता, मी एका नेटिव्ह संस्थानचा राज्यकर्ता असल्याने ब्रिटिश मुलुखात येऊन मी भाषणे का करावी असा माझ्यासंबंधाने एक आक्षेप घेण्यात येतो. त्यास, एक तर मी राजा

या नात्याने तुम्हात आलो नसून आपल्या कोटयवधी देशबंधूंचा एक हितचिंतक व सेवक या नात्याने आलो आहे; म्हणून जर कोणी प्रेमाने माझे विचार मला विचारले तर ते न सांगणे हे सभ्यपणाचे होणार नाही; किंबहुना विचारणाऱ्यांचा मी त्यात उपमर्द केला असे होईल. शिवाय दुसरे असे की, नेटिव्ह संस्थाने ही साम्राज्याशी एकजीव झालेले त्याचे अवयव आहेत. साम्राज्यातील कोटयवधी व्यक्तींचे साम्राज्याशी प्रजा या नात्याने किंवा सनदा, तहनामे इत्यादी द्वारांनी संबंध जोडलेले आहेत. अर्थात हा संबंध कोणताही असला तरी साम्राज्यातील आम्हा सर्वांचे हितसंबंध एकच आहेत. म्हणून साम्राज्याच्या व त्यातील प्रजाजनाच्या कल्याणाच्या गोष्टीत मन घालून त्यासंबंधी आपले विचार प्रदर्शित करणे यात वावगे असे काहीच नाही. किंबहुना तो माझा हक्कच आहे असे मी मानतो.

आमच्या धर्मात जातिभेदामुळे जो उच्चनीचपणा आलेला आहे तशा प्रकारचा जन्मजात भेदभाव जगाच्या पाठीवरील दुसऱ्या कोणत्याही धर्मात नाही. या जातिभेदाचे अत्यंत हिडीस स्वरूप जर कोठे असेल, तर इतर जातींकडून तुम्हाला ज्या रीतीने वागविण्यात येते त्या रीतीत दिसून येते. तुम्ही आमचे बंधू असता तुम्हाला अस्पृश्य म्हणून लेखून, मांजरे–डुकरे–कुत्रे यापेक्षाही तुम्हाला नीचपणाने वागविण्यात येते, ही किती लज्जेची गोष्ट आहे बरे ? ही अस्पृश्यता अलिकडे केव्हातरी मध्येच घुसडून दिली असली पाहिजे कारण या नासिकसारख्या क्षेत्राच्या ठिकाणी अनादि कालापासून महार लोकांच्या स्नानाचे कुंड इतर जातींच्या कुंडामध्येच आहे. अर्थात त्या ठिकाणी स्पर्शास्पर्शाचा विधीनिषेध असणे शक्य नाही. असे असता हल्लीच्या व्यवहारात तुम्हाला आम्ही अस्पृश्य म्हणून दूर ठेवतो, ही किती शरमेची गोष्ट आहे ! या प्रकारासंबंधाने समाजातील श्रेष्ठ जातींना जसजशी खंती वाटेल त्यामानाने त्यांच्या ठिकाणी खऱ्या स्वदेशाभिमानाचे बीजारोपण झाले असे होईल. सुशिक्षित जातीतून जेव्हा हा खरा स्वदेशाभिमान संचार करू लागेल तेव्हाच त्यांच्याकडून तुम्हाला टिकाऊ अशी काहीतरी मदत होईल.

माझ्या राज्याची अधिकारसूत्रे हाती आली तेव्हा कोल्हापुरात सर्वत्र एकाच सुशिक्षित जातीचे वर्चस्व होते. ऑफिसातून मागासलेल्या जातीचा एकही नोकर दिसत नव्हता; म्हणून त्यांचा दर्जा वाढविण्याकरिता मागासलेल्या सर्व जातींच्या लोकांना नोकरी देण्याचे धोरण मला ठेवावे लागले. त्यातील कित्येकांना वकिलीच्या सनदा दिल्या. त्यांच्या शिक्षणासाठी 'स्पेशल स्कॉलरशिप्स्' ठेवून त्यांना निरनिराळी बोर्डिंगेही करून दिली. माझ्या पंचवीस वर्षांच्या प्रयत्नाचे आता कुठे सुपरिणाम दिसू लागले आहेत. त्यांचे पाऊल आता इथे बरेच पुढे चालले आहे. त्यांची स्थिता आता नुकत्याच

चालू लागलेल्या मुलासारखी आहे. तुमचा समाज मात्र अजून रांगण्याच्या स्थितीतही आलेला नाही; म्हणून आता तुम्हालाच वर काढण्याकडे माझे लक्ष वेधले आहे. हरएक प्रकारचे उत्तेजन तुम्हाला देण्याचे माझे धोरण आहे. तुमच्यासाठी, माझ्या राज्यात मी आतापर्यंत काय कार्य केले आहे, हे मी सांगत बसण्यापेक्षा माझ्या राज्यातील ज्ञातीबंधूच तुम्हाला ते सांगतील.

अलिकडे थोड्या दिवसाखाली माझ्या इलाख्यात तुमच्या ज्ञातिबंधूंची सभा झाली. त्या सभेस मी हजर होतो. त्यावेळी मी लहानसे भाषणही केले. ते भाषण वर्तमानपत्रातून प्रसिद्ध झाल्यानंतर पुण्यातील काही पत्रकारांनी आपला अमूल्य वेळ व जागा खर्च करून मजसारख्या अज्ञानाने केलेल्या भाषणावर टीका केली. ते योग्यच झाले. परंतु टीका करताना त्यांच्या हातून माझ्या भाषणाचा विपर्यास झालेला आहे. त्याचे कारण माझे मराठी भाषेवर असावे तसे प्रभुत्व ( Command ) नसल्याने कदाचित् माझ्या मनातील विचार मला बरोबर व्यक्त करता आले नसावेत. यामुळे विपर्यास करण्यास जागा मिळाली व ' ब्राह्मणजातीचे पाय मागे ओढण्यासाठी झालेल्या कटाचा मेरुमणी' असे मला म्हटले. मेरुमणी होण्याच्या योग्यतेचा मी नाही. माझ्या भाषणाचा आशय इतकाच होता की, जगाच्या पाठीवर हिंदू धर्माशिवाय कोणत्याही धर्मात जातिभेदभाव नाहीत. हिंदू धर्मात मात्र जातिभेदभाव आहेत. त्यामुळे मी कालच मराठ्यांच्या परिषदेत भाषण केल्याप्रमाणे, पूर्वी परशुरामाने पृथ्वी निःक्षत्रिय केली तरी ब्राह्मणी वर्चस्वाची पीछेहाट होऊन पुन्हा राम व कृष्ण हे क्षत्रिय देव्हाऱ्यात बसले. शाहू महाराजांच्या वंशजास पेशव्यांनी लुप्तप्राय केले, तरी पेशवाईच्या अस्ताबरोबर साताऱ्याच्या प्रतापसिंह महाराजांचा उदय झाला. प्राचीन काळापासून या उलाढाली होत असून त्यांच्या बुडाशी आमचा जातिभेदच आहे. अशा उलाढाली पुन्हा होणे इष्ट नाही. म्हणून मोठ्या जोराने मी सांगतो की, हा जातिभेद मोडून समाजाचा पाया शुध्द केल्याशिवाय आम्हाला 'सेल्फ गव्हर्नमेंट' (Self Government) दिले तरी नको. कारण ते वरील अनुभवामुळे ढासळून पडणारच; म्हणून पुन्हा जोराने सांगतो की, माझे असे ठाम मत आहे की, आधी ' सोशल रिफॉर्म ' (Social reform) होऊन आपली एकी झाली म्हणजेच आम्हाला स्वराज्याचे पूर्ण फायदे मिळतील. थोड्या दिवसापूर्वीच मुंबईत मी ' सेंट कोलंबस स्कॉच मिशन ' मध्ये गेलो होतो. अमेरिकन मिशनचा व माझा फार दिवसांचा परिचय आहे. दोन्ही ठिकाणची माणसे म्हणजे मिस सदरलंड, डॉ. व्हेल व डॉ. वॉन्लेस हे सातासमुद्रापलिकडून इकडे आले असून, अन्नवस्त्रापलिकडे कोणतीही अपेक्षा न ठेवता केवळ निष्काम व परोपकारबुद्धीने अहोरात्र आमच्या लोकांना विद्यादान व जीवनदान करीत आहेत. त्यांनी आमची मने न दुखवावी म्हणून, आपल्या संस्थेतून आमच्या खाण्यापिण्याची व्यवस्था

आमच्या जातिधर्माप्रमाणे कडक ठेविलेली आहे. अशा उदाहरणाने ते आमच्या मनाची व शरीराची जोपासना करीत आहेत. अर्थात मी तरी त्यांना ' अवतारी माणसे 'च म्हणतो. आमच्यात गांधीसारख्या काही व्यक्ती अवतारी आहेत व त्यांच्याबद्दल माझ्या ठिकाणी पूज्यबुद्धी आहे; परंतु वरील मिशनरीप्रमाणे कोणताही भेदभाव न ठेवता निष्काम व निःस्वार्थ बुद्धीने ' समाजाची सेवा ती ईश्वराचीच सेवा ' ही भावना मनात बाळगून रंजल्यागांजलेल्यांना वर आणण्यासाठी अहोरात्र झटणाऱ्या संस्था आमच्यात कितीशा आहेत ? मिस्टर गांधींच्या संबंधाने माझ्या भाषणाचा एका एडिटरने विपर्यास केलेला आहे. मी वर सांगितलेच आहे की, गांधींच्या संबंधाने माझी अत्यंत पूज्यबुद्धी आहे. त्याचप्रमाणे श्रद्धानंद किंवा मिसेस् बिझांट ही माणसे अवतारी आहेत. तथापि त्यांच्या हातून चुका होणे अशक्य आहे हे मात्र मला कबूल नाही. या चुका कबूल न करण्याइतके ते हटवादी नाहीत. आपल्याकडून झालेल्या चुका मिस्टर गांधी, श्रद्धानंद वगैरे पुढाऱ्यांनी स्वतःच कबूल केल्या आहेत. अर्थात त्यासंबंधाने माझ्या भाषणात उल्लेख आला म्हणून खुद्द मिस्टर गांधीनाही राग येणार नाही. तथापि या पत्रकाराने माझ्यावर केलेल्या टीकेमुळे माझ्याबद्दल गांधींचा व सर्व जगाचा निष्कारण गैरसमज होणार आहे. मिस्टर गांधीसारखी पूज्य माणसे आमच्याकडे आहेत, पण त्यांची संख्या हाताच्या बोटावर मोजण्याइतकी आहे.

सर्व समाजाचा विचार करताना, समाजात सामान्यतः पुढारी म्हणून जे वावरतात त्यांचे शील, नीतिधैर्य वगैरे सद्‌गुण कोणत्या कसाचे आहेत हेच पाहिले पाहिजे. महाराष्ट्रात सुशिक्षित जातींपैकी बहुतेक पुढाऱ्यांच्या ठिकाणी पतित जातींच्या संबंधाने सहानुभूतीचा पूर आल्याचे कित्येकदा दिसते. परंतु त्यांच्याशी सहभोजनाद्वारे एकी करण्यासंबंधाने प्रत्यक्ष कृतीचा प्रसंग आला की, हे लोक आपल्या बायकामुलांची सबब पुढे करितात. परंतु थोड्या विचारान्ती ही सबब अगदी क्षुल्लक आहे, असे तेव्हाच दिसून येते. कारण अनादि कालापासून हिंदू स्त्रिया आपल्या नवऱ्याकरिता सती जाण्यासही मागेपुढे पाहात नाहीत, असे इतिहास सांगतो; मग असल्या सहभोजनासारख्या क्षुद्र बाबतीत आपल्या पत्नीचा अडथळा होतो, असे म्हणणे म्हणजे आपल्या सकल हिंदु कुलस्त्रियांचा उपमर्द करणे नव्हे काय ? अर्थात अंगी नीतिधैर्य नसल्यामुळे किंवा ही गोष्ट मनापासूनच नको असून, देखावा करण्याची मात्र प्रबळ इच्छा असल्यामुळे ही बायकांची ढाल लपण्यासाठी पुढे येते, असे मानले पाहिजे. तेव्हा अशा नामर्द मनोवृत्तीच्या पुढाऱ्यांच्या सहानुभूतीचा तुम्हाला कितीसा उपयोग होणार? त्याचप्रमाणे परवा एका प्रसंगी निपाणी येथे एका विद्वान ब्राह्मण वक्त्याने

'आम्हास स्वराज्य मिळाले तर आपण अस्पृश्य मंडळींबरोबर सहभोजन करण्यास आज तयार आहोत' असे म्हटले. आता मानलेल्या अस्पृश्यांच्या ठिकाणी जर खऱ्या बंधुत्वाची भावना बाणलेली असेल, तर त्यांच्याशी भोजन करणे, यासारखी क्षुद्र गोष्ट करण्यास स्वराज्य मिळण्यासारखी प्रचंड अट कशाला पाहिजे ? यावरून अस्पृश्यांसंबंधाने आपली बंधुभावना असल्याचे हे वरवर सांगतात, त्यांचा खरेपणा किती आहे हे स्पष्ट होते. तरी त्यांच्या मदतीवर विशेष भर न देता आपल्या ज्ञातिबंधूंना विद्यामृताचे जीवन देण्याला तुम्हीच कंबरा कसल्या पाहिजेत असे माझे तुम्हास कळकळीचे सांगणे आहे.

माझ्या राज्यात मागासलेल्या जातींना वर आणण्याबद्दल माझे जे प्रयत्न झाले आहेत, त्याबद्दल उच्च म्हणविणाऱ्या एका सुशिक्षित जातीचा माझ्यावर घुस्सा झालेला आहे. परंतु ज्याप्रमाणे एखादा डॉक्टर किंवा लेडी डॉक्टर ही अगदी अशक्त व दुबळ्या मुलाला अन्न व औषधे देऊन त्याची जोपासना सर्वांपेक्षा विशेष काळजीने करून, त्याला इतर मुलांच्या जोडीला आणून बसवितात त्याचप्रमाणे आम्ही अस्पृश्य मानलेल्या लोकांना वर आणले पाहिजे. पुण्यनगरीतील कित्येक लोकांनी माझ्यावर असा आरोप आणला आहे की, महाराज पंक्तिप्रपंच करून आपल्याच जातीला पुढे आणतात. मी असे निक्षून सांगतो की, ही गोष्ट निखालस खोटी आहे. श्री शिवछत्रपतींच्या नावाला किंवा त्यांच्या गादीला बट्टा लागेल असे नीच वर्तन माझ्याकडून होणार नाही. राज्याधिकारसूत्रे हाती आल्यानंतर मागासलेल्या जातींना वर आणण्याचे मी अनेक प्रयत्न केले. परंतु यावरून ब्राह्मणाचे ठिकाणी माझा द्वेषभाव आहे, असे मात्र मुळीच नाही. अनेक ब्राह्मण माझ्या पूर्ण विश्वासाचे अंमलदार व सल्लागार आहेत. अनेक ब्राह्मणांना मी इनामे वगैरे दिली आहेत व इतर जातीप्रमाणे त्यांच्या कल्याणाची इच्छा बाळगलेली आहे. या सर्व गोष्टी माझे ब्राह्मण प्रजाजनच या विद्वान् एडिटरांना सांगतील. सारांश, अशक्त मुलाला ताकद आणण्यासाठी, त्याची आई त्याची जशी काळजी बाळगते त्याचप्रमाणे माझे हे प्रयत्न आहेत.

माणगाव येथील माझ्या भाषणात माझ्या प्रजाजनांना लवकरच थोड्या प्रमाणावर स्वराज्य देण्याचा माझा विचार असल्याचा उल्लेख होता. यावर एका एडिटराने 'लौकरच म्हणजे किती वर्षात व थोड्या प्रमाणावर म्हणजे किती आणे, याचा खुलासा कोणी भविष्यवादी करील काय ?' असा सवाल केला आहे. त्यावर माझे म्हणणे इतकेच आहे की, हा खुलासा तावडतोब करता आला असता तर मला फार आनंद झाला असता; परंतु काल मराठ्यांच्या सभेत मी सांगितल्याप्रमाणे, ही बाब फार महत्त्वाची असून अनेक गोष्टींचा खुलासा करणे जरूर आहे व हे होण्यास काहीसा कालावधी होणे अपरिहार्य असल्याने वरील

सवालाचा आताच खुलासा करता येत नाही; याबद्दल मला वाईट वाटते. तथापि, यावेळी असे विचारावेसे वाटते की, परवा सोलापूरच्या सभेत वक्त्यांनी हीन जातींवरील अस्पृश्यतेची आपत्ती मनात आणली तर ती तेव्हाच नाहीशी करता येईल असे सांगितले. त्यास हे 'तेव्हाच अजून का आले नाही व ते केव्हा येणार याचा खुलासा होईल काय ?' त्याचप्रमाणे मागे एका प्रसंगी एका पुढाऱ्याने आपण 'चांभाराचा गणपती आपल्या गाडीत घेतला होता. व चांभाराच्या ठिकाणी व आपल्या ठिकाणी भेदभाव नाही' असे सांगितले होते. त्यास 'हा भेदभाव प्रसिद्धपणे टाकून देण्याचा दिवस का उगवला नाही ? व तो केव्हा उगवणार ?' या आमच्या प्रश्नांना काय उत्तर आहे ? आता ही अस्पृश्यता हळूहळू समाज आपोआपच पुढाऱ्यांना मागे टाकून नाहीशी करू लागला आहे, हे खरे व त्याप्रमाणे माझ्या प्रजाजनांकडेही सहजगत्याच ( Automatically ) काही राज्यकारभार जाईल; अशी मला आशा आहे.

परवा सोलापुरास जहाल–मवाळांचा जो तंटा झाला त्याची हकीकत देताना एका पत्रकाराने 'पुण्याहून किंवा कोल्हापुरहून गेलेल्या तीन हजार रुपयांच्या थैलीचा' उल्लेख केला आहे. त्यास ही थैली माझ्याकडून नेली असे ध्वनित करण्याचा त्याचा उद्देश असेल तर त्यावर माझे इतकेच सांगणे आहे की, माझ्याकडून थैली गेली ही गोष्ट निखालस खोटी आहे. मागासलेल्यांच्या हिताची मला कळकळ आहे व त्यांनी योग्य कारणासाठीं रक्कम मागितली तर मी ती दिलीही असती. पण मी रक्कम दिली नसता गुप्तपणे दिली असे ध्वनित करून मजवर भ्याडपणाचा नीच आरोप करण्यात त्या पत्रकाराला काय वाटले असेल ते असो.

याप्रमाणे आमच्या पत्रकारांचे माझ्यावर प्रेम आहे; तथापि मला जे वाटते ते मी करताना यांची पर्वा करीत नाही. मी अज्ञान आहे व त्यांच्या चौथ्या हिश्शानेही माझी विद्वत्ता नाही. तथापि मला जे वाटते ते मी मनोभावाने करतो. अर्थात इतरांच्या रागाची किंवा लोभाची पर्वा बाळगण्याचे मला तरी कारण नाही.

सरतेशेवटी माझे तुम्हाला इतकेच सांगणे आहे की, तुमचे हे पवित्र कार्य तुम्ही न डगमगता अखंड चालू ठेवा आणि परमेश्वर तुम्हाला या कार्याला पूर्ण यश देईल असा मला भरवसा वाटतो.

❦

पाच

# डोळस नेतृत्वाची गरज



राजर्षींनी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या, मागासवर्गीय लोकांच्या दुःखाला वाचा फोडण्याच्या कार्याचा 'डोळस नेतृत्वाची गरज' मध्ये प्रारंभीच गौरव केला असून महाराष्ट्रातील मागासवर्गातील लोकांना जे गुलामगिरीचे कारुण्यपूर्ण जीवन जगावे लागते आहे, ते माणुसकीला कसे बेचिराख करणारे आहे याचे हृदयस्पर्शी चित्र उभे केले आहे.

महाराष्ट्राच्या कड्याकपारीतून स्वतंत्र जीवनाचा आनंद लुटणाऱ्या कोळी, रामोशी, मांग यासारख्या लोकांना ब्रिटिश अंमलातील कायद्याची बंधने असह्य होऊन त्यांनी प्रारंभी बंडे उभारली. त्यामुळे सरकारच्या रोषास पात्र ठरलेल्या आणि 'अस्पृश्य' समाजातील ह्या समाजघटकांना महाराष्ट्रातील सरंजामशाही वृत्तीच्या व स्वतःस भूदेव म्हणविणाऱ्या समाजाने, स्वतःच्या सुखचैनीच्या सेवेस जुंपण्यासाठी सरकारची री कशी ओढली जाते; त्यामुळे 'गुन्हेगार जमाती' ठरवून सरकारने त्यांच्यावर दररोज पोलिस ठाण्यावर 'हजेरी' देण्याचे बंधन कसे घातले; याची जाणीव राखून, राजर्षींनी आपल्या संस्थानातील अशा जमातींशी संपर्कच साधला असे नव्हे तर त्यांच्या एका पंक्तीला बसून भोजनही केले, त्यांच्यावरील बंधनाविषयी सरकारकडे मध्यस्थी करून ही बंधने रद्द करवून घेतली.



माणगाव : जिल्हा कोल्हापूर : २२ मार्च, १९२०

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या अध्यक्षतेखाली, महाराष्ट्रातील अस्पृश्यवर्गाच्या परिषदेत, राजर्षी शाहूंनी प्रमुख वक्ते म्हणून केलेले भाषण

त्या संदर्भात, महाराजांनी आपण केलेल्या कार्याचा तपशिल सांगून त्यासाठी कोणकोणते उपाय योजले ते विनम्रपणे कथन केले आहेत. महाराष्ट्रातील सामाजिक सुधारणेच्या चळवळींचा राजकारणाशी कसा संबंध पोचतो ते सांगून पाटीलकीचे ग्रामसंस्थेतील महत्त्वही राजर्षींनी विशद केले आहे. तसेच आपल्या संस्थानात आपण अस्पृश्यांसह सर्वांनाच ' कम्युनल रिप्रेझेन्टेशन ' देणार असल्याचे सांगितले आहे.

हिंदुस्थानातील जीवघेणी गुलामगिरी नष्ट करण्यासाठी, " तोंडाने बडबडणारे पुढारी आम्हास नको आहेत. कृतीने जातिभेद मोडून आम्हास मनुष्याप्रमाणे वागवितील असे 'पुढारी' पाहिजेत," असे सांगताना ' डोळस नेतृत्वाची गरज ' ही राजर्षींनी आवर्जून प्रतिपादिली आहे. अस्पृश्यांसाठी काय किंवा इतर कुणासाठी काय कुठलीही विधायक गोष्ट घडावयाची तर कृतिशील मानवतावादी पुढारीच हवे आहेत, गरीबांविषयी केवळ गहिवर घालणारे डामडौलाचे बोलूकाका पुढारी व्यर्थ होत, हे राजर्षींचे सांगणे सार्वकालिक चिरंतन सत्य आहे.

००

पाच

# डोळस नेतृत्वाची गरज



आज माझे मित्र आंबेडकर यांनी या सभेचे अध्यक्षस्थान स्वीकारले आहे. त्यांच्या भाषणाचा लाभ मिळावा म्हणून मी शिकारीतून बुद्धया येथे आलो आहे. मिस्टर आंबेडकर हे ' मूकनायक ' पत्र काढतात व सर्व मागासलेल्या जातींचा परामर्श घेतात. याबद्दल मी त्यांचे मनःपूर्वक अभिनंदन करतो.

अस्पृश्य लोकांची हजेरी माफ करण्याची बुद्धी मला का झाली याचे कारण याप्रसंगी थोडक्यात सांगावे असे मला वाटते. हजेरी असल्यामुळे या गरीब लोकांवर गावकामगार व इतर ऑफिसर्सचा फार जुलूम होता. म्हणजे गावात बारा आणे मजुरीचा दर असला तरी गैरहजेरीची भीती घालून ह्या गरीब लोकांकडून अधिकारी फुकट काम करुन घेत. फार झाले तर त्यांच्या पोटाला म्हणून काहीतरी थोडेसे देत होते.

गुलामगिरीपेक्षासुद्धा, या विसाव्या शतकात अशी गुलामगिरी चालली आहे. ज्यांना ही हजेरी होती त्यांना, त्याप्रमाणे आपल्या जवळचे आप्तेष्ट, पै- पाहुणे कोणी आजारी पडल्यास त्यांना ताबडतोब भेटता येत नव्हते. कित्येक प्रसंगी भेट न होताच ते मरतही होते. मी प्रत्यक्ष असे पाहिले आहे की, कित्येक वेळा लहान आजारी मुलांच्या आयांना व बापांना वेळी-अवेळी जबरदस्तीने वेठीस धरून नेल्यामुळे ती लहान आजारी मुले, त्यांच्याकडे लक्ष देण्यास कोणीच नसल्याने त्यांचे आईबाप परत आल्यावर, ती मेलेली त्यांना सापडली आहेत. यापेक्षा जास्त जुलूम काय असावयाचा ? त्याचप्रमाणे बलुतेदारांकडून वरिष्ठ दर्जाच्या लोकांनी कामे करून घ्यावयाची व मागाहून त्यांना काही देत नाही म्हणून सांगावयाचे असे प्रसंगही पुष्कळ येतात. कोणी जास्त तक्रार केली तर तुला हजेरीत घालीन अशी भीती घालतात.

पाटील, कुलकर्णी वगैरेंची घरे बांधण्याची कामे असल्यास गोरगरीब मराठे, सूर्यवंशी, सोमवंशी ( अस्पृश्य लोक ) वगैरे रयत लोकांकडून त्यांना धमकी घालून नियमांपेक्षा फाजील बलुते देवविण्यासही कामगार लोक कमी करीत नाहीत. गावात एखादी चोरी झाली म्हणजे तर या हजेरीवाल्या लोकांची दैना फारच होते. चांगल्यावाईट सर्व लोकांना धुडकविण्यात येऊन त्यांच्यावर अनेक तऱ्हेचे जुलूम होतात. गुन्ह्याचे मान पाहिले तर मी स्वतःच्या अनुभवावरून असे सांगू शकतो की, हजेरीच्या लोकांपेक्षा बिनहजेरीच्या लोकांतच गुन्हेगारांची संख्या जास्त आहे. मात्र बिनहजेरीच्या लोकांना हजेरी लावून बेशरम केल्याने त्यांची प्रवृत्ती पुन्हा गुन्हा करण्याकडे होते. एवढा हजेरीचा उपयोग होत होता. त्यांना अब्रूने व प्रतिष्ठेने वागविण्याचा फायदा काय ? कोणत्याही स्थितीत हजेरी पाठीशी आहे व अब्रू कायमचीच आहे. मग त्यांनी चांगल्या रीतीने तरी का वागावे ? असा त्यांच्या मनावर, हजेरीने परिणाम होत आहे. मी हजेरी बंद केल्यापासून गुन्ह्यांची संख्या कमी झाली आहे. कारण प्रत्येकास अब्रूने वागावे असे वाटते.

वलुतेदारांची भांडणे, मारामाऱ्याही बंद झाल्या आहेत. तलाठी नेमण्याची पद्धत सुरू होऊन जरी फार दिवस झाले नाहीत, तथापि त्यामुळेही गावातले तंटे व कोर्टकचेऱ्या ( Litigations ) बऱ्याच कमी झाल्या आहेत असे माझ्या नजरेस आले आहे.

परंतु वेठबिगार मात्र मला कमी करता येईना. कारण हे सर्व लोक वतनाच्या मागे लागत आहेत. ते वतन तरी किती द्यावे ? किती असावे ? दोन आरे जमीन अगर पाठीभर धान्य यात कोणाचे पोट तर भरत नाही, परंतु अशा स्थितीने, वतनाच्या आशेने, गावी राहणे भाग पडल्याने पोट भरण्याकरिता चोऱ्या वगैरे गुन्हे करण्याशिवाय त्यांना दुसरा मार्गच उरला नाही. म्हणून मी सर्व बलुतेदारांस व महार वगैरे वतनदारांस अशी विनंती केली की, अशी लहानलहान वतने व बलुती यांच्यामागे तुम्ही लागू नका. ती सोडून द्या. विशेषेकरून महार लोकांना मी अशी विनंती केली की, तुम्ही साधारण माणशी दहा एकर जमीन वाट्याला येईल असे तुमच्या म्हारकीचे तुकडे करा. हे उत्पन्न तुमच्यातील जे वडील असतील त्यांच्याकडे, जसे पाटील, सनदी, शिलेदार यांच्याकडे चालते तसे चालवा; म्हणजे गावास फक्त आठ महार, शिलेदारांप्रमाणे अगर सनदी शिलेदारांप्रमाणे नेमा म्हणजे त्यामुळे गुलामगिरी नाहीशी होईल. त्यांना मी नवीन सनदा देण्याची तजवीज मोठ्या खुषीने करीन. असे झाल्याने बाकीच्या महार लोकांस गावात अगर बाहेरगावी कोणताही धंदा करण्यास मोकळीक होईल आणि सर्वांनीच अर्धपोटी राहायचेही टळेल. हे माझे म्हणणे करवीरच्या महारांनी कबूल केले आहे व त्यांचे अनुकरण सर्व करतील अशी माझी खात्री आहे. माझे प्रिय मित्र मिस्टर आंबेडकर मला या कामी मदत करतील अशी मला पूर्ण आशा आहे.

याप्रसंगी आमचे विख्यात विद्वान ( Educated ) मि. केशवराव व मागासलेल्यांकरिता झटणारे रावबहादूर बाबू कालीचरण वगैरे असते तर फारच मदत झाली असती. तसेच सर्व पाटील लोकही मला या कामात मदत करतील अशी माझी पूर्ण उमेद आहे. आमच्या येथील सुप्रसिद्ध व्यापारी रामभाऊ शिरगावकर यांचेही मला या कामी पाठबळ मिळेल अशी मला पूर्ण आशा आहे.

मी हजेरी बंद केली याबद्दल मला असेही प्रश्न झाले होते की, आजपर्यन्तच्या हजेरीचे लोक, निदान ब्रिटिश वगैरे परहद्दीत जातील तेव्हा तरी त्यांना त्यांच्या संबंधाने आगाऊ वर्दी मिळावी. तसे ता. ३०–५–१९११ रोजी, सातारा पोलिस सुपरिंटेंडेंट यांचे लिहून आले होते; त्यावर अविनम्रपणे मी ता.४–६–१९११ रोजी उत्तर दिले की, ज्याअर्थी मी हजेरी अजिबात माफ केली आहे त्याअर्थी आपल्या इच्छेस मान देण अशक्य झाले आहे. परंतु गुन्हेगार लोकांचे दाखले, मग ते स्पृश्य असोत वा अस्पृश्य असोत मी मोठ्या आनंदाने देत जाईन व खरोखर जे चांगलेपणाने वागणारे लोक आहेत, त्यांना जन्मभर गुन्हेगारांप्रमाणे वागविण्यास माझे अंतःकरण मला सांगत नाही. त्याप्रमाणे हजेरी बंद केली या गोष्टीची हकीकत आहे.

काही लोक तलाठी पद्धतीसंबंधाने माझ्यावर आक्षेप करितात की, जर वतनदार लोकच नोकरीत नको आहेत तर मग पाटील कशाला पाहिजेत ? नाही ! नाही ! तसे नाही ! ! ! पाटील कशाला पाहिजे याचीही कारणे आहेत. कोणीही अजाण, अशिक्षित माणूसही कबूल करेल की, खेडेगावात कोणीतरी जबाबदार असा कामगार असला पाहिजे. असे जर आहे, तर माझ्या मते तो पाटीलच पाहिजे. कारण की, एकतर कुलकर्णी वतनदाराप्रमाणे तो उपलाणी नाही. त्याची उत्पन्ने बादशाही सनदांची आहेत. त्यांनी गावे वसविली आहेत आणि दुसरे ज्या जातीचे लोक ज्या गावात जास्त प्रमाणात आहेत त्याच जातीचा पाटील बहुधा तेथे नेहमी असतो व कुलकर्ण्याच्या जातीचे लोक गावात हजारांत एकसुद्धा मिळणे दुर्मिळ. कुलकर्ण्याच्या मागे त्यांच्या जातीचे अधिकारीवर्ग वकीलशाही व नोकरशाही यांचा पाठिंबा असल्याने गावातील सर्व लोक त्याला भितात व गावच्या खऱ्या हिताच्या कोणत्याही गोष्टीकडे त्यांचे दुर्लक्षच असते. ज्या अधिकारी वर्गाचे त्यांना पाठबळ असते. त्यांना आवडेल तीच गोष्ट झपाटून करीत असतो व लोकांच्या हिताच्या व सुखाच्या गोष्टीकडे त्यांचे लक्ष नसल्यामुळे गावातून गरीब लोकांवर जुलूम करूनही त्या त्या गोष्टी त्याला कराव्या लागतात. परंतु पाटलाची स्थिती तशी नाही. निरुपाय झाल्याशिवाय पाटील लोक तसे सहसा करीत नाहीत. कारण त्याच्या जातीचे लोक गावात जास्त असल्याने त्यांचेच हित पाहणे हे त्याला

भाग पडते. मात्र एका गावात दोन पाटील असले म्हणजे दुही माजून त्यांच्यामध्ये तंटे उत्पन्न होतात व ते वाढविण्याकडे लबाड लोकांची प्रवृत्ती असते. ज्या गावास एक पाटील आहे तेथे गुन्ह्यांचे मान कमी असते. हा अनुभव आमच्या मुलकी अधिकारी वर्गास आहेच.

मी अस्पृश्य वर्गाकरिता जे अल्पस्वल्प यत्न केले आहेत, ते एका लहानशा पुस्तकरुपाने बाबुराव यादव यांनी प्रसिद्ध केले आहेत, त्याबद्दल मी त्यांचाही आभारी आहे. त्याचप्रमाणे या कामी सत्यशोधक समाज, आर्यसमाज व अमेरिकन मिशन मला मदत करीत आहेत. याबद्दल मी त्यांचाही आभारी आहे. परंतु कमनशिबाची गोष्ट ही की, आमचे सुशिक्षित पुढारी वर्गापैकी फारच थोड्या लोकांचे प्रयत्न याबाबतीत मनोभावे करून होत आहेत. तथापि हळूहळू आपले सर्व समाज या दुर्भागी लोकांच्या कल्याणासाठी जास्त झटत जातील अशी मला उमेद आहे.

आजच्या सभेचे अध्यक्ष मिस्टर आंबेडकर यांचे करणे मला नापसंत आहे. कारण महार मांग, चांभार, ढोर हे खरोखर वैश्य जातीचे असून व विशेषतः महारलोक पूर्वी महारकी, सूत कातून व्यापार करीत असता त्यांना अस्पृश्य कोणी ठरविले कोण जाणे! असा वैश्याचा धंदा सोडून दस्यू म्हणजे नोकर आणि नोकर म्हणजे अतिशूद्र, आंबेडकरांनी का पत्करला आहे मला कळत नाही. तथापि मी येथे जमलेल्या सर्व लोकांस हीच विनंती करितो की, आतापर्यन्त आम्ही निकृष्ट अवस्थेस पोचण्याचे कारण आम्ही आमचा योग्य पुढारी योजून काढीत नाही. गोड बोलून नावलौकिक मिळविण्याच्या हेतूने, आमच्यापैकी काही अप्पलपोटी मंडळी अयोग्य पुढारी नेमून देऊन अज्ञानी लोकांना फसवितात. पशूपक्षीदेखील आपल्या जातीचा पुढारी करितात. पक्ष्यांत कधी चतुष्पादांचा पुढारी झाला नाही. चतुष्पादात कधीही पक्ष्यांचा पुढारी नसतो. गाय, बैल, मेंढरे यात मात्र धनगर त्यांचा पुढारी असतो. त्यामुळे शेवटी त्यांना कसाबखान्यात जावे लागते.

ज्यांच्याप्रमाणे हजारी एकसुद्धा नसून जे मागासलेल्यांना, खुद्द क्षत्रियांना (ज्यांनी त्यांचा मोंगलापासून बचाव केला व ज्यांचे पूर्वज रामकृष्ण सूर्यवंशी, सोमवंशी क्षत्रिय हे ज्यांच्या देव्हाऱ्यावर आहेत त्यांना) सुद्धा शूद्र, म्हणून गोमय काय विष्ठेपेक्षाही अस्पृश्य मानितात व स्पर्श झाला म्हणजे जे स्वतःची शुद्धी करून घेतात, असे पुढारी काय कामाचे? पाश्चिमात्य देशात अगर इतर कोणत्याही देशात असले पुढारी कोण कबूल करील?

पशूहून काय? गोमय किंवा विष्ठेहूनही कमी दर्जाचे, आपल्या बंधुभगिनींना व देशबांधवांना मानणाऱ्या लोकांनी पुढारी व्हावयाची इच्छा करणे कितीतरी बेशरमपणाची

गोष्ट आहे ! मला ज्यावेळी मुखत्यारी मिळाली त्यावेळी ब्राह्मणेतर एकहीं वकील अगर नोकर नव्हता. परंतु त्यांना वकिलीचे ज्ञानामृत पाजल्यापासून ते वाकबगार झाले आहेत. त्याचप्रमाणे अस्पृश्य मानिलेल्या लोकांना नोकऱ्या व 'स्पेशल केस' (Special Case) करून वकिलीच्या सनदा दिल्या आहेत. यात ते इतर लोकांप्रमाणे वाकबगार होतील अशी उमेद आहे. मी लवकरच लोकांना, 'सेल्फ गव्हर्नमेंट' थोडया प्रमाणावर देणार आहे. त्याचा फायदा सर्वांना व विशेषतः अस्पृश्य मानिलेल्यांनाही सारखा मिळावा म्हणून ' कम्युनल रिप्रेझेन्टेशन ' ही देणार आहे.

कित्येक म्हणतात की, राजकारणाचा व स्पृशास्पृश्यतेचा काय संबंध आहे ? काही संबंध असल्यास आम्ही तसेही करू.पण मी म्हणतो, अस्पृश्यांना मनुष्याप्रमाणे वागविल्याशिवाय राजकारण कसे होणार ? ज्यांना राजकारण करणे आहे, त्यांनी मनुष्याला मनुष्याप्रमाणे म्हणजे इतर देशात वागवितात त्याप्रमाणे वागविले पाहिजे आणि तसे वागविल्याशिवाय देशकार्य कसे होणार ? आणि असे जो वागवील त्यानेच देशकार्य केले असे म्हणता येईल, इतरांनी नाही.

हिंदुस्थानशिवाय इतर कोणत्याही देशात मनुष्यात जात नाही. परंतु दुर्दैवाने हिंदुस्थानात मात्र जातिभेद इतका तीव्र आहे की, मांजर, कुत्रे किंबहुना शेणापेक्षादेखील कमी, अशा प्रमाणे आम्ही आपल्या देशबांधवांस व भगिनीस वागवितो व अजूनही आम्ही गैरशिस्त पुढारी करितो. म्हणून गरीब लोक अहमदाबाद, अमृतसरसारखे ठिकाणी व मागे मुंबईस झालेल्या दंग्यासारख्या प्रसंगी बळी पडतात. तोंडाने बडबडणारे पुढारी आम्हास नको आहेत. कृतीने जातिभेद मोडून आम्हास मनुष्याप्रमाणे वागवितील असे पुढारी पाहिजेत. जरी मी आंबेडकरांची निंदाच करीत आलो, तरी त्यांच्या उदार मतांबद्दल स्तुतीही करणे जरूर आहे. आज त्यांना ' पंडित ' ही पदवी देण्यास तरी काय हरकत आहे ? विद्वानांत ते एक भूषणच आहेत, आर्यसमाज, बुद्धसमाज व ख्रिस्ती समाज यांनी, त्यांना आपल्यात आनंदाने घेतले असते. परंतु ते तुमचा उद्धार करण्याकरिता तिकडे गेले नाहीत. याबद्दल तुम्ही त्यांचे आभार मानले पाहिजेत. मीही मानतो.

सहा

# अंतिम राजकीय ध्येय



'विजयी मराठा' च्या २७ फेब्रुवारी, १९२२ च्या अंकात प्रसिद्ध झालेल्या 'अंतिम राजकीय ध्येय' या भाषणात राजर्षींनी म्हटले आहे : "आपण सर्वजण एकत्र येऊन आपल्या उन्नतीचे जे प्रयत्न चालविले आहेत, ही मोठीच अभिनंदनीय गोष्ट होय. हे प्रयत्न म्हणजे आपल्यामध्ये नवचैतन्य उत्पन्न झाल्याचे सूचक चिन्ह आहे हे आत्मोन्नतीचे प्रयत्न, सामाजिक हीन स्थितीतून मुक्त होण्याचे निकराचे युद्ध आहे. ते असेच नेटाने चालू ठेवले पाहिजे. केवळ पारंपारिक एकाच व्यवसायावर अवलंबून न राहता शिक्षण घेऊन वेगवेगळ्या उद्योगव्यवसायात उतरा. उच्चपदस्थ नोकऱ्यांत उतरा. आपणच आपला विकास करुन घ्यायला शिकले पाहिजे."

"इंग्रज राज्यकर्त्यांनी ज्या नवीन सुधारणा दिल्या त्याचेही अंतिम उद्दिष्ट स्वराज्य हे ठरवून त्यांनी आपणास राजकीय, सामाजिक, आर्थिक व नैतिक उन्नतीचे मार्ग उपलब्ध करुन दिले आहेत. त्यांच्यामुळेच आपल्यामध्ये नवजीवन उदयाला आले आहे. कोणत्याही देशातील सुचरित लोकांवरच त्या देशाचे राजकीय भवितव्य अवलंबून असते."

शेवटी शाहू महाराज म्हणतात : 'आपण आपल्या नैसर्गिक मानवी हक्कांना जपले पाहिजे. त्यासाठी आग्रहपूर्वक दृढपणे उभे राहिले पाहिजे. आपली प्रगती साधण्याचा, विसाव्या शतकातील मार्ग दंगेधोपे व बंडाळीचा नसून शांततेने व व्यवस्थित रीतीने आपला आपण विकास करून घेणे हा आहे."

कुणावरही न विसंबता, स्वतःच स्वतःच्या पायांवर उभे राहण्याचा स्वयंप्रेरणेचा मंत्र, शाहू महाराजांच्या अख्ख्या कार्याचा मूलमंत्र आहे.



दिल्ली : १६ फेब्रुवारी, १९२२
अ. भा अस्पृश्यता परिषदेच्या तिसऱ्या अधिवेशनात अध्यक्षपदावरुन शाहू महाराजांनी दिलेले भाषण

सहा

# अंतिम राजकीय ध्येय



मी आपली भाषा चांगल्या तऱ्हेने जाणत नाही, म्हणून मला ज्याप्रकारे ; आपले विचार आपणापुढे मोडक्यातोडक्या भाषेत मांडता येतील त्याप्रमाणे मांडण्याची मी परवानगी घेतो.

आजचा मान खरे म्हटले असता आपणातील उत्साही व सुशिक्षित पुढारी मिस्टर आंबेडकर यांनाच मिळावयास पाहिजे. माझ्यापेक्षा ते जास्त सुशिक्षित आहेत व अभिमानी आहेत. त्यांनी आपल्या कल्याणाकरिता अविश्रांत श्रम केले आहेत. परंतु त्यांना आज आपल्यामध्ये हजर राहाता येणे शक्य नाही. कारण ते विलायतेस गेले आहेत. तेथे ते आपले हित अंतःकरणात ठेऊन इतर व्यवसाय करतील यात तिळमात्र शंका नाही.

प्रथमतः आपण सर्व आज या ठिकाणी परमपूज्य बादशहा पंचम जॉर्ज यांचे युवराज प्रिन्स ऑफ वेलस यांचे स्वागत करण्याकरिता लांबलांबून आला आहात, याबद्दल मी आपले अभिनंदन करतो व तुम्हीही खात्री बाळगा की, तुम्हा सर्वांना पाहून युवराजानाही आपणासंबंधी आनंद व प्रेम वाटत आहे.

आज आपण सर्व एके ठिकाणी मिळून आपल्या उन्नतीचे प्रयत्न शांततेच्या मार्गाने करीत आहात ही मोठी अभिनंदनीय गोष्ट आहे. हे खरोखर आपणामध्ये नवीन चैतन्य उत्पन्न झाल्याचे सूचक आहे. ही चैतन्याची चळवळ, हे आत्मोन्नतीचे प्रयत्न हे, सामाजिक हीन स्थितीतून मुक्त होण्याचे निकराचे युद्ध आहे. असेच नेटाने ते चालू ठेवल्यास ईश्वर आपल्या प्रयत्नांस यश देईलच देईल.

आपण आपल्या एकाच पूर्वापार धंद्याला चिकटून न राहाता शिक्षण घेतले पाहिजे. आपण फौजेत तसेच कचेऱ्या व मोठमोठ्या जागा पटकाविल्या पाहिजेत. तसेच वकील, बॅरिस्टर, डॉक्टर, व्यापारी वगैरे स्वतंत्र धंद्यांत प्रवीणता मिळवून आपली उन्नती करून घेतली पाहिजे.

माझ्या लहानशा राज्यात आपले ज्ञातिबंधू हे सर्व व्यवसाय करीत असून तेथील म्युनिसिपल कमेटीचे चेअरमन हे आपणांपैकीच एक आहेत, ही गोष्ट नमूद करण्यास मी आपली परवानगी घेतो. ही कदाचित आत्मस्तुती केल्याचा आरोप मजवर येईल. परंतु त्याबद्दल आपण क्षमा कराल अशी विनंती आहे. कारण आपले लोक प्रयत्नान्ती काय करू शकतात एवढेच दाखविण्याकरिता आपणास मी हे सांगितले आहे. हेच युवराज ज्यावेळी पुन: बादशहा म्हणून आपणास भेट देण्यास येतील त्यावेळी तुम्हांपैकी पुष्कळजण फौजेत व कचेऱ्यांत मोठे ऑफिसर व स्वतंत्र धंद्यातील पुढारी या नात्याने त्यांचे स्वागत कराल अशी मला पूर्ण आशा आहे. आपले त्यांच्यावरील दृढ प्रेम त्यांना खात्रीने ओळून आणील.

आपणामध्ये जी जागृती झाली आहे, जे नवजीवन उत्पन्न झाले आहे, त्या सर्वांचे कारण ब्रिटिश राज्याचा उदय होय. ही गोष्ट आपण केव्हाही विसरता कामा नये. आपल्या दयाळू इंग्रज सरकारने आपणास ज्या नवीन सुधारणा दिल्या आहेत व आपले अंतिम राजकीय ध्येय ( Progress in realisation of self Government ) ‘ स्वराज्य ’ हे ठरवून, आपणासमोर जी आपली राजकीय, सामाजिक, आर्थिक व नैतिक उन्नती करून घेण्याचा मार्ग खुला करून ठेविला आहे; त्याचा आपण शहाणपणाने पूर्ण उपयोग करून घ्याल अशी मला उमेद आहे.

कोणत्याही देशाची राजकीय भवितव्यता, त्यातील लोकांच्या सुचारित्र्यावर अवलंबून असते. याकरिता आपण सर्वांनी आपले शील सुधारण्याचा प्रयत्न करून आपणामध्ये, आपणास दिलेल्या हक्कांचा उपयोग करण्याची योग्यता आहे असे आपल्या वर्तनाने दाखविले पाहिजे. आपणास आपल्यापैकीच योग्य पुढारी मिळाले असून ते सरळ व शांततेच्या मार्गावर आहेत; हे पाहून मला आनंद होत आहे.

हिंदी राष्ट्रात उत्पन्न झालेल्या नव उत्साहाच्या भरात, आपण राष्ट्रास विसरलो नाही. हजारो वर्षांपासून आपणावर लादलेली अस्पृश्यतेची बेडी आस्तेआस्ते ढिली होत चालली आहे. ती लवकरच पूर्णपणे तुटून पडेल अशी माझी खात्री आहे. आपण आपल्या हक्कांस जपले पाहिजे. जेथे जेथे आपल्या सामाजिक व मानवी प्राण्यांना असणाऱ्या नैसर्गिक

हक्कांचा प्रश्न येईल, तेथे तेथे आपण शहाणपणाने, प्रेमाने, परंतु दृढ आग्रहाने स्थिर राहिले पाहिजे. आपले हक्क बजाविले पाहिजेत. हे सर्व अत्यंत शहाणपणाने पार पाडण्यास आपण सरकारशी सहकार्य करून शांततेचे अवलंबन केले पाहिजे.

या विसाव्या शतकात आपली प्रगती करण्याचा मार्ग हा दंगेधोपे व बंडाळी करण्याचा नसून शांततेने व व्यवस्थित रीतीने आपला आपण विकास करून घेणे हा होय. हेच तत्त्व आता जगन्मान्य झाले आहे. वॉशिंग्टन व जिनोआ येथे भरणाऱ्या राष्ट्रीय परिषदेचे मुळाशी हेच तत्त्व आढळून येईल. त्याचाच आपणही स्वीकार केला पाहिजे.

आपण आपले पुढारी मि. भीमराव आंबेडकर यांचे उदाहरण डोळ्यांपुढे ठेवून त्याप्रमाणे होण्याचा प्रयत्न करावा. मी आपला गुलाम आहे, मी आपला दास आहे. माझ्याकडून आपण सेवा करून घ्यावी हीच माझी विनंती आहे.

माझ्या अल्पमतीस अनुसरून माझे विचार थोडक्यात आपणापुढे मांडले आहेत. ते मांडण्याची संधी आपण मला दिली व माझे शब्द शांतपणे ऐकून घेतले; याबद्दल मी आपले आभार मानून, आपली रजा घेतो.

●

सात

# ब्रह्मकर्म कुठे आहे ?



महाराष्ट्रातील सामाजिक चळवळींना गती देणारे कोणीही असो, ते वरिष्ठ वर्गाच्या टीकेला बळी पडतात. म. फुले, लोकहितवादी, राजर्षी शाहू, महर्षी विठ्ठल रामजी शिंदे आणि डॉ. बाबासाहेब आंबेडकर, त्यापैकी प्रत्येकाला या दिव्यातून जावे लागले आहे. कुणीच चुकलेले नाही.

शाहू महाराजांच्या मते अशा टीकेतून आपल्यास स्फूर्ती मिळते उत्साह वाढतो ; मरगळ येत नाही. अर्थात हे टीकेचे नव्हे तर हाती घेतलेल्या कार्याचे चैतन्यदायी सामर्थ्य होय. त्यातून ब्राह्मणेतर कार्यकर्त्यांचे एक दलच राजर्षींनी निर्माण केले होते, झाले होते. आपल्या मुलांवर संस्थानच्या कारभाराची सर्व जबाबदारी सोपवून बहिष्कृत समाजाची सेवा करण्याची जाहीर प्रतिज्ञा शाहू महाराजांनी केली, ती ही प्रेरणा आणि पाठिंबा यामधूनच होय.

राजर्षींनी 'ब्रह्मकर्म कुठे आहे ?' मध्ये डॉ. परांजपे यांच्या, "वर्णाश्रम धर्माप्रमाणे क्षत्रिय तर मुळीच नाहीत व बाकीचेही वर्ण नाहीत." या मताचा खरपूस समाचार घेऊन ब्राह्मण वर्णच कसा नाही हे बिनतोडपणे सिद्ध केले आहे. ब्रह्मकर्म करणाऱ्या ब्राह्मणांच्या सामर्थ्याने एखाद्याला भस्मसात करता येत. हे तेज त्यांच्याकडे



नागपूर : ३० मे, १९२०

अ. भा. बहिष्कृत समाज परिषदेच्या प्रतिनिधींच्या खास बैठकीत, अध्यक्ष या नात्याने शाहू महाराजांनी केलेले भाषण

असते तोच ब्राह्मण. पण आज ते तेज कुणातच नाही. म्हणून ते ब्राह्मण नव्हेत. ते दस्यूप्रमाणे नोकऱ्या करण्यात धन्यता मानतात. म्हणजे दुसऱ्याची सेवा–चाकरी करणारे ते शूद्रच ठरतात. उलट गेल्या महायुद्धात क्षत्रियांनी जो क्षात्रधर्म दाखविला त्यावरून ते क्षत्रिय ठरले आहेत, क्षत्रिय म्हणून वावरत आहेत. वैश्य व शूद्रही आपापले धंदे करतात पण ब्राह्मण वर्गाचें काय ? सारांश, ' त्यांच्यात – ब्राह्मणात ब्रह्मतेज नाही ' म्हणून ब्राह्मणाशिवाय तीन वर्णच फक्त अस्तित्वात आहेत, असे राजर्षींनी ठणकावून सांगितलें आहे

' ब्रह्मकर्म कुठे आहे ?' म्हणजे ' ब्राह्मण कुठे आहे ? खरेच आहे काय ?' असा हा प्रश्न असून त्यामधून शाहू महाराजांच्या बिनतोड तर्कशुद्ध विचारसरणीचा व चतुर बुद्धीमत्तेचा प्रत्यय येतो. राजर्षींची नवसमाज निर्मितीची जिद्द, त्यासाठी अपूर्व त्यागाची तयारी आणि प्रखर तत्त्वनिष्ठा ह्यांचाही संमेळ दृग्गोचर होतो.

ॐ

सात

# ब्रह्मकर्म कुठे आहे ?



मी आज आपला अध्यक्ष झालो व नेहमी आपला कैवार घेतो म्हणून एक विवक्षित जात नेहमी माझी टवाळी, निर्भत्सना करिते. लोकमत माझ्याविरुद्ध करण्यास चिथावून देते. परंतु अशा करण्याने मला उत्साह व उत्तेजन येते. जी वर्तमानपत्रे माझी निर्भत्सना करतात त्यांचे मी अभिनंदनच करतो. मला कितीही त्रास व उपहास सोसावा लागला तरी मी निमूटपणे सोसतो व तुमच्या सेवेस मी हाकेबरोबर हजर असतो. माझी नोकरी घेण्यास आपण कोणतीही शंका बाळगू नका.

मी व माझे प्रिय मित्र निंबाळकर, भोसले, बाबुराव यादव, कदम, दत्तोबा पेंटर, बेळगावचे पाटील यांनी आपल्या सेवेस सर्व झीज सोसून, आपले देह झिजविण्याबद्दल शपथा घेतल्या आहेत. आपल्या सर्वांच्या कृपेने माझा मुलगा कर्ता आहे, तो माझ्यामागे सर्व पाहाण्यासारखा आहे. तरी माझ्यावर एखाद्या 'ऑलीगार्कीने' आपल्या 'ब्युरॉक्रसी' चा अंमल जर स्थापित केला तर मी माझे सर्व राज्य आपल्या मुलावर सोपवून तुमच्या सेवेत राहाण्याची प्रतिज्ञा केली आहे. माझ्याकडून सेवा घ्याल अशी आशा आहे.

**जो दुसऱ्यावरी विश्वासला ।।**
**त्याचा कार्यभाग बुडाला ।।**
**जो आपणचि कष्टत गेला ।।**
**तोचि जाण भला ।।**

या नियमाप्रमाणे आपल्या हितसाधक बंधूंनी मदत केल्यास त्यांच्या मदतीचा मोठ्या जोराने निषेध करा.

आमचे मित्र डॉ. परांजपे असे म्हणाले की, " वर्णाश्रम धर्माप्रमाणे क्षत्रियेतर मुळीच नाहीत व बाकीचेही वर्ण नाहीत." परंतु ही गोष्ट मात्र मला मान्य नाही. ब्राह्मणांन

ब्रह्मकर्म रोज करावे लागते व त्याचे सामर्थ्य, शापाने एखाद्यास भस्म करण्याचेही असते. याप्रमाणे कोणतेही ब्रह्मतेज त्याच्या अंगी दिसत नाही. दस्यू व चांडाळाची वृत्ती हेही ते घेतात. नोकरीचा पेशा हे एक त्यांनी आपले चरण्याचे कुरण बनवून टाकले आहे. यावरुन हे ब्राह्मण मुळीच नाहीत. निदान या दक्षिणेत तरी हे खात्रीपूर्वक सांगता येईल.

पृथ्वीवर ब्रह्मतेज कोणातच नाही. त्याअर्थी पृथ्वीवर ब्राह्मणही कोणी नाही. वैश्य वैश्याचा धंदा करितात, ( ते गीतेतल्या नियमाप्रमाणे वैश्य व शूद्र आहेत. ) व शूद्र शूद्रांचा करितात. क्षात्रकर्म रोज करण्याचे कारण नसते. क्षात्रकर्म रोज करू लागल्यास सर्वच मरून जातील, परंतु क्षात्रकर्म दाखविण्याची वेळ दोनशे वर्षांतून दोन वेळच येते. त्याप्रमाणे महायुद्धात मराठ्यांनी क्षात्रकर्म दाखविले आहे.तेव्हा क्षत्रियांच्या अस्तित्वाबद्दल शंका उरत नाही. मात्र डॉ. परांजपे यांच्या म्हणण्याप्रमाणे ब्रह्मकर्म करणारे ब्राह्मण नसल्यामुळे दस्यू, नोकरपेशा करणेवाली अशी ही नवीनच जात बनली आहे. ब्राह्मणा–शिवाय तीन वर्णच जिवंत आहेत हे सहजच लक्षात येईल.

आठ

# आमचा धर्म : आर्यधर्म



राजर्षी शाहू महाराज खऱ्याखुऱ्या वैदिक धर्माचे चाहते असून तोच खरा आर्यधर्म ही त्यांची श्रद्धा होती. त्यापोटी ते महर्षी दयानंद सरस्वतींच्या आर्यधर्माचे कार्य करण्यास तयार झाले. त्याप्रमाणे ते करीत राहिले.

'आमचा धर्म : आर्यधर्म ' मध्ये प्रारंभीच वैदिक धर्माचे स्वरूप विकृत कसे झाले आहे ते सांगताना शाहू महाराज म्हणतात : "वेदप्रतिपादित खऱ्या आर्यधर्मावर अनेक पुटे चढल्याकारणानें त्याचे शुद्ध स्वरूप दिसेनासे झाले. ऋषीप्रणित ग्रंथांचा अभ्यास, लबाड व बनावटी भटजींच्या टीका, भाष्ये वगैरेंच्या आधाराने होऊ लागल्याने प्राचीन सिद्धान्त बरोबर समजेनात. त्यामुळे मनुष्याच्या बुद्धीस नीचपणाप्रत नेणारी हलक्या प्रकारची मूर्तिपूजा फार वाढली... ब्राह्मणत्व वास्तविक पाहाता गुणकर्मांवर अवलंबून असावयाचे ते जातीवर येऊन बसलें. तीर्थांचे काल्पनिक महत्त्व वाढविण्यात आले. त्यासाठी गरूड-पुराण, फलज्योतिषशास्त्र यासारखे ग्रंथ तयार करून पैसे उपटण्याचे उद्योग निघाले. 'उपाध्याय सांगेल ती पूर्व दिशा व भट सांगेल ती अमावास्या,' या अवस्थेमुळे भट सांगेल तो आपला धर्म आहे व त्यानेंच ईश्वर प्रसन्न होतो' अशी ब्राह्मणेतरांची समजूत झाली. या माजलेल्या भिक्षुकशाहीच्या कर्मकांडाचे दुष्परिणामही राजर्षींनी स्पष्ट केले आहेत.

राजर्षींच्या मते, 'बहुजनसमाजात खऱ्या ज्ञानाचा लोप झाल्याकारणाने देशाची मोठी हानी झाली आहे. ब्राह्मणत्व हे गुणकर्माऐवजी जन्मावर आहे असे मानण्यात येऊ··



नवसारी : गुजरात राज्य : १४ डिसेंबर, १९१८

आर्यधर्म परिषदेच्या अकराव्या अधिवेशन प्रसंगी अध्यक्षपदावरून, शाहू महाराजांनी केलेले प्रास्ताविक भाषण

लागून, ब्राह्मण ही जात उत्पन्न झाल्यावर इतर वर्णही जन्मावर ठरले. अशा रीतीने जातिभेद फार वाढला. समाज विस्कळित झाला. परिणामी धार्मिक अवनतीबरोबर देशावर परकी लोकांच्या स्वाऱ्या होऊ लागल्या. परतंत्रतेचे जू देशाच्या मानेवर कायमचे बसले. विद्या कमी कमी होत गेल्याने व्यापार, उद्योग, कलाकौशल्य सर्वांची अवनती सुरु होऊन देशाची फार दैना उडाली."

ही दैन्यावस्था दूर करण्याचे महर्षी दयानंद, बाबू केशवचंद्र सेन आणि म. फुले यांनी कोणकोणते व कसे प्रयत्न केले हे राजर्षींनी सांगितले आहे. ह्या प्रत्येकाचे मार्ग, त्यांच्या सभोवतालच्या परिस्थितीनुरुप कसे वेगळे होते; याचेही विवेचन केले आहे. त्यांच्या मते, "बाबू केशवचंद्र सेन यांचे विचार–कार्य पश्चिमेकडील युनिटेरियन चर्चप्रमाणे झाले, तर म. फुले यांनी, ब्राह्मणांच्या धार्मिक वर्चस्वावर हल्ला केल्याशिवाय ब्राह्मणेतरांची परावलंबी स्थिती दूर होणार नाही; म्हणून ब्राह्मण्यावर मर्मस्थानी प्रहार केले. हे सर्व प्रयत्न आर्यधर्माभिमान्यांना पचले नाहीत, मात्र स्वामी दयानंद यांनी 'वेदांचा अधिकार सर्व मनुष्यमात्रांस आहे' हे तत्त्व कंठरवाने सांगितल्याने हजारोंनी लोक त्यांचे अनयायी बनले. तसेच त्यांनी 'विद्येचा अधिकारही सर्वांना आहे.' असे म्हणून लोकांना ज्ञानी करण्याचा सपाटा चालविला. त्यामुळे पूर्वेकडील आणि पश्चिमेकडील आर्यवंशातही ऐक्यभाव वाढण्यास मदत झाली; असे 'आमचा धर्म: आर्यधर्म' मध्ये राजर्षींनी म्हटले आहे. इतकेच नव्हे तर अशा 'ह्या उदार आर्यधर्माचा प्रसार झाल्याशिवाय परावलंबी वृत्तीतून हिंदुस्थानची सुटका होणार नाही, त्याला स्वतंत्र राष्ट्र म्हणून उभे राहाता येणार नाही ; हेही स्पष्ट केले आहे.

आठ

# आमचा धर्म : आर्यधर्म



आपल्या आर्यधर्म परिषदेच्या अकराव्या अधिवेशनाच्या आजच्या बैठकीचे अध्यक्षस्थान स्वीकारण्यास आपण मला बोलाविले व प्रास्ताविक भाषण करण्याचा मान मला दिला याबद्दल मी आपला आभारी आहे. आर्यसमाजाचे काम माझ्या हातून विशेषसे झाले नसताही माझ्या अल्पशा कामाचे आपण अशा रितीने कौतुक केल्याने, माझा उत्साह दुप्पट झाला आहे. यापुढे हे काम माझ्या हातून जास्त प्रमाणावर होईल अशी मला उमेद आहे. आज अध्यक्ष होऊन आर्य समाजाची सार्वजनिक रीतीने सेवा करण्याची आपण जी संधी मला दिली आहे, त्याबद्दल मी आपणास धन्यवाद देतो व ही सेवा गोड करून घ्यावी अशी विनंती करतो. तसेच विश्वव्यापी महायुद्धाचा शेवट होऊन आमच्या साम्राज्य सरकारास पूर्ण यश प्राप्त झाले, याप्रकारे न्यायाची बाजू यशस्वी झाली व आर्यभूवर येणारे संकट टळले; याबद्दल आपण जगदीश्वरास कोटी धन्यवाद देऊ या.

आमचा आर्यधर्म ज्या तत्त्वांच्या पायावर उभारला आहे तीच समतेची तत्त्वे या युद्धाने राजकीय बाबतीतही सर्वमान्य झाली आहेत. याविषयी जास्त उल्लेख मी पुढे करीन. महर्षी दयानंद व त्यांचे गुरु स्वामी विरजानंद यांनी जी ज्ञानज्योती या आर्यभूमीत पाजळली, तिच्याविषयी विचार केला असता या कामी ईशसंकेत स्पष्ट होत आहे. त्या वेळची या देशातील धर्मस्थिती फारच बिघडून गेलेली होती. वेद प्रतिपादित खऱ्या आर्यधर्मावर अनेक पुटे चढल्याकारणाने त्याचे शुद्ध स्वरूप दिसेनासे झाले. ऋषिप्रणित ग्रंथांचा अभ्यास, लबाड व बनावटी भटजींच्या टीका, भाष्ये वगैरेंच्या आधाराने होऊ लागल्याने प्राचीन सिद्धांत बरोबर समजेनात, मनुष्याच्या बुद्धीस नीचपणाप्रत नेणारी हलक्या प्रकारची मूर्तिपूजा फारच वाढली. ते पूजक आपणास पवित्र म्हणवून घेऊ लागले. ह्मणत्व वास्तविक पाहाता गुणकर्मावर अवलंबून असावयाचे, ते जातीवर येऊन बसले. ीर्थांचे काल्पनिक महात्म्य वाढविण्यात आले, त्यामुळे तेथील नामधारी ब्राह्मणास

विपुल मिष्टान्न मिळू लागून द्रव्यप्राप्तीही फार होऊ लागल्याने त्यांच्यात आळस व दुर्व्यसने वाढून, त्यांना विद्या शिकण्याचे अगत्य वाटेनासे झाले. मनुष्य उपजल्यापासून तो मरेपर्यंत त्याच्याकडून निरनिराळ्या रूपाने पैसे मिळविण्याकरिता व्रते, दाने, वगैरे विषयींचे ग्रंथ तयार केले गेले. इतकेच नव्हे तर मेल्यावरही मृतास पोचविण्याकरिता श्राद्ध, महाळ, दान वगैरे मिळावे याकरिता 'गरूड पुराणा' सारखे 'गारूडी' ग्रंथ तयार झाले, याप्रमाणे अज्ञान्यांच्या पैशावर ब्राह्मण म्हणविणाऱ्यांची खूप चंगळ उडाल्याने ब्राह्मणातील विद्या नष्ट होत चालली. आपले व आपल्या संततीचे व्यवस्थित चालले पाहिजे या बुद्धीने ब्राह्मणेतरांचीही विद्या त्यांच्याकडून बंद करण्यात आली. पुढे फलजोतिषशास्त्र वाढवून निरनिराळ्या ग्रहांची भीती घालून पैसे उपटण्याच्या युक्त्या निघाल्या. अमूक दिवस चांगला व अमूक वाईट, अमक्या दिवशी प्रवास करावा, लग्न उपनयन वगैरे अमूकच मुहूर्तावर व्हावे अशी थोतांडे काढून अनेक वेडगळ धर्मसमजुतींचा पगडा जनसमाजावर बसविला गेला. 'उपाध्याय सांगेल ती पूर्वदिशा व भट सांगेल ती अमावस्या' असे झाल्याने 'भट सांगेल तसे निमूटपणे वागणे हा आपला धर्म आहे व यानेच ईश्वर प्रसन्न होतो व आपले कल्याण होते.' अशी ब्राह्मणेतरांची समजूत झाली व ते निव्वळ नंदीबैलाचे स्थितीत आले.

बहुजनसमाजात खऱ्या ज्ञानाचा लोप झाल्याकारणाने देशाची मोठी हानी झाली आहे. वर्णव्यवस्था गुणकर्मामुळेच स्थापन झाली व ती गुणकर्मावरच अवलंबून पाहिजे. पण ब्राह्मणत्व जन्मावर आहे असे मानण्यात येऊ लागून ब्राह्मण ही जात उत्पन्न झाल्यावर; इतर वर्णांचाही संबंध जन्मावर यावा यात नवल नाही. अशा रीतीने जातिभेद फार वाढला. मूळच्या चार वर्णांच्या आता कमीतकमी चार हजार तरी जाती होऊन समाज विस्कळित झाला आहे. भेदापासून द्वेष उत्पन्न झाला व देशातील एकी नाहीशी झाली. याचा परिणाम केवळ धार्मिक अवनती होऊनच थांबला नाही. आर्यावर्तावर परकीय लोकांच्या स्वाऱ्या होऊ लागल्या व घरच्या फटीमुळे बाहेरच्या शत्रूंना फार फावले. अशा कारणांनी परतंत्रेचे जू देशाच्या मानेवर हळूहळू कायम बसले. विद्या कमीकमी होत गेल्याने व्यापार, कलाकौशल्य, उदीमधंदा वगैरे सर्वांस अवनती आली. एकंदर देशाची फार दैना उडाली.

परकी अंमलापासून सुटण्याचा प्रयत्न राजपूत क्षत्रियांनी चांगलाच केला होता. पण जातीभेदांनी पोखरलेल्या समाजस्थितीत तो यशस्वी झाला नाही यात नवल नाही. दुसरा मोठा आणि जास्त यशस्वी प्रयत्न मराठे लोकांनी केला. हे लोक सर्व देश जिंकतात की काय असे एकवेळ वाटू लागले; पण मराठ्यांची राजसत्ता

हळूहळू पण पूर्णपण ब्राह्मणांच्या हाती गेल्याने ब्राह्मण-ब्राह्मणेतर हा भेद तीव्र होऊन मराठी राजसत्ता नाश पावली व सर्वांस समदृष्टीने न्याय देणारे, प्रजस विद्या देणे हे राजाचे पहिले कर्तव्य आहे हे जाणणारे असे इंग्रजी राज्य उदय पावले.

इंग्रजी राज्य स्थापन झाल्यावर इकडे ख्रिस्ती मिशनरी बरेच आले व त्यांनी इंग्रजी विद्या देण्यास व आपल्या धर्ममतांच्या उपदेशास सुरूवात केली. त्याचप्रमाणे इंग्रज सरकारातूनही विद्याखाते स्थापन होऊन लोकांमध्ये नवीन विचारांच्या प्रसारास सुरुवात झाली. या काळी धर्मसुधारक असे तीन पुरुष प्रमुखत्वाने उदयास आले: ते महर्षी स्वामी दयानंद, बाबू केशवचंद्र सेन व जोतीराव गोविंदराव फुले हे होत. या तिघांत बऱ्याच बाबतीत ध्यानात ठेवण्यासारखे साम्य आहे. पण तिघांची मते व कार्यक्रम, त्यांच्या विद्येच्या व परिस्थितीच्या योगाने भिन्न झाली आहेत.

महर्षी दयानंद स्वामी हे आपल्या गुर्जर प्रांतातील आहेत, याबद्दल आपणास अभिमान वाटणे साहजिक आहे. त्यांचे विद्यासंपादन मुख्यत्वेकरून उत्तर हिंदुस्थानात झाले व स्वामी विरजानंदही तिकडीलच. तेव्हा या प्रांतातील परिस्थितीचा परिणाम त्यांच्या कार्यक्रमावर होणे साहजिकच आहे.

बाबू केशवचंद्र हे बंगाल प्रांती उदयास आले. बंगाल प्रांती इंग्रजी अंमल सर्वाआधी सुरू झाल्याने, इंग्रजी विद्येचा प्रसार तिकडे जास्त झाला होता. यामुळे केशवचंद्र यांचे विचार पश्चिमेकडील ' युनिटेरियन चर्च ' प्रमाणे (Uniterian Church) झाले, यात नवल नाही.

महाराष्ट्र देशातील जोतीराव फुले यांची परिस्थिती फारच निराळी होती. ते ब्राह्मणेतरांतीलच एक होते. त्यांना, ब्राह्मणी मताने विद्या शिकण्याचादेखील अधिकार नव्हता. त्यामुळे त्यांना मिळालेले धर्मज्ञान बहुश: ख्रिस्ती लोकांनी लिहिलेल्या ग्रंथांवरून व ब्राह्मणेतरांवर आपला जोराचा अंमल चालावा म्हणून ब्राह्मणांनी लिहिलेल्या काल्पनिक पोथ्यांवरून मिळाले होते. पण ते फार शोधक व विचारी असल्याने ब्राह्मणी कावा त्यांनी पूर्णपणे ओळखला. स्वामी दयानंद यास वेदविद्या व संस्कृत ज्ञानभांडार खुले झाले होते. आर्यधर्मातील उच्च तत्त्वे त्यांना पूर्णपणे कळली होती. सर्व धर्मांत आर्यधर्म कसा श्रेष्ठ आहे याची जाणीवहीं सर्व हिंदुस्थानात त्यांच्यापेक्षा जास्त कुणासही नव्हती; असे म्हटल्यास अतिशयोक्तीचा दोष मजकडे येईल असे मला वाटत नाही. याप्रमाणे या तिघांची विद्या निरनिराळ्या प्रकारची होती. तशीच समाजस्थितीही भिन्न प्रकारची होती.

दक्षिण हिंदुस्थानसारखे, उत्तर हिंदुस्थानातही ब्राह्मणत्व जन्मावर येऊन बसले आहे. पण तेथे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र हे चारही वर्ण अस्तित्वात आहेत; असे मानण्यात येत असल्याने ब्राह्मणाखेरीज बऱ्याच इतर लोकांस वेदाध्ययनाचा व इतर विद्यासंपादनाचा अधिकार आहे असे समजण्यात येते. दक्षिणेत तर 'कलौ अद्यंतपो स्थिति' यावर जोर देऊन क्षत्रिय व वैश्यांचा पूर्ण अभाव असे प्रतिपादण्यात ब्राह्मणवर्गास मोठा आवेश येत असतो. त्यामुळे इकडील ब्राह्मणेतर वर्गात वेदविद्या तर बंद झालीच पण त्यायोगाने इतर विद्येचीही जवळजवळ बंदी झाली अशा रीतीने दक्षिण हिंदुस्थानच्या परिस्थितीत फार मोठा फरक पडला आहे. तिकडे ब्राह्मणवर्गाचे वर्चस्व मुख्यत्वे धार्मिक बाबतीत आहे. बाकीच्या बाबतीत इतर वर्णाचे लोक परतंत्र नाहीत. यामुळे समाजाचे पारडे समतोल आहे. दक्षिणेत ब्राह्मणेतरांची विद्या बंद झाल्याने सर्वच बाबतीत ब्राह्मणांच्या हाती श्रेष्ठपणा गेला आहे. धार्मिक, राजकीय, सामाजिक, शिक्षणविषयक वगैरे सर्वत्र प्राबल्य ब्राह्मणांचे, यामुळे इतर स्थिती फार परावलंबी व केविलवाणी झाली आहे. ही 'ब्युरॉक्रसी' मोडण्याकरिता पुष्कळ प्रयत्न झाले. पण जोपर्यंत ब्राह्मणांच्या धार्मिक वर्चस्वावर प्रत्यक्षपणे हल्ला होऊन ते नाहीसे होत नाहीत तोपर्यंत ब्राह्मणेतरांची परावलंबी स्थिती दूर होणार नाही. हे मर्म जोतीराव फुले यांनी जाणून ब्राह्मणी सत्तेच्या अगदी मर्मस्थानी प्रहार करण्यास सुरुवात केली. जोतीराव यांच्या 'सत्यशोधक समाजा'चे मुख्य मत, ईश्वर व भक्त यांच्यामध्ये दलाल नको, हे आहे. याप्रमाणे ब्राह्मणी मध्यस्थांची जरूर न ठेवता प्रत्येकाने आपली धर्मकृत्ये स्वत: करावीत असा उपदेश त्यांनी सुरू केला. बहुजनसमाज ब्राह्मणी गुलामगिरीत व तज्जन्य अज्ञानात, हजारो वर्षे वाढलेला असल्याने सत्यशोधकांच्या कामात पुष्कळ अडथळा येत असतो. अर्थात् सुधारकांस अडचणीशी टक्कर देणे भागच पडत असते.

वेदाचा अधिकार मनुष्यमात्रांस आहे असे स्वामी दयानंदजी यांनी प्रतिपादन केले व वेदविद्या उत्तर हिंदुस्थानात वाढविली. हजारो, लाखो लोक आर्यसमाजास मिळून त्यांची गुरुकुले, पाठशाळा, कन्या महाविद्यालये, कॉलेजे वगैरे शिक्षण संस्था स्थापन झाल्या. वेदांचा अधिकार सर्वांस आहे असे प्रतिपादिल्याने मनुष्यजातीचे समानत्व पटू लागले. समाजात एकप्रकारचे उच्च प्रतीचे जीवन येऊ लागले व त्यांचे वर्धन चांगल्याप्रकारे होऊ लागले. स्वामी दयानंद यांच्या मताचा प्रसार उत्तर हिंदुस्थानात झपाट्याने झाला. पण नर्मदेच्या दक्षिणेस त्यांनाही जास्त विरोध होऊ लागला.

याचे कारण, मी आताच वर्णिलेल्या 'ब्राह्मण ब्युरॉक्रसी'चे सामर्थ्य हे आहे. पुणे मुक्कामी स्वामीजींचा मुक्काम असताना त्यांचे सुविचार परिप्लुत भाषणे ऐकल्यावर, 'आर्यसमाजी

मत हे विष आहे' हे 'ब्राह्मण ब्युरॉक्रसी'स कळून आले व स्वामीजींच्या मिरवणुकीस विरोध करण्याकरिता म्हणून गर्दभानंद सरस्वतींची मिरवणूक काढण्याची हलकट कृती त्यांच्या डोक्यातून निघाली. इकडे ब्राह्मण वर्ग मूर्तीपूजेत अगदी गढलेला. त्यांना त्याशिवाय दुसरे काय सुचणार ? आपल्या समाजाचे यथार्थ चित्र अशी गर्दभाची मूर्तीच त्यांनी स्वामीजींच्या पुढे आणून सर्वांस आपल्या खऱ्या योग्यतेची व स्वरूपाची जाणीव करून दिली. त्या ठिकाणी गोड शब्द किंवा युक्तिवाद उपयोगी नाही; असेच 'ब्राह्मण ब्युरॉक्रसी'स वागविले पाहिजे हे जोतीराव फुले व त्यांचे अनुयायी यांनी चांगले ओळखले होते. म्हणून जशास तसे अशा रीतीने ब्राह्मणाविरूद्ध उपदेशास सुरुवात केली. खऱ्या धर्मविद्येचा व धर्माचा प्रवेश या दक्षिण भूमीत व्हावयास पाहिजे असेल तर सत्यशोधक समाजासारख्यांनी ही भूमी त्या कार्यास योग्य अशी तयार केली पाहिजे. अशारीतीने जमिनीतील तण व खडक फोडून काढिले म्हणजे आर्यधर्माचे बीज चांगले रूजेल व वृद्धि पावून सर्वांस सुख होईल. ब्राह्मधर्म कोणताही एक ग्रंथ प्रमाण मानीत नाही. सर्व धर्मात असलेला चांगुलपणा मधुकर वृत्तीने घेऊन त्या धर्माची तत्त्वे ठरविण्यात आली आहेत. पण अशी विवेचकबुद्धी फार थोडयांस असल्याने ही मते फारच थोडया लोकांस पटणार. यामुळे ब्राह्मण मताचा प्रसार मोठ्या प्रमाणावर होणे शक्य दिसत नाही.

आर्यसमाज वेदाच्या दृढ पायावर स्थापिलेला आहे. वेदाइतका जुना ग्रंथ कोणताही नाही. वेदाचे प्रमाणत्व या आर्यवर्तात बहुतेकांस कबूल आहे. वेदाविषयी पूज्यबुद्धी बहुतेकांच्या मनात आहे. वेदांचा अधिकार आपणास असावा असे पुष्कळास वाटते व यामुळे हे मत फार लवकर प्रसार पावते. या आर्यवर्तात आर्यधर्माचा प्रसार जास्त जास्त प्रमाणावर होत जाणार यात संशय नाही.

हा आर्यावर्त देश पूर्वी कधीही एक राष्ट्र नव्हता; पण हल्ली एकच इंग्रजी राज्यछत्र सर्वांवर असल्याकरणाने, राष्ट्रैक्याची भावना उत्पन्न होऊ लागली आहे. ती हळूहळू वाढतही जात आहे. ही कल्पना अशी वाढण्याच्या कामी आर्यसमाजाची कामगिरी वाखाणण्यासारखी आहे. आर्यसमाज हा या देशातील आर्यलोकांस, मग ते कोणत्याही जातींचे किंवा पंथांचे असोत, त्यास आपणात मिसळून घेतो. इतकेच नाही तर जे आर्यवंशाचे नाहीत, अशा लोकांसही आपणात मिसळून घेऊन आर्यांचे सर्व अधिकार, बेटी रोटी व्यवहारांसह त्यास देतो. मग युरोप खंडातील व अमेरिकेतील टयुटानिक वंशाचे लोक जे आर्यवंशाचेच आहेत असे सर्व विद्वान कबूल करितात, त्यास घेण्यास तर तो कधीही पाऊल मागे घेणार नाही. पूर्वी आर्यवंशाचे लोक सर्व उत्तर ध्रुवाच्या प्रदेशात एकत्र राहात असत. पुढे तो प्रदेश सोडावा लागल्यावर त्यांच्या टोळ्या पूर्वेकडे व पश्चिमेकडे गल्या. त्यातील पश्चिम आर्यांच्या वंशातील आता युरोपियन बलाढय राष्ट्रे आहेत.

पूर्वेकडे आलेल्या आर्यांचे आम्ही आर्यावर्तवासी वंशज आहोत; तेव्हा आम्हास युरोपियन व त्यांचेच वंशज अमेरिकन हे परकी नाहीत. पश्चिमेकडील मोठमोठ्या वीरांनी, लॉर्ड किचनेर, जनरल फ्रेंच, मॉर्शल फॉक् वगैरेंनी रणांगणावर लढून आपले क्षात्रतेज प्रत्ययास आणून दिले आहे. आपल्या मनाने ते क्षत्रिय आहेतच व त्यांची इच्छा असल्यास आपण त्यास आर्यधर्माची दीक्षाही द्याल. हजारो वर्षे आम्ही व पश्चिमेकडील आर्य लोक निराळे राहिल्याने त्यांच्या व आमच्या आचारविचारांत फार फरक पडला आहे. परंतु काही मूलभूत तत्त्वे त्यांच्यात व आमच्यात एकच आहेत. जातिभेद ते मानीत नाहीत.आमच्याही खऱ्या धर्मास तो भेद मान्य नाही. फक्त बनावटी ब्राह्मणी हिंदूधर्म हा स्पर्शास्पर्शास महत्त्व देत असून जातिमत्सर वाढवीत आहे खरा पण आर्यधर्म संग्राहक आहे. याच्या योगाने भिन्न भिन्न जातींचा, पंथांचा व धर्मांचा एकोपा होण्यास मदत होणार आहे.

युरोपात, अमेरिकेत व जपानात समानतेचे तत्त्व प्रचारात असल्याने, एकाच कुटुंबात भाऊ भाऊ, नवरा-बायको वगैरे भिन्न धर्माचे आढळतात. तसाच प्रकार नवरा आर्यसमाजी तर बायको इतर धर्माची किंवा बायको आर्यसमाजी तर नवरा इतर पंथाचा असेही एका कुटुंबात सलोख्याने सापडणे अशक्य नाही. कुटुंबातील भाऊ-भाऊ निराळ्या पंथाचे किंवा धर्माचे राहतील. प्रत्येकास आचार व विचार स्वातंत्र्य पाहिजे. आर्यसमाज ते देत आहे. ब्राह्मणी हिंदूधर्म तसे स्वातंत्र्य देत नाही म्हणून त्यांच्यापासून फूट वाढत असून आर्यधर्मापासून एकोपा वाढणार आहे. एकराष्ट्रीयत्वाच्या कामी याचा फार उपयोग आहे पण आमची नजर नुसत्या एका राष्ट्रीयत्वानेच कुंठित होता कामा नये. नुकत्याच संपलेल्या महायुद्धात प्रत्येक राष्ट्र आपल्या देशाच्या प्रेमानेच लढाईत शिरले. पण आता सर्वांची एक 'सोसायटी ऑफ नेशन्स' स्थापन करण्याचे विचार तिकडील थोर मुत्सद्यांच्या मनात घोळत आहेत. तसेच सामर्थ्य आर्यधर्माच्याही अंगी आहे. सर्वत्र आर्यधर्माचा घोष करण्याची आकांक्षा आपण धरणे योग्य नाही.

आर्यधर्माचे हे महत्कार्य लक्षात आणूनच आमचे सिसोदेवंशीय उदेपूरचे महाराणा सज्जनसिंह व आमचे जोधपुरचे महाराज प्रतापसिंह यांनी या धर्ममतांच्या प्रचारार्थ चांगलीच खटपट केली आह व ज्याला या देशाचे खरे कल्याण व्हावे असे वाटत असेल त्याने आपणाकडून होईल तितकी मदत या कामी केली पाहिजे. बनावटी ब्राह्मणी धर्माला सनातन असे मोठे नाव देऊन त्याचे महत्त्व, अज्ञानांच्या मनावर ठसविण्याचा प्रयत्न वारंवार केलेला दिसून येतो. सनातन तत्त्वे म्हणजे वेदांनी प्रतिपादिलेली ती फार चांगली आहेत पण त्यास झाकून ठवून धूर्त लोकांनी पुराणे व स्मृत्या यात फार

घुसवाधुसव केली आहे. आपणास व आपल्या जातीच्या लोकास खूप चैन करण्यास मिळावी म्हणून पुराणांत व ' भारत ' वगैरे ग्रंथातही अनीतीस उत्तेजन देणाऱ्या गोष्टी लिहून ठेवल्या आहेत. अशा ग्रंथास धर्मग्रंथ म्हणण्यास लाज वाटली पाहिजे. असले हे ग्रंथ अगर त्यातील वाईट भाग ऋषिप्रणित खात्रीने नाहीत. इंग्रजी राज्यात आमचे डोळे उघडण्याने आम्हास आता हे अनिष्ट प्रकार दिसून येत आहेत. आता आम्ही याचा तीव्रपणे निषेध करणे जरूर आहे.

दक्षिण हिंदुस्थानची धार्मिक व सामाजिक स्थिती कशी शोचनीय आहे, हे मी आपणास पूर्वीच सांगितले आहे. यात जास्त फूट पाडण्यास ब्राह्मण म्हणविणारे कसा प्रयत्न करीत असतात याचे माझेच उदाहरण सांगतो : राजा असल्याने आपण विष्णूचा अंश आहात म्हणून आपण क्षत्रिय आहात. आपल्या घरी आम्ही वेदोक्त कर्मे करण्यास तयार आहोत, असे धूर्त ब्राह्मण मला म्हणतात. या युक्तीने माझ्या ज्ञातिबंधूंत व माझ्यात फूट पाडण्याचा प्रयत्न त्यांनी केला. त्याचप्रमाणे मराठे लोकातही निरनिराळी कारणे लावून अमूक श्रेष्ठ म्हणजे सच्छिल, अमूक कनिष्ठ असे सांगून ते फूट पाडीत असतात. यासाठी आर्यसमाजाचे प्रयत्न याच प्रांतात विशेष झाले पाहिजेत. बनावटी धर्मगुरुंचा सुळसुळाट नासिक, पंढरपूर या क्षेत्रांतच असतो. तेव्हा त्या त्या ठिकाणी आपल्या शाळा, गुरुकुले उपदेश मंदिरे झाली पाहिजेत व खऱ्या धर्माचे ज्ञान वाढविले पाहिजे. नामदार पटेल यांनी हिंदुस्थानच्या कायदे कौन्सिलात आणलेल्या बिलास पुष्टी देण्याचा ठराव आपल्या अधिवेशनात आपण आणणार आहात हे फार चांगले आहे. जातिभेदामुळे रोटीबेटी व्यवहारास फार अडचण येऊन समाजात फार फूट झाली आहे. राष्ट्रीय भावना वाढण्यास आपल्या समाजाचे कार्य किती उपयोगी आहे हे मी आताच सांगितले आहे. ना. पटेल यांचे बिलही याच दिशेने उपयोगी आहे.

जातीजातीत विवाहसंबंध होऊ लागल्याशिवाय जातिभेदाची तीव्रता कमी होणार नाही. या बिलास विरोध करण्याच्या कामी प्रत्येक प्रांतातील ब्राह्मण वर्गच पुढे येत आहे. त्यात त्यांचा उद्देश स्पष्ट आहे. आपले बनावटी वर्चस्व नाहीसे होण्याची वेळ जितकी लांब टाकवेल तितकी टाकण्याची ही सारी धडपड आहे. बहुतेक सगळा ब्राह्मणेतर समाज या कामी या बिलास अनुकूल आहे. त्याप्रमाणे सभा भरुन ठिकठिकाणी ठराव होत आहेत. ना. भूपेन्द्रनाथ बसू यांनी पूर्वी अशाच प्रकारचे बिल आणले होते. त्यावेळी 'धर्म बुडेल' अशी ओरड या मतलबी लोकांनी केली होती. त्या बिलाच्या धर्तीवर लग्नासंबंधी कायदे इंदूर, बडोदा व कोल्हापूर या आर्यधर्मी राज्यांत पास झाले आहेत.पण तेथे धर्म बुडाल्याचे

चिन्ह काहीच दिसून येत नाही. धर्म म्हणजे भटाची दक्षिणा, असा अर्थ असल्यास तिला मात्र धोका आहे. ही दक्षिणा सर्वस्वी बुडाल्यास देशाचे कल्याणच होईल.

माझे भाषण आपण शांतपणे ऐकून घेतलेत, माझा बहुमान केलात, त्याबद्दल आपले मी पुन्हा एकवार आभार मानतो. आर्यधर्माचे ज्ञान सर्वत्र प्रसार होऊन, त्या योगाने या देशाची चिरकाल टिकणारी उन्नती होवो व सर्व जगात शांती आणि आनंद फैलावो; अशी ईश्वराची प्रार्थना करुन मी आपले भाषण संपवितो.

नऊ

# ऋषींचे मिशन



सन १९१८ मध्ये नवसारी येथे भरलेल्या आर्यधर्म परिषदेच्या अकराव्या अधिवेशनप्रसंगी शाहू महाराजांनी अध्यक्षपदावरून केलेल्या भाषणातील सर्वसाधारण आशयच, 'ऋषींचे मिशन' मध्यें स्थूलरूपाने आला आहे. तरीही त्यातून राजर्षींच्या आत्मनिष्ठेचे एक वेगळे दर्शन लाभते.

प्रारंभी ब्राह्मण्याचा कोणता दुष्परिणाम झाला आहे हे कथन करताना राजर्षी म्हणतात: "आज पराक्रम, विद्वत्ता, धर्मशीलता, उदारतावादी सद्‌गुण लुप्त झाले आहेत. परिणामी, बालविवाह, बहुविवाह, मद्यपान, स्त्रियांना शिक्षणास मज्जाव, वर्णाश्रमधर्माची अव्यवस्था वगैरे अनेक सामाजिक घातकी रूढींनी समाज निर्जीव करून टाकला आहे. गुरुवर्गाची चळवळ फोफावली आहे. 'अष्ट वर्षा भवेत् गौरी' हा अवैदिक पाठ सुरू झाल्याने या देशाचे राष्ट्रीयत्व जवळ जवळ नष्ट झाले आहे." हा कर्मकांडाचा प्रभाव व त्यांच्या मगरमिठीतून सामान्यांची सुटका करण्याचे झालेले प्रयत्न यांचे मूल्यमापन करताना, त्यामधील अपुरेपणाकडे लक्ष वेधताना राजर्षी सांगतात : "जरी 'सत्यशोधक समाजा'दी समाजांनी काहीशी सुधारणा केली आहे; तथापि ह्या संस्थांनी विशेष अधिक काही होऊ शकणार नाही. कारण त्या 'शठं प्रति शाठ्यं' या तत्त्वावर चालत आहेत." उलट आर्यसमाजच हे कार्य करू शकेल हे सांगताना ते म्हणतात : "देशाला जागृत करणारी रामबाण मात्रा वैदिक धर्मच आहे. कारण हिंदुस्थानच्या अंतःकरणात



भावनगर : सौराष्ट्र : गुजरात राज्य : ८ मार्च, १९२०

अ. भा. आर्यधर्म परिषदेच्या समारोपाच्यावेळी; शाहू महाराजांनी केलेले भाषण

वेदाभिमान वसत आहे व आर्यसमाज वेदानुकूल राहण्यातच आपला धर्म समजत आहे. आर्यसमाजाचा धर्म जगावर उपकार करण्याचा आहे. . . आर्यधर्म यच्चयावत मानव समाजाकरिता आहे.'' सर्व देशभर ह्या आर्यसमाजाचे कार्य सुरू व्हावे ही राजर्षींची अंतर्यामीची इच्छा आहे. म्हणून ''लोकांची मानसिक सुधारणा व्हावी. ती सुधारणा विद्येच्याद्वाराच शक्य आहे. म्हणून विद्येची सूत्रे मी आर्यसमाजाच्या हाती देऊन टाकली आहेत.'' असे त्यांनी म्हटले आहे.

सर्वसामान्यांना शहाणे करून, त्यांचा अभ्युदय साधण्याच्या कामी उपयोगात आणण्याच्या साधनांवरील श्रद्धा आणि अंती साधावयाचे ऐक्य या संबंधातील शाहू महाराजांच्या भावना-विचारांमधील अद्वैत नितळ स्वरूपाचे आहे.



# ऋषींचे मिशन



सज्जनहो ! आपण जरा भारतवर्षाच्या गतेतिहासावर दृष्टिपात करू. हजार वर्षांपूर्वीच्या व आताच्या भारत वर्षात जमीनअस्मानाचे अंतर पडले आहे. आज पराक्रम, विद्वत्ता, धर्मशीलता, उदारतावादी सद्‌गुण लुप्त झाले आहेत. हजारो कुसंस्कार, चालीरिती यांनी भारतवर्ष ग्रासून गेलेला पाहून काही आश्चर्यही वाटत नाहीसे झाले आहे. बालविवाह, बहुविवाह, मद्यपान, स्त्रियांना शिक्षणास मज्जाव, वर्णाश्रमधर्माची अव्यवस्था वगैरे अनेक सामाजिक घातकी रूढींनी समाज निर्जीव करून टाकला आहे.

उदाहरणार्थ, वर्णव्यवस्था घ्या. संपूर्ण भारत विशेषत: महाराष्ट्रादी दक्षिण प्रांतांत ब्राह्मणेतर जातीची अवस्था अत्यंत शोचनीय आहे. ह्या जातींना पुढे सरसावण्यास व प्रगती करून घेण्यास संधीच दिली जात नाही. आज विसाव्या शतकात अस्पृश्य गणले जाणारेदेखील प्राणी आहेत. त्यांचा अपराध एवढाच आहे की, त्यांनी एखाद्या विशिष्ट जातीमध्ये जन्म घेतला नाही. आज भारतवर्षात ऐक्य, प्रेम व सहकार्य कोठेही पाहावयास मिळत नाही. याचे कारण आमची स्वत:चीच मूर्खता होय. भारतवर्षामध्येच अशी मनुष्ये वर्तमान आहेत की, ज्यांना आपल्या बंधूंची छायाही, आपल्यावर पडणे दु:सह होते. स्वत:चे स्वत:लाच उच्च समजणारे लोक मिथ्या जातिभिमानाच्या निशेत अगदी निमग्न होऊन राहिले आहेत व नीच म्हणविल्या जाणाऱ्या जातीवर मन मानेल तसे अत्याचार करून राहिले आहेत.

मनुष्याला त्याच्या योग्यतेनुसार उच्चनीच वर्ण देणे हा वैदिक आदर्श होता. मुनी लोकांनी,

**‘ धर्मचर्यया जघन्यो वर्ण : पूर्वं पूर्वं वर्णमापद्यते जाति परिवृतो ।**
**अधर्मचर्यया पूर्वो वर्ण : जघन्य जघन्य वर्णमापद्यते जाति परिवृतो । ’**

असा उपदेश केला. त्याठिकाणी पौराणिक लोकांनी ' ब्राह्मण न जाते : ब्राह्मण : ' अशी व्युत्पत्ती करून ब्राह्मणादी जन्मवाचक अर्थ करण्यास प्रारंभ केला. मनास येईल त्याप्रमाणे ग्रंथरचना सुरू केली. ' स्त्री शूद्रो नाधीयताम् ' हा जणु काय वेदमंत्रच कंठस्थ करविला. याचा परिणाम असा झाला की,स्त्री व शूद्र यांना ज्ञानमार्ग बंद झाला. बराच काळ अशी स्थिती राहिल्यामुळे शूद्र स्वतःच अस्पृश्य समजून राहिले. मग काय ? ब्राह्मणांचे साधले व त्यांनी ब्राह्मणत्वाचा मक्ता आपणाकडे घेतला.

ब्राह्मणाचे जीवन पारमार्थिक जीवन आहे. जेव्हापासून योग्यतेप्रमाणे उच्चनीचत्वाची पारख नष्ट झाली तेव्हापासून नामधारी गुरूवर्गाची खूप चंगळ उठली. जन्मापासून मृत्यूपर्यन्त तर ते लुटले, तर्पणादी लुटलेच परंतु त्यानंतरही श्राद्ध वगैरेंची अवडंबरे माजविली.

सज्जनवृद्ध ! जेव्हा देशनौकेचे कर्णधार ब्राह्मण स्वार्थी बनले होते, तेव्हा ' अष्ट वर्षा भवेतगौरी ' हा अवैदिक पाठ उच्च स्वराने म्हटला जात होता व राष्ट्रीयत्व जवळजवळ नष्ट झाले होते. आणीबाणीच्या समयी ह्याच काठेवाड प्रांतात, जेथे आपली ही परिषद भरली आहे त्या भावनगरसमीप, भौरवीगावी आपल्या स्वदेशाच्याच जागृतीसाठी नव्हे तर अखिल भूमंडळ जागृत करण्यासाठी महर्षी दयानंदांचा जन्म झाला. त्यांनी तपश्चर्या केली. वेदाध्ययन केले, भारत खंडाच्या अवनत स्थितीचे परीक्षण केले आणि निःस्वार्थ बनून मतमतांतरांचा जो अग्नी भारतात प्रज्ज्वलित होता त्यामध्ये उडी ठोकली. पदभ्रष्ट ऋषी संतानास पुनः सन्मार्गावर आणून सोडले. चोहोकडे जागृती केली. लोकांनी त्यांना गालीप्रदान केले. त्यांच्यावर दगडधोंड्यांची वृष्टी केली व शक्य तितका त्यांचा तिरस्कार केला. परंतु या सर्व मानापमानाची मुळीच पर्वा न करता त्या महर्षी, तपस्वी, त्यागी दयानंदानी वैदिक धर्माचा डंका वाजविलाच. नामधारी ब्राह्मणांच्या पोटशूळाला आरंभ झाला. त्यांनी दयानंद ऋषींची गती कुंठित करण्याचा होता नव्हता तो प्रयत्न केला, पण ईश्वरीय चाल कोणत्या शक्तीस कुंठित करणे शक्य होते ? त्यांच्या केवळ दहा वर्षांच्या गर्जनेने पंजाब, संयुक्त प्रांत, राजपुताना, बंगाल, बिहारादी खडबडून जागे झाले. लाखो लोक त्यांचे अनुयायी बनले. उत्तर भारतवर्षातच काय; आज् संपूर्ण भारत खंडात अवैदिकीय पाठाऐवजी ' ब्रह्मचर्येण कन्या वा युवानं विंदते पतिम ' शूद्रे ' ब्राह्मणतामति ब्राह्मणो यति शूद्रताम् ' हा वैदिक पाठ सुरू झाला.

आर्यसमाजाचे कार्य जगास विदितच आहे. स्पर्शास्पर्शतेचे काल्पनिक बंड मोडून समाजाने युद्धातही फार मदत दिली आहे. परदेशगमनाने मनुष्य पतित समजले

जात असत तेच आता वांछनीय समजले जात आहेत. आर्यधर्म यच्चयावत मानव समाजाकरिता आहे. आनंदाची गोष्ट ही की, पुष्कळ युरोपियन स्त्री-पुरुषांनी या आर्यधर्माचा स्वीकार केला आहे; करीत आहेत. खरे म्हणाल तर, लॉर्ड किचनेर सर हेग, लॉर्ड फ्रेंच प्रभृतींची गणना पहिल्यापासूनच आर्यामध्ये होऊ शकते. कारण की, या योद्धयांनी क्षत्रियोचित धर्माचे परिपालन केले आहे. माझ्या मते, हाच धर्म शासित-शास्त्यात प्रेमरज्जूने ऐक्य करण्याचा प्रयत्न करीत आहे. मला पूर्ण भरवसा आहे की, आर्यधर्म विश्वव्यापी धर्म बनेल. याच धर्माचे अनुयायी प्रतापसिंह व सज्जनसिंह वगैरे नरेश आहेत; होते. ही अभिमानास्पद गोष्ट होय. आम्हालाही त्यांचेच अनुकरण केले पाहिजे. ही पण संतोषाची गोष्ट होय की, अद्यापिही जरी स्वार्थी लोक इतस्ततः हातपाय आपटतात, तथापि खरे ब्राह्मण व सुशिक्षित जनता ही सर्व आम्हाला अनुकूल आहे. परंतु दक्षिण प्रांतातही अद्याप पुष्कळसे कर्तव्य बाकी आहे. आर्यांचे हे कर्तव्य आहे की, या देशात भ्रातृभाव जागृत करावा.

जरी 'सत्यशोधक समाजा' दी समाजांनी काहीशी सुधारणा केली आहे; तथापि या संस्थांनी विशेष अधिक काही होऊ शकणार नाही. कारण त्या, 'शठं प्रति शाठ्यं' या तत्त्वावर चालत आहेत. परंतु देशाला जागृत करणारी रामबाण मात्रा वैदिक धर्मच आहे. कारण हिंदुमात्राच्या अंतःकरणात वेदाभिमान वसत आहे व आर्यसमाज वेदानुकूल राहण्यातच आपला धर्म समजत आहे. आर्यसमाजाचा धर्म जगावर उपकार करण्याचा आहे.

सज्जनहो ! वैदिक धर्माचे महत्त्व अन्य मतांपेक्षा अधिक आहे हे समजूनच मी या धर्माचा स्वीकार केला आहे.

राजाराम कॉलेज, हायस्कूल, गुरुकुल, अनाथालय, सरदार बोर्डिंग वगैरे सर्व संस्था मी आर्य प्रसारक सभा, संयुक्त प्रांत हिच्या आधीन एवढ्याच उद्देशाने केल्या आहेत की, लोकांची मानसिक सुधारणा व्हावी. ही सुधारणा विद्येच्या द्वाराच शक्य आहे. म्हणून विद्येची सूत्रे मी आर्यसमाजाच्या हाती देऊन टाकली आहेत. मला जे शक्य झाले ते मी केले आहे. माझी अंतःकरणपूर्वक इच्छा आहे की, माझ्या जोतिबा, पंढरपूर वगैरे क्षेत्रामध्येदेखील आपण गुरुकुले, हायस्कुले, समाज स्थापन करावेत. माझे कर्तव्य होते ते मी करून टाकले आहे. आता पुढील कर्तव्य सर्वस्वी तुमच्या हाती आहे. जर इतक्यावरही वैदिक धर्माचा प्रसार झाला नाही तर ह्यात आर्य प्रसारक व आपण हेच दोषी व्हाल. माझी इच्छा आहे की, थोडेसे सच्चे कर्मवीर माझ्याकडेही आपला समय लावतील.

आर्यबंधूनो ! आपल्यामधून अद्याप कर्महीनता नाहीशी झाली नाही. ऋषींची प्रेरणा सुशिक्षित समुदायांमध्ये दृग्गोच्चर होत आहे. देशातील सर्व समाज, सभा, सोसायट्या वैदिक सिद्धान्तानुसार कर्तव्य बजावीत आहेत. 'यथेमां वाचं कल्याणि' ह्या वेदाज्ञेनुसार आर्यसमाजाने गुरुकुले, अनाथालये, कॉलेजे वगैरे संस्था काढून भेदभावरहित सर्व जातींच्यामध्ये वेदवाणीचा प्रचार केला आहे. तरीही आम्ही अद्यापि ऋषींचे शतांशाने कर्मवीर बनलो नाही. अकर्मण्यतेचा हा समय नव्हे, कर्मण्यता पाहिजे आहे. उदाहरणार्थ, पटेल बिल घ्या. त्यानुसार वागण्यास आपण प्रारंभ केला पाहिजे. वेदप्रतिपादित गुणकर्मानुसार आपण कृतीने वर्णव्यवस्था पाळीत आहो, हे सिद्ध करण्याची आता वेळ आली आहे.

मी आपला बराच वेळ घेतला. परंतु आपण लक्षपूर्वक उत्साह दाखवून माझे भाषण ऐकून घेतलेत, त्याबद्दल मी आपले पुन: अंत:करणपूर्वक आभार मानून, शेवटी सर्वांस विनयपूर्वक सांगतो की, ऋषी दयानंदांच्या कार्याची आपल्या हृदयावर छाप पडली असेल तर याद राखा की, ह्या काठेवाड भूमीमध्ये बाळ मूलशंकराने कठीण प्रतिज्ञा करून गृहत्याग केला होता, तर आपणही या तीर्थस्थानाहून परत जाताना कठीण प्रतिज्ञा करावी की, वैदिक सिद्धान्त व विचार आम्ही कृतीत आणण्यासाठी यत्किंचितही कसूर करणार नाही.बंधूहो! अंती सत्याचा जय आहे हे लक्षात बाळगून 'ऋषींचे मिशन' प्रसृत करण्याचा प्रयत्न करा व कामास लागा. परमात्मा तुम्हास बळ देईल; कारण की, कर्मवीरांचा सहाय्यकर्ता तोच ईश्वर आहे.

❧

दहा

# समाजसुधारणा कोण करू शकेल ?



राजर्षी शाहू महाराजांनी ' समाजसुधारणा कोण करू शकेल ?' मध्ये प्रारंभीच मोकळेपणाने आपल्यातील सुरुवातीचा संकुचित मनोवृत्तीचा दोष कबूल केला आहे, राजर्षी सांगतात : " काही वर्षापूर्वी माझ्या कोत्या समजुतीने मी आपणांकडे बंधूप्रेमाने पाहात नव्हतो. आता माझी चूक मला समजून आली आहे. अस्पृश्य हा शब्द कोणाही माणसाला लावणे हे फार निंद्य आहे. तुम्ही अस्पृश्य नाही. तुम्हास अस्पृश्य मानणाऱ्या पुष्कळ लोकांपेक्षा जास्त बुद्धिमान, जास्त पराक्रमी, जास्त सुविचारी, जास्त स्वार्थत्यागी असे तुम्ही हिंदी राष्ट्राचे घटकावयव आहात. आपण निदान बरोबरीची भावंडे आहोत. आपले हक्क समान आहेत. आम्ही सर्व हिंदी आहोत, बंधू आहोत. हिंदी प्रजाजन कोणत्याही धर्माचे असोत, ते सर्व हिंदी आहेत. व्यक्तीच्या दृष्टीने धर्माची बाब महत्त्वाची असेल; पण राष्ट्रीय बाबतीत ती केव्हाही आड येता कामा नये.'' भारतातील राष्ट्रीय ऐक्य वाढीला लावण्यासाठी राजर्षींनी प्रकट केलेली ही मानवतावादी राष्ट्रीय मनोवृत्ती-हा राष्ट्रीय विचार-सार्वकालिक आहे.

धर्माविषयी विवेचन करताना राजर्षी समानतेच्या तत्त्वाचा उद्घोष करतात. सांगतात: " देशाची म्हणजे देशबंधूंची सेवा करणे, 'जनी जनार्दन' शोधणे व पाहाणे हाच खरा धर्म आहे. याप्रमाणे विचार केल्यास धर्मभेदाच्या किंवा जातीभेदाच्या सबबीवर एकमेकांचा मत्सर करणे अगदी चुकीचे आहे म्हणून आमच्या सर्व देशबंधूंना मोठ्या प्रेमाने, आपल्या बरोबरीचे हक्क देऊन वागविले पाहिजे. सर्व प्रजाजनांस सारखे हक्क



नागपूर : ३० मे, १९२०

अ. भा. बहिष्कृत समाज परिषदेच्या अध्यक्षपदावरून, शाहू महाराजांनी दिलेले भाषण

आहेत. सर्वांना सारखे कायदे लागू केले पाहिजेत.'' त्या दृष्टीने अस्पृश्यता नष्ट करण्यासाठी आपण कोणकोणते प्रयत्न केले आहेत व केले पाहिजेत याचे त्यांनी मनोज्ञ विवेचन केले आहे. त्यांच्या मते सर्वात महत्त्वपूर्ण उपाय म्हणजे, " हा जातिभेद नाहीसा होण्यास भिन्न भिन्न जातींचे शरीरसंबंध विस्तृत प्रमाणावर होणे फार जरूर आहे.'' राजर्षींचे हे द्रष्टे विचार लोकप्रियता मिळविण्यासाठी नसून सच्च्या तळमळीचे द्योतक आहेत. आजही ते मार्गदर्शक आहेत.

'समाजसुधारणा कोण करू शकेल ?' यासंबंधीचे, शाहू महाराजांचे विवेचन अनेकांची मख्खी जाणून, नेमके वर्मावर बोट ठेवणारे आहेत.

ॐ

दहा

# समाजसुधारणा कोण करू शकेल ?



माझी योग्यता नसता व माझ्या अनुमतीची जरुरी न ठेवता मोठ्या बंधूप्रेमाने व सत्तेने आपण मला आपला समजून, आजच्या कॉन्फरन्सचा अध्यक्ष नेमिले, याजबद्दल मला मोठा अभिमान वाटतो.

काही वर्षांपूर्वी माझ्या कोत्या समजुतीने मी आपणाकडे बंधूप्रेमाने पाहात नव्हतो. आता माझी चूक मला समजून आली आहे. यापुढे तुमच्यावर माझे बंधूसारखे प्रेम राहील अशी मला खात्री वाटते. हे उघडपणे सांगण्यास मला मोठा अभिमान वाटतो. वास्तविक पाहाता आजच्यासारख्या बहुमानास मी विद्येने योग्य नसता, आपण मला अध्यक्षाचा मान दिलात, याबद्दल मी आपला फार आभारी आहे.

आपले कार्य साधण्यासाठी दुसऱ्यास पाहिजे तितका मोठेपणा द्यावयाचा, त्याची मनधरणी करावयाची, मी तुमच्या उद्धारासाठी प्रयत्न करतो असे खोटेच सांगावयाचे, वगैरे प्रकारांनी लोकांस फसवून त्यांच्यावर आपली छाप बसवावयाची असे काही स्वार्थसाधू लोक आहेत. अशा लोकांसारखे वागून आपणाला तोंडघशी पाडून, माझा स्वार्थ साधण्याची दुर्बुद्धी ईश्वराने मला देऊ नये, अशी माझी त्याजवळ प्रार्थना आहे.

आज आपण येथे सर्व हिंदुस्थानातील अस्पृश्य वर्गांपैकी पुढारी मंडळी जमलेले आहात. अस्पृश्य हा शब्द कोणत्याही माणसाला लावणे फार निंद्य आहे. या शब्दाचा तुमच्या संबंधाने सर्व उपयोग करितात म्हणून मी त्याचा उपयोग केला आहे. तुम्ही अस्पृश्य नाही. तुम्हांस अस्पृश्य मानणाऱ्या पुष्कळ लोकांपेक्षा जास्त बुद्धिमान, जास्त पराक्रमी, जास्त सुविचारी, जास्त स्वार्थत्यागी असे तुम्ही हिंदी राष्ट्राचे घटकावयव आहात. मी तुम्हाला अस्पृश्य समजत नाही. आपण निदान बरोबरची भावंडे आहोत, आपले हक्क समसमान तरी खास आहेतच; अशी भावना धरून आपणास पुढील कामास लागले पाहिजे. या

सत्कार्यात जे लपंडाव करतात त्यांची लबाडी ओळखण्याइतकी समज हल्ली जनतेस खास आलेली आहे.

मला आज सर्वांत मागासलेल्या देशबंधूंनी कॉन्फरन्सचा अध्यक्ष होण्यास बोलाविले आहे. वास्तविक पाहाता मी कोणाचा पुढारी नाही व पुढारी होऊही इच्छित नाही. मला पुढारी समजून आपण माझ्यामागे कोणी येऊ लागल्यास, त्यास 'माझ्यामागे येऊ नका' असे नम्रता पूर्वक सांगतो. होईल तितका याबाबतीत प्रतिबंधही करितो. हा प्रतिबंध मी अगदी प्रथम पासूनच म्हणजे घराच्या बाहेर पडण्यापूर्वी माजघरात करितो. कारण तशी खबरदारी न घेतल्यास व त्यांना काही वेळ मागे येऊ दिल्यास त्यास तक्रार करण्यास जागा होईल. ते म्हणतील की, 'आम्ही इतका वेळ आपल्यामागे आलो असता आपण आताच आम्हांस का झिडकारता ?' माझी मते व माझे आचरणही माझ्या स्वत: पुरतीच आहेत. माझ्या घरच्या मंडळींनी, आप्तेष्टांनी अगर मित्रांनीसुद्धा विचार न करता माझ्यामागून येऊ नये, अशी माझी इच्छा आहे. त्यांना याबाबतीत स्वयंनिर्णयाचे तत्त्व लावण्याची मी पूर्ण मोकळिक ठेविली आहे. माझी मते ज्यास पसंत असतील त्यांनी स्वत:चे इच्छेप्रमाणे स्वतंत्रपणे माझे अनुकरण करावे. त्यांना माझ्याकडून कोणत्याही प्रकारचे उत्तेजन अगर मदत मिळणार नाही.

आम्ही सर्व हिंदी आहोत, बंधू आहोत. हिंदी प्रजानन कोणत्याही वर्णांचे असोत, कोणत्याही धर्मांचे असोत, ते सर्व हिंदी आहेत. व्यक्तीच्या दृष्टीने धर्माची बाब महत्त्वाची असेल पण राष्ट्रीय बाबतीत ती केव्हाही आड येता कामा नये. यापुरती धर्मही बाब फारच कमी महत्त्वाची आहे, असे मला वाटते. 'धर्म' शब्दाची थोडक्यात व्याख्या देवाजवळ पोचण्याचा मार्ग अशी करता येईल. लंडन, मुंबई, कलकत्ता वगैरे मोठमोठ्या शहरास सर्व बाजूंनी रस्ते येऊन मिळतात. म्हणजे सर्व ठिकाणच्या लोकांचा उद्देश तो त्या त्या शहरी थोड्या वेळात व कमी श्रमाने पोचण्याचा असतो. त्याचप्रमाणे निरनिराळ्या देशात व परिस्थितीत उत्पन्न झालेल्या धर्माचाही उद्देश तोच आहे. यामुळे भिन्न भिन्न रस्त्यांनी मुख्य शहरास पोचणाऱ्या लोकांना एकमेकांचा द्वेष करण्याचे जसे कारण नसते,तसेच निरनिराळे धर्म पाळून ईश्वराजवळ पोचणाऱ्या लोकांनी तरी परस्परांचा द्वेष का करावा ?

निरनिराळे धर्म स्थापन झाले त्यावेळची स्थिती काय असेल ती असो. पण आजच्या स्थितीस तरी अमूक एका धर्माचे आचरण करून, अमूक एक अमूक एका देवळाजवळ पोचलेला आहे असे प्रत्यक्ष दिसत नाही. तोपर्यंत माझा तेवढा धर्म चांगला व इतरांचा वाईट असा पोकळ अभिमान करण्याचा अधिकार कोणासही नाही हे उघड आहे.

'दया धरमका मूल है, नरक मूल अभिमान' यावरून पाहाता देशाची म्हणजे देशबंधूंची सेवा करणे, 'जनी जनार्दन' शोधणे व पहाणे हाच खरा धर्म आहे. याबाबतीत सर्व धर्मांचे ऐक्य आहे. परोपकार हा पुण्यमार्ग आहे व परपीडा हे पाप. असेच सर्व धर्म प्रतिपादन करितात. याप्रमाणे विचार केल्यास धर्मभेदाच्या सबबीवर एकमेकांचा मत्सर करणे अगदी चुकीचे आहे.

राज्य संपादन करण्याच्या महत्त्वाकांक्षेने, पूर्वी या देशात लढाया झाल्या. अकबर, शिवाजी महाराज वगैरे महात्म्यांच्या काळी धर्मद्वेषाने किंवा जातिद्वेषाने कोणी लढाया करीत नसत. अकबर बादशहाच्या पदरी मराठे, रजपूत, इतर हिंदू सरदार व लढवय्ये अनेक लोक होते. विजयनगरच्या राजाच्या पदरी किंवा श्री शिवाजी महाराज यांच्या सैन्यात मुसलमानांची संख्या कमी नव्हती. या सर्वांनी स्वधर्मीयांबरोबर किंवा स्वजातीयांबरोबर लढण्याच्या प्रसंगी देखील आपले इमान कायम राखिले.अशावेळी त्यांचा निमकहलालपणा व बंधूप्रेम चांगल्याप्रकारे दिसून येई.

खरा धर्म सर्व देशात एकच आहे; हे मी आपणास सांगितलेच आहे. त्याचप्रमाणे वागणाऱ्यांवर म्हणजे शुभकर्म करणाऱ्यांवर ईश्वर संतुष्ट असणार व त्यांना काही शिक्षा करणार नाही. पण आम्ही खरा धर्म सोडून म्हणजे 'जनी जनार्दन' न पाहाता बनावट उच्चनीचभाव उत्पन्न करून, त्याप्रमाणे ग्रंथ तयार करून त्यांच्या आधारावर आमच्या बंधूंना पशूपेक्षाही नीच मानण्याचे भयंकर पातक करीत असता, आम्ही भागवताचे हजारो सप्ताह बसविले, मोठमोठी अनुष्ठाने सुरू केली, नाना प्रकारची स्तुतिस्तोत्रे गायिली, कीर्तने–पुराणे यांची झोड उडविली किंवा भजने करून कानठळ्या बसेपर्यंत टाळ कुटले, क्षेत्राच्या अनवाणी यात्रा केल्या, देवाच्या मूर्तीस लोटांगणे घातली, तरी ईश्वर अशाने संतुष्ट होईल काय? तो संतुष्ट होणार नाही हे खास. इतकेच नाही,तर आमच्या पातकाबद्दल तो आम्हाला शिक्षा दिल्याशिवाय राहणार नाही, अशी आमची सद्सद्विवेकबुद्धी आम्हास खास सांगते. आमच्यावरची ईश्वराची अवकृपा दूर झाली पाहिजे. आम्ही आमच्या सर्व देशबंधूंना मोठ्या प्रेमाने, आपल्या बरोबरीचे हक्क देऊन वागविले पाहिजे.

इंग्लिश राष्ट्राचे आमच्या देशावर व विशेषेकरून आमच्या अस्पृश्य मानलेल्या बंधूवर फार उपकार आहेत.त्या राष्ट्राने मनुधर्म शास्त्रासारखे एका जातीचे प्राबल्य स्थापन करणारे कायदे काढून टाकून, सर्व हिंदी प्रजेमध्ये समसमान हक्क निर्माण केले. ब्राह्मणास फाशी देऊ नये, त्यास लग्नकार्यात, अध्ययनात, वृत्तीत, दानधर्म, पूजाअर्चा वगैरे हरएक

बाबतींत परमेश्वराच्या योग्यतेचे मानून दुसऱ्या सर्व जातीस तुच्छ, कस्पटासमान व ब्राह्मणाची सेवा करण्याकरिता निर्माण केलेले आहेत, अशा तऱ्हेच्या कायद्यात, रूढीत, आचारात व धर्मात प्रतिबंध घालून ठेवणे म्हणजे सद्सद्विवेकबुद्धीला, सर्व उच्च मनोभावनांना तिलांजली दिल्यासारखे आहे. हल्ली समानतेच्या दृष्टीने पाहाता, अशा रीतीची योजना कायदेपंडितांत करण्यास कोणासही लाज वाटेल. डोळे काढावे, डागावे, हे वेद वाचू नयेत, असे जे अमानुष कायदे एकेकाळी मनुने रूढ केले होते, ते हल्ली इंग्रज सरकारने नाहीसे केले आहेत. परंतु हल्ली असलेल्या हिंदू कायद्यातही पुष्कळ दुरुस्ती झाली पाहिजे. राष्ट्रीयत्वाची व समाजाची कल्पना वाढलेली आहे. मिश्रविवाह, परदेशगमन, जातिभेद, परधर्माविषयी सहिष्णुता वगैरे सर्व कल्पना जोराने पुढे येऊ लागल्या आहेत. त्या कल्पनांना पोषक असे कायदे पाहिजे आहेत. तसे नसल्यास समाजाचे गाडे अडून राहणार आहे.

सर्व प्रजेला सारखे हक्क आहेत, सर्वांना सारखे कायदे लागू केले पाहिजेत. त्यात जातिभेदावर कमीअधिक शिक्षा असा अन्याय होता कामा नये. हे समानतेचे तत्त्व इंग्रजांनी राज्यकारभारात प्रथम लागू केले. त्यांच्या मिशनरी लोकांनी शाळा काढून, अस्पृश्यांच्या मुलांस फार ममतेने वागविण्याचे उदाहरण सर्वांच्या अगोदर घालून दिले. अशाप्रकारे न्यायी युरोप खंडातील हॉलंड, बेल्जम वगैरे देश आपल्या ताब्यातील परदेशच्या लोकांना शिक्षण देऊन उन्नती करीत नाहीत, पण इंग्रज लोकांचे, या कामी फार लक्ष असल्यामुळे ते श्रेष्ठ पदवीचे आहेत. इतकेच नव्हे तर आमचे बरेच लोक ' स्वराज्य नको' म्हणत असताना इंग्रज लोक आपणहून ते आम्हास देत आहेत, हा त्यांचा केवढा थोरपणा आहे ? सर्वांस समदृष्टीने पाहाणारे जे इंग्लिश साम्राज्य त्यांच्याशी आम्ही फार राजनिष्ठ राहिले पाहिजे; हे सांगण्यास नकोच. आमच्यावर त्यांचे फार फार उपकार आहेत.

गेल्या महायुद्धात मुसलमान, मराठे, जैन, महार, लिंगायत वगैरे सर्व जातींच्या बंधूंनी सरकारास मोठ्या हौसेने व उत्सुकतेने मदत केली; याचे तरी कारण काय ? आपण सर्व हिंदी आहोत. हिंदी राष्ट्राचे कल्याण इंग्रजी राजसत्तेवर अवलंबून आहे, आमची भिन्न भिन्न धर्मतत्त्वे आमच्या बंधूप्रेमाच्या आड येऊ देता कामा नये, तर आम्ही आमच्या उपकारकर्त्याची अडचण ओळखून आम्हास देता येईल तितकी मदत देणे हे आमचे कर्तव्य आहे, वगैरे उच्च भावनांनी आमचे सर्व लोक प्रेरित झाले; हेच ते कारण होय. याप्रमाणे आमच्या कृतज्ञतेची खात्री आम्ही आमच्या ब्रिटिश बंधूस पटवून दिली आहे. ईश्वरी इच्छेने हिंदुस्थानच्या कल्याणाकरिताच आम्ही ' ब्रिटिश

एम्पायर'चे ( British Empire ) अवयव झालो आहोत. आमचे हितसंबंध त्यांच्याशी एकजीव झाले आहेत.

इकडच्यापेक्षा मद्रासकडच्या आपल्या अस्पृश्य बंधूस सनातन धर्मवाल्याकडून फार त्रास होतो. तिकडचे ब्राह्मण सर्वच ब्राह्मणेतरांशी फारच अन्यायाने वागतात, इकडे महाराष्ट्रातही तशीच स्थिती आहे. मद्रास येथे ब्राह्मणेतर लोकांचा निराळा पक्ष स्थापन करून, त्यांच्यामध्ये आपल्या हक्कांची जाणीव उत्पन्न करणारे थोर मनाचे प. वा. डॉ. नायर यांना धन्यवाद देणे फार जरूर आहे. पंचमांचा उद्धार करण्याविषयी त्यांचा उद्योग मोठा होता. आपल्या घरात ते पंचमास खाजगी नोकर म्हणून ठेवीत.

या देशाची उन्नती लवकर किंवा उशिरा होणे, हे येथील जातिभेद ज्या प्रमाणात नाहीसा होईल; त्यावर अवलंबून आहे. हा जातिभेद नाहीसा होण्यास भिन्न भिन्न जातीचे शरीरसंबंध विस्तृत प्रमाणावर होणे फार जरुर आहे.रोटी व्यवहार जास्त प्रमाणावर आता होणार, त्याविरुद्ध कोणी कितीही धडपड केली तरी तिचा विशेष उपयोग होणार नाही. पण बेटीव्यवहाराची तशी गोष्ट नाही. असे विवाह होण्याकडे प्रवृत्ती होण्यास अगोदर कायदेशीर अडचणी दूर झाल्या पाहिजेत. म्हणजे असले विवाह कायदेशीर ठरले पाहिजेत. त्यापासूनच्या संततीस औरस संततीचे सर्व हक्क मिळाले पाहिजेत. नामदार मिस्टर पटेल यांनी वरिष्ठ कायदे कौन्सिलात प्रश्न आणला होता. तशा कायद्याची फार जरूरी आहे; पण असे विवाह होऊ लागल्यास ब्राह्मणांचे जन्मसिद्ध महत्वही कमी होणार. ब्राह्मणांवर हे एक मोठे संकट ओढवणार असल्याने ब्राह्मणी पत्रांनी त्या बिलाला मोठा कसून विरोध केला. ब्राह्मणी हिताकडे लक्ष दिले म्हणजे, हे त्यांचे करणे बरे दिसेल; पण देशहिताकडे यांनी अगदी दुर्लक्ष केले असे मोठ्या कष्टाने म्हणावे लागते. भिन्न जातींचे स्त्रीपुरुष विवाहबंधनाशिवाय एकत्र राहून त्यांनी अनीतीचे वर्तन उघड उघड केल्यास या धर्माभिमान्यांस खपते पण तसा अनीतीचा संबंध ज्यास नको त्यांना, कायदेशीर विवाह करण्याच्या मार्गात मात्र यांचा अडथळा; असे हे सार्वजनिक नीतिमत्तेचे शत्रू आहेत.

याच प्रसंगी माझे मित्र मिस्टर अरुंडेल यांच्याविषयी दोन शब्द सांगितल्याशिवाय माझ्याने राहावत नाही. यांनी एका ब्राह्मण युवतीशी विवाह केला म्हणून, आमच्या सनातन धर्मवादी ब्राह्मण बंधूंची त्यांच्यावर फार खप्पा मर्जी झाली आहे. ते त्यास नानाप्रकारे दूषणही देत आहेत, वास्तविक पाहाता इंग्लंड व हिंदुस्थान यांचा ईश्वरी इच्छेने जुळत आलेला संबंध जास्त दृढ होण्यास अशा प्रकारचे विवाह फार आवश्यक आहेत. काम असेपर्यंत मात्र तुम्ही–आम्ही एक, अशा गप्पा मारणे व ते संपल्यावर

‘ तुम्ही ते तुम्ही व आम्ही ते आम्ही ’ असा आपमतलबीपणा मला बिलकूल पसंत नाही. लग्नकार्यांत निरर्थक पैसा फार खर्च होतो, शिक्षणासारख्या उपयुक्त कामाकडे तो लागला पाहिजे, वगैरे गप्पा ते मारतील, पण रजिस्टर करून थोड्या खर्चात विवाह करण्याची मुभा मात्र त्यांना द्यावीशी वाटत नाही. रजिस्टर न झालेली, इकडच्या हिंदूपद्धतीने लग्ने करून गेलेल्या पुरुषाने विलायतेत किंवा फ्रान्समध्ये जाऊन उघडपणे तेथील पद्धतीप्रमाणे विवाह करावा; असे करण्याने कोणताही गुन्हा होत नाही, असा कायदा इंग्लंड वगैरे देशात आहे. अशा रीतीने अनेक तरुण पुरुषांनी विवाह करून तिकडे हिंदूपद्धतीने परिणिलेल्या आपल्या निरपराध बायकांस पती जिवंत असताच वैधव्याच्या गर्तेत लोटिले आहे. पण याची खंत आमच्या सनातन धर्मवाद्यांस वाटत नाही. इकडे विवाह रजिस्टर करण्याची सवड असती तर अशा तरुणांवर तिकडे दुसऱ्या बायका करण्यास कायद्याचा प्रतिबंध झाला असता. पण मग भिन्न जातींतील विवाहबंदी त्यांना उजळ माथ्याने करता आली नसती. म्हणून पटेल बिलाविरूद्ध यांची सगळी हाकाटी ! भिन्न जातींच्या मुलीशी विवाह करून जी संतती होईल, तिला धर्माभिमानी पूर्वजांच्या व भाऊबंदांच्या मिळकतीचा वारसा देणे बरोबर नाही, अशी एक उपपत्ती ‘ प्रगति ’ कारांनी पुढे केली होती, पण ही तक्रार अगदी पोकळ व मतलबी आहे. आजच्या कायद्याप्रमाणे कोणी ख्रिश्चन झाल्यास किंवा मी हिंदू नाही अशी प्रतिज्ञा करून विवाह केल्यास त्याच्या संततीस जर वारसा येतो आणि ती गोष्ट ‘ प्रगति ’ कार व त्यांचे सनातनवादी उघडचा डोळ्यांनी पाहात आहेत, त्याविरूद्ध तक्रार करण्याची हिंमत त्याच्या अंगी नाही, तर त्यांनी भिन्न जातीच्या मुलीशी, हिंदू राहून लग्न करणाऱ्याविरुद्ध मात्र हाकाटी करणे, हे केवढे आश्चर्य ! आपल्यासारख्या पतितांच्या उद्धारार्थ पटेल बिलासारख्या कायद्याची फार जरूरी आहे. म्हणून त्या दिशेने जे प्रयत्न करीत असतील त्यांचे आपण आभारी असले पाहिजे.

दुसऱ्याच्या डोळ्यांतील कुसळ दिसते, पण आपल्या डोळ्यांतील मुसळ दिसत नाही, ही म्हण बऱ्याच वेळा अनुभवास येते. इंग्रज लोक हिंदुस्थानास लुटीत आहेत असे खोटेच भासवून इंग्लिश सरकारच्याविरुद्ध अराजकत्व उत्पन्न करण्याचे प्रयत्न उघड किंवा गुप्तरीतीने आज दहावीस वर्षे करणारे ब्राह्मण लोक आपल्या खोट्या ग्रंथांतील लबाड्या उघडकीस आणणाऱ्या संशोधकांचे जलसे बंद करावेत म्हणून सरकारकडे तारा करतात याची त्यांना लाज कशी वाटत नाही ?

‘ बोले तैसा चाले, त्याची वंदावी पाऊले ’ असे श्री तुकोबाराय म्हणतात, हे म्हणणे मला परमवंद्य आहे; पण फसव्या लोकांचा मला तिटकारा आहे. माझ्या मनाप्रमाणे

समाजसेवेचे पवित्र काम करीत असता, त्यात विघ्ने आणणारे बरेच लोक; आपण सर्वांचे पुढारी आहो, आपणास तुमच्याविषयी फार सहानुभूती आहे; असा बहाणा करून समाजास खाली ओढण्याची कुटिल नीती चालू ठेवित असतात. माझ्या नासिक येथील भाषणावर बरीच प्रतिकूल टीका प्रसिद्ध झाली आहे. ह्या टीकेचे मला मोठे कौतुक वाटते. कोल्हापूर संबंधात स्वत:ला ज्यास काहीच माहिती नाही,आपली सर्व माहिती कर्णोपकर्णी आहे,अशी ज्यांनी सुरुवातीसच कबुली दिली आहे त्यांनी कोल्हापुरात, एखाद्या खटल्यासंबंधाने काय झाले आहे,काय चालले आहे,काय होणार आहे यासंबंधी माहिती काढण्याची तसदी न घेता तोंडास येईल ते वायफळ बोलावे, पुराव्याशिवाय वाटेल ते तर्क लढवावेत, ही गोष्ट किती शरमेची आहे बरे ! या सर्वांचा अंत:स्थ हेतू म्हटला म्हणजे रूढ समाजरीतीस अगर प्रस्थापित विशिष्ट वर्गाच्या हक्कांस कोणी हात लावण्याचा प्रयत्न करीत असल्यास त्यास भेडसावून टाकावे व विशिष्ट वर्गाचे वर्चस्व कायम राखावे एवढाच आहे. समाजास तुडविणारी अशी बेजबाबदार माणसे लोकांचे पुढारी म्हणून मिरवितात; अशा लोकांची मला तर कीवच येते.

या असल्या चालीच्या मंडळींच्या हातून समाजसुधारणा होणे शक्य नाही. कावळ्याला जसे क्षतच दिसावयाचे; तसे यांना जेथे तेथे वाईटच दिसते. उदाहरणार्थ, अस्पृश्य समजल्या जाणाऱ्या लोकांना मी माझ्या संस्थानात वकिलीच्या सनदा दिल्या. त्यावरील टीका पहा. वैद्यकी, वकिली वगैरे धंदे आपलीच चरण्याची कुरणे आहेत व तशी ती राखली पाहिजेत, अशी काही विशिष्ट जातीची समजूत होऊन बसली आहे. उत्तम माणसांनीच सर्व कामे करावीत हे म्हणणे तात्त्विक दृष्टीने कोणासही कबूल करावे लागेल. मला राज्यकारभारात सर्व तत्त्वे परिस्थितीस अनुसरून थोडीबहुत बदलणे भाग पडते. इंग्रज सरकारने आरंभी शिक्षणाबाबतीत कितीतरी कमी दर्जाच्या हिंदी लोकांस कलेक्टर, जज्ज वगैरेसारख्या मोठाल्या जागा देऊन राज्यकारभाराचे काम शिकविले, त्याचप्रमाणे आरंभी वकिलीच्या सनदाही परीक्षेशिवाय, साधारण शिक्षणाच्या माणसास देण्यात येत असत. हल्लीही इंग्रज सरकारच्या राज्यात, परीक्षा पास झालेले लोक पुष्कळ मिळत असताही मुखत्यार वकिलीच्या सनदा परीक्षेशिवाय देण्यात येत आहेत. ज्या सनदा मी महार, मांग, चांभार, इत्यादी लोकांना दिल्या, त्याच जर ब्राह्मण, कायस्थ, सारस्वत अशा लोकांना दिल्या असत्या तर त्याबद्दल काही गवगवा झाला नसता. तशा दिल्या त्यावेळी झालाही नाही. पण आता तितक्या योग्यतेच्या मराठ्यास व अस्पृश्य माणसास दिल्यावर गवगवा केला जातो ही त्यांच्या उदार अंत:करणाची साक्षच आहे ! मॅट्रिक पास झालेले अगर इंग्रजी चांगले शिकलेले महार, मांग यांस वरिष्ठ दर्जाच्या धंद्यात आणताच ब्राह्मणी समाज खवळून गेला. तेच महार–मांग जर ख्रिश्चन झाले

असते तर माझे कृत्य टीकेस प्राप्त झाले नसते. ज्या महार–मांगास मी वकिलीच्या सनदा दिल्या, त्यांच्यापेक्षा विद्येने व अकलेने फार कमी अशा, पुष्कळ वरिष्ठ जातीच्या लोकांस कित्येक देशी संस्थानांतून वकिलीच्या सनदा देण्यात येतात; त्याबद्दल मात्र समाजास काही कमीपणा वाटत नाही. सनदा दिल्यामुळे कोणाही व्यक्तीस वकिलपत्र अमक्यास दिलेच पाहिजे असे भाग पडत नाही. वाटेल तो वकिल वाटेल त्यांनी करावा, अशी मुभा असतेच. अशा वकिलीच्या सनदा देण्यात माझा हेतू एवढाच आहे की, जे धंदे अस्पृश्य वर्गास रूढीने, कायद्याने अगर दडपशाहीने बंद झालेले आहेत, ते त्यास मोकळे करून द्यावेत. त्यांची स्थिती सुधारून, त्यांच्यात आपण इतर माणसांच्या बरोबरीचे आहोत असा आत्मविश्वास उत्पन्न करावा.

मी स्पोर्टसमन आहे. घोड्यासंबंधी माझा अनुभव आहे की, त्यास पाणी दाखविले तर तो पितो. दाखविले नाही तर तो पीत नाही. तसेच वकिली करण्याची संधी या लोकांस मिळाल्यास ते ती लवकरच उचलतील. तशी संधी न मिळाल्यास तसे काम करावे असे त्यास वाटणार नाही. मातंग, टंक, पराशर, वसिष्ठ, चोखामेळा हे जरी हलक्या मानलेल्या जातींमध्ये उत्पन्न झाले तरी ते आपल्या योग्यतेने पुढे आहेत. यावरून पाहता या जातीत योग्यता कमी असते असे मुळीच म्हणता येणार नाही. इंग्लंडमध्येदेखील थोड्याच वर्षांपूर्वी कायद्याच्या शिक्षणावर विशेष जोर न देता ‘ इन्स ऑफ कोर्ट ’ मध्ये ( Inn's of court ) जेवणाच्या संस्थेवर बॅरिस्टर होता येत असे. हिंदुस्थानातील मॅट्रिक्युलेशनची परीक्षा पास न झालेले लोक देखील याप्रकारे बॅरिस्टर होऊन येत. अशा लोकांना कायद्याची किंवा दुसऱ्या शिक्षणाची विशेषशी जरूरी नसे. पण हे ‘ टेबल बॅरिस्टर ’ त्या कोर्टात काम चालविण्याच्या योग्यतेचे समजले जात. अशा लोकांमधून सुद्धा नामांकित कायदेपंडित निपजले आहेत.

आता महार, मांग वगैरे हलक्या मानलेल्या जातींना मी वकिलीच्या सनदा देतो या योगाने उच्चवर्गीय लोकांचा अपमान होतो असे काही बड्या लोकांस वाटते. पण ही त्यांची चूक आहे. विद्या घेऊन, दोन तपे थांबून, नंतर समाज बरोबरीचे हक्क देईल किंवा नाही या विचारात बुचकळ्या खात पडण्यापेक्षा त्यास एकदम दास्यत्वापासून मुक्त करून आजपर्यंत जगातील इतर कोणत्याही ठिकाणी दृष्टोत्पतीस न येणाऱ्या समाजाच्या जुलूमाचा आणि निर्दयपणाचा अंत करावा. या योगानच खरे राष्ट्रकार्य होईल अशी माझी दृढ समजूत आहे. त्या मार्गानेच आपला कार्यभाग उरकला जाणार आहे. काळाकडे बोट दाखवून काही न करणाऱ्या समाजधुरंधरांनी अन्य मार्ग स्वीकारल्यास, त्यांचा त्यासच तो लखलाभ होवो !

जातिभेद नाहीसे झाले पाहिजेत हे हल्ली बऱ्याच लोकांस कबूल झाले आहे. हे खरेच आहे. परंतु प्रश्न एवढाच आहे की, त्या कामाची सुरुवात कोठून व्हावयाची ? ज्या ज्या जातीच्या लोकांना हलके मानले जाते, त्यांनी जातिभेद मोडावा असे म्हणणे साहजिकच आहे. परंतु ह्या दिशेने त्यांनी कितीही प्रयत्न केले तरी, त्यांचा तादृश्य उपयोग होणार नाही. याकामी उच्च म्हणविणाऱ्या जातींकडूनच सुरुवात झाली पाहिजे. प्राचीन काळापासून वंशपरंपरागत उपभोगिलेले वर्चस्व त्यांनी सोडून देण्यास तयार झाले पाहिजे. या पवित्र स्वार्थत्यागाचा कित्ता त्यांनी सर्वांस घालून दिला पाहिजे. जपानातील जातिभेदाचा बिमोड होण्यास मोठे कारण उच्च वर्गाच्या 'सामुराई' लोकांनी सुरुवात केली हेच आहे. तसे झाले नसते तर जपानची स्थिती सुधारली नसती. जातिभेद मोडण्याचे प्रयत्न केवळ खालच्या वर्गाकडून सुरू झाल्यास त्याचे परिणाम अनर्थावह होण्याचा संभव आहे, तेच काम उच्च म्हणविणाऱ्या लोकांकडून प्रथम झाल्यास, हे स्वार्थत्यागाचे उदाहरण इतर सर्व जातींना बोधप्रद होईल. जोपर्यंत असे होत नाही तोपर्यंत, हल्लीच्या स्थितीचा उपयोग करून वैमनस्य न वाढविता प्रत्येक जातीने आपली सुधारणा करून घेण्याचे प्रयत्न सुरू ठवले पाहिजेत. खालील जातीत आपली सुधारणा करून आपला दर्जा वाढवून घेण्याचा व वरच्या पायऱ्यावर चढण्याचा प्रयत्न चालूच ठेविला पाहिजे. वरील जातींनीही जरूर तर काही पायऱ्या खाली येऊन, त्यांना हात देऊन; वर घेतले पाहिजे. असे झाले म्हणजे सुरळीतपणे व सलोख्याने, हे जातिभेद मोडण्याचे बिकट काम सिद्धीस जाण्याचा संभव आहे. आम्हासारख्या मराठ्यांनासुद्धा जात मोडून एकी करण्यास भाग पाडले पाहिजे. धर्मबंधनाच्या अडचणी कित्येक लोक पुढे आणतात.परंतु तशी स्थिती नाही. गेल्या युद्धात सुद्धा मेसापोटेमियामध्ये हिंदू मुसलमान खांद्याशी खांदा लावून लढले. या कामी त्यांना धर्माचा अडथळा झाला नाही. फक्त आपण एकाच राष्ट्राचे भिन्न भिन्न भाग अगर एकाच देशाचे भिन्न भिन्न अवयव आहोत,या भावनेने सर्व लोक प्रेरित झाले होते; त्यामुळेच अखेर इंग्लिश राष्ट्राला यश मिळाले.

हिंदुस्थानचे रक्षण ब्रिटिश सरकारकडून अनेक वेळा झाले तेही याच तत्त्वावर. आपल्यावर अवलंबून असणाऱ्या लोकांना ते कधीही विसंबत नाहीत. आपल्या धर्माच्या लोकांस एका बाजूस ठेवून त्यांच्यापासून आमचे संरक्षण करण्यास ब्रिटिश सरकारच कारण झाले. त्याप्रमाणे रशियन लोक जोरात असताना त्यांच्यापासून अगर अफगाण लोकांपासून हिंदुस्थानवर संकट येण्याचा संभव दिसला, तेव्हा देखील ब्रिटिश सरकारने आपल्या सेनेची आहुती देऊन आमचा बचाव करण्यास मागेपुढे पाहिले नाही. तेव्हा धर्माच्या योगाने दुही माजते, धर्म एकीच्या आड येतो, असे कधीही म्हणता येणार नाही.

शेवटी मी पुन्हा एकवार सांगतो की, माझी मते मी लोकांपुढे निर्भीडपणे ठेवतो; म्हणून लोकप्रियता मिळविण्याकरिता मला काही लोक ओंगळ शिव्या देतात. पण त्या हास्यास्पद होतात. सुजनांच्या निंदेस ते पात्र होतात; याचे मला वाईट वाटते. मी मागासलेल्या लोकांचा उद्धार करण्याचा प्रयत्न करतो. त्यांचा दर्जा समाजात वाढावा असे माझे प्रयत्न आहेत; पण त्याचा विपर्यास करून मजवर ब्रह्मद्वेषाचा आरोप करण्यात येतो तो कितपत खरा आहे, याचा विचार आपणच करावा. हे विचार–निर्णय करण्याचे काम मी आपल्यावरच सोपवितो.

आपण मला आज ' आपला ' असे म्हटले आहे. त्याचप्रमाणे शेवटपर्यंत प्रेम दृढ ठेवा मी देखील कितीही अडचणी आल्या, कितीही त्रास झाला, तरी त्याला न जुमानता उन्नतीच्या महत्कार्यास शक्य तेवढा हातभार लावण्यास कधीही माघार घेणार नाही; असे आश्वासन देऊन मी आपले भाषण संपवितो.

८७

अकरा

# कर्तव्यकर्माचा धडा



राजर्षींनी ' कर्तव्यकर्माचा धडा ' मध्ये, ब्राह्मण–ब्राह्मणेतर वादाचे मूळ कशात आहे ते सांगून, त्यावर पडदा टाकण्यासाठी सार्वत्रिक शिक्षणाचा उपाय सुचविला आहे. धार्मिकदृष्ट्या सहिष्णुतेची भूमिका घेतल्याशिवाय राष्ट्र म्हणून आपणास जगता येणार नाही, असा विचारही त्यांनी पुढे ठेवला आहे.

शाहू महाराजांच्या मते " ब्राह्मणांनी विद्या रक्षण केली याबद्दल ते अभिनंदनास पात्र आहेतच परंतु ही विद्या स्वतःपुरती मर्यादित ठेवण्याची त्यांनी फार मोठी चूक केली. हे सर्व घडले तेव्हा रानडे-गोखले-आगरकर यांच्यासारखे ब्राह्मण असते तर ते घडलेच नसते. सनातनी ब्राह्मणवर्गाने स्वतःस भूदेव समजून इतर वर्गास हीन लेखिले. परिणामी देशाची प्रगती खुंटली. एकी नष्ट झाली. यवनांचे फावले. ब्राह्मणांनी निर्माण केलेल्या वर्णाश्रमधर्मामुळे, जातीयवादामुळे, इंग्रजांचे राज्य या देशात स्थिरावले. मात्र इंग्रज राज्यकर्ते उदारबुद्धी होते. त्यांच्या उदार अशा शैक्षणिक व सामाजिक धोरणामुळे सनातनी ब्राह्मणशाहीच्या जोखडातून सामान्यांची सुटका झाली. " परिस्थितीच्या या वस्तुनिष्ठ मूल्यमापनामध्ये ' काय झाले ' बैठकीवर ' काय केले पाहिजे ' ते, विशद केले आहे. राजर्षी म्हणतात : " आता आपण जैन, लिंगायत, मराठे, ब्राह्मण, मुसलमान ख्रिश्चन, दलित वगैरेनी बंधूप्रेमाने वागून सामाजिक ऐक्य व धार्मिक सहिष्णुता कृतीने



हुबळी : कर्नाटक राज्य : २७ जुलै, १९२०

कर्नाटक ब्राह्मणेतर सामाजिक परिषदेचे अध्यक्ष म्हणून, शाहू महाराजांनी केलेले भाषण

घडवून आणली पाहिजे. त्यासाठी सर्वांनी शिक्षण घेऊन उदारबुद्धी धारण करायला हवी." त्यादृष्टीने ब्राह्मणेतरांचे योग्य हक्क मागण्याचे काम पवित्र असून टीका, ओंगळ आरोप वगैरे सहन करूनही ते नेटाने पुढे रेटण्यात इतिहास घडविण्याचे सामर्थ्य आहे; असा राजर्षींचा स्फूर्तिप्रद आदेश आहे.

ब्राह्मण-ब्राह्मणेतर वादाचे मूळ कशात आहे याचे दिग्दर्शन करताना सामाजिक सामंजस्याची व राष्ट्रीय ऐक्याची कळसूत्रे आमच्या विचार–आचारांमध्येच कशी रूजून राहिली आहेत; आणि हे रूजून असलेले उगवण्यासाठी काय केले पाहिजे, कोणती दक्षता घेतली पाहिजे, याचे छत्रपती शाहू राजांनी इथे केलेले मार्गदर्शन विशेष मोलाचे ठरते.

पुढे अस्तित्वात आलेल्या भारतीय संविधानातील मूलतत्त्वांचे आणि भारतासारख्या प्रचंड देशापुढे उभ्या ठाकणाऱ्या महाकाय प्रश्नोपप्रश्नांचे शाहू महाराजांना क्रांतदर्शन झाले होते असे, त्यांच्या ह्या सर्व विचारांचे आलोडन करताना वाटते; आणि मन स्तंभित होऊन जाते.



अकरा

# कर्तव्यकर्माचा धडा



मी आज या परिषदेचा अध्यक्ष होण्यास लायक व योग्यतेचा नसताना, आपण मला आपलाच समजून हक्काने अध्यक्ष केले ; याबद्दल मला कितीतरी अभिमान वाटत आहे. या इलाख्यात धारवाड, हुबळी वगैरे ठिकाणी मी विद्येकरिता माझे तरुणपण घालविले. या मुलूखात मी आज दुसऱ्यांदा आपल्या परिषदेचा अध्यक्ष; आपण केल्यामुळे आलो आहे.

या प्रसंगामुळे आम्हास सर त्यागराज चेट्टी यांच्यासारख्या महापुरुषाची प्राप्ती झाली आहे. मिस्टर चिकोडीसारख्या उत्साही गृहस्थांची जोड मिळाली आहे. मिस्टर मेणशिनकाई व मिस्टर कंबळी यांनी तर रात्रंदिवस मेहनत करून आपली परिषद यशस्वी केली आहे.

ब्राह्मणांनी विद्या रक्षण केली व विद्येची ज्योत राखिली; याबद्दल आम्ही त्यांचे कितीतरी अभिनंदन करावे. परंतु त्यावेळी नामदार रानडे, गोखले, आगरकर यांच्यासारखे उदारमतवादी असते तर, खरोखरच त्यांनी सर्वांना विद्यादान दिले असते व अप्पलपोटेपणाने दुसऱ्यांना विद्या शिकवू नये असा जो प्रकार चालू झाला, त्याला आळा पडला असता. म्हणून आज ब्राह्मणेतरांनी स्वतंत्र परिषद भरविण्याचा प्रसंगही आला नसता.

मी जात नको असे प्रतिपादन करतो परंतु वर्ग पाहिजेत असे माझे ठाम मत आहे. ब्राह्मणीधर्मात जात असल्यायुळ ब्राह्मण जातीने कुलवान ब्राह्मणेतर स्त्रीशी कसेही असभ्यतेचे वर्तन केले तरी त्यांचा कुलोद्धार होतो. उदाहरणार्थ, कृष्णस्त्रियांवर काही संकट आले असता दालस्म ऋषीनी त्यांना व्रत करण्याबद्दल आदेश दिला. ते व्रत असे आहे: रविवारी हस्त, पुष्य व पुर्नवसू नक्षत्रावर स्त्रीने औषधीयुक्त उदकाने उत्तम प्रकारे स्नान करावे. नंतर विष्णूची ‘ लिंगस्थानाय नमः कंदर्पविधयेनम:’ इत्यादी मंत्रपूर्वक पूजा करावी. नंतर अवयवांनी अव्यंग अशा ब्राह्मणास बोलावून, त्यास यथेच्छ पंचपक्वान्नांचे भोजन देऊन, हा साक्षात् कामदेव असे चित्तात मानून तो रतीसाठी जे जे इच्छील ते ते

तिने करून, सर्वभावाने आपला देह, हास्ययुक्त भाषण करीत, त्यास अर्पण करावा पुढे हे व्रत घेतल्या दिवसांपासून जो ब्राह्मण रतिसुखासाठी रविवारी येईल त्याला सर्वभावेकरून अवश्य मानावे व तो गेल्यानंतर इतरांचा आश्रय करावा. †

महाभारतात गृहस्थाश्रम धर्म असा सांगितला आहे: एक ब्राह्मण ओघवती राणीकडे जाऊन तिला ' मी अतिथी आहे, माझे मनोरथ पूर्ण कर. हा अतिथीधर्म आहे. ' असे सांगून तो तिचा उपभोग घेऊ लागला. इतक्यात तिच्या नवऱ्याने बाहेरून येऊन दारावर थाप मारली. तेव्हा ब्राह्मणाने आतून ओरडून सांगितले की, " हे अग्निपुत्रा सुदर्शना, मी ब्राह्मण तुझ्या येथे अतिथी आलो आहे. ही तुझी पत्नी अतिथीयोग्य अशा सत्काराने मला रतिसुख देऊन संतुष्ट करीत आहे." त्यावर तो राजा हसून म्हणाला, " माझी सर्व संपत्ती, बायको फार काय तर प्रत्यक्ष माझे प्राणही मी अतिथीला देईन अशी माझी प्रतिज्ञा आहे. गृहस्थाश्रमी याचा हा धर्मच आहे. " §

कदाचित याजवर काही लोक असा आक्षेप घेतील की या जुन्या पुराणांतील कथा आहेत. त्या आता कशास उकरून काढता ? परंतु त्याचे परिणाम आज तारखपर्यन्तही कसे जनतेस भोगावे लागत आहेत; हे पुढील उदाहरणावरून दिसून येईल: विक्रम संवत् १८५७ साली आषाढ महिन्यात अलाहाबाद येथे एका गृहस्थाने आपल्या मातेच्या अनुमतीने, पुराणांतील गोष्टीस अनुसरून आपल्या स्त्रीचे दान करून टाकले. तिच्या दंडास धरून उपाध्याय तिला आपल्या घरी नेऊ लागला. त्या गृहस्थाने आपल्या स्त्रीस परत मिळविण्याकरिता पाच हजार रुपये देऊ केले. पण व्यर्थ. शेवटी तंटा विकोपास गेला. ब्रिटिश मॅजिस्ट्रेटने असा निकाल दिला की, देणगी इंग्रजी कायद्याविरूद्ध असून उपाध्याय शिक्षेस पात्र आहे. त्यावेळच्या वृत्तपत्रात याची सविस्तर हकीकत दिसून येते. जर एक जात याप्रमाणे प्रबल नसती तर असे प्रसंग केव्हाच आले नसते ! करिता जाती मोडून वर्गास महत्त्व देऊ या. जे आपणाशी सहकार्य करण्यास अगर सहानुभूती दाखविण्यास तयार नाहीत त्यांना विनवून पाहू या. बोधून पाहू या. सुविचार सांगून पाहू या. त्यांनी ते न मानल्यास त्यांचा द्वेष न करता आपण त्यांच्या वाटेस न जाण्याचे ठरवू या. परमेश्वर



† मत्स्यपुराण : अध्याय ६९ : कलकत्ता प्रत

§ महाभारत : अध्याय दुसरा : अनुशासन पर्व

न्यायी आहे. त्यांच्या अवनतीच्या कृत्यांबद्दल त्यांना पश्चात्ताप झाला असे दिसून आल्यास व पुन्हा ते आपल्या वळणावर जाणार नाहीत अशी आपली खात्री झाल्यावर, त्यांना आपणात बंधूप्रेमाने मिसळून घेऊ या. 'चातुर्वण्य मया सृष्टम् गुणकर्मविभागश:' याचा आधार घेऊन श्रेष्ठपणा स्थापित करण्याचा प्रयत्न होत आहे, हे विस्ताराने दाखविण्याची जरूरी नाही. वसिष्ठ वगैरे ऋषी हलक्या कुळात उत्पन्न झाले असताही गुण व कर्म यांच्या योगानेच त्यांना ब्राह्मणत्व मिळाले आहे. हीच परंपरा आजपर्यंत चालत असती तर, सध्या दिसत असलेली समाजाची अवनती व दुही दिसलीच नसती !

नुकत्याच संपलेल्या मोठ्या युद्धात हल्ली जी आमची मदत राष्ट्राला झाली ती लोकसंख्येच्या मानाने योग्य झाली असे मला मुळीच वाटत नाही. मी रिक्रूटिंग बोर्डाचा मेंबर असल्याने ही गोष्ट मला खात्रीलायक माहीत आहे. ब्राह्मण-ब्राह्मणेतर हा भेद नसता तर, लढाईत यापेक्षा जास्त मदत साम्राज्यास झाली असती. त्या योगाने राष्ट्रकार्यही मोठ्या जोराने झाले असते.

जैन व लिंगायत वगैरे मुळचे हिंदू असून नीतीने, बुद्धीने व शरीरसंपत्तीने मजबूत असल्याने, ब्राह्मणांनी अप्पलपोटेपणाने शिक्षणाचा मार्ग बंद केला. ते नाराज होऊन, त्या धर्मातून निघून, त्यांनी नवीन धर्म स्वीकारला. अशा रितीने ब्राह्मणी जू झुगारून देऊन ते स्वतंत्र झाले तरी ब्राह्मणेतर आपले आप्तेष्ट होत, भाऊबंद होत. हे, आपण स्वतंत्र झालो असतानाही न विसरता, आपल्यात व्यापारधंदा कसा वाढला, विद्यावृद्धी कशी झाली, सांपत्तिक स्थिती कशी सुधारली हे आपल्या गरीब मराठे व इतर ब्राह्मणेतर बंधूस समजावून सांगून, त्यांच्यात व्यापाराची व विद्याज्योतीची जागृती करावी. बंधूप्रेम वाढवावे. सुदैवाने प्राथमिक शिक्षण मोफत व सक्तीचे झाल्यास, एकदोन पिढीतच आपली उन्नती होणार आहे. विटून गेलेल्यांना, कंटाळून गेलेल्यांना, जड जोखडाखाली त्रासून गेलेल्यांना विद्यादान व व्यापारी ज्ञानदान देऊन आमचे जैन, लिंगायत बंधू बंधूप्रीतीची वाढ करीत आहेत हे पाहून कितीतरी आनंद होत आहे. त्यांचे जसे आमच्यावर प्रेम आहे तसेच आमचेही त्यांच्यावर पूर्ण प्रेम आहे; हे आजच्यासारख्या प्रसंगाने वारंवार व्यक्त होत आलेच आहे. अशा प्रकारची सहकार्यता आमच्या कार्यास ज्याप्रमाणे, रानडे, गोखले, आगरकर वगैरे उदारमतवादी ब्राह्मणांकडून मिळत होती, जी ज्योती त्यांच्या निधनानंतर बहुतेक विझून गेल्यासारखी दिसत होती त्या ज्योतीचे पुनर्जीवन होऊन ती सहकार्यता पुन्हा एकवार आम्हास मिळू लागेल; असे आम्ही प्रयत्न करावेत.

'केसरी' कारांनी असे म्हटले आहे की, " सद्बुद्धीने बोलावयाचे तर ईश्वराचे मुख, बाहू उरू व पावले असा भेद न करता सर्व मनुष्यजात एकाच ईश्वरापासून निर्माण झाली

आहे असेही म्हणता येईल. पण बोलणाऱ्याची बुद्धी सरळ नसली म्हणजे सैतानालाही बायबलात आधार सापडू शकतो. " याबद्दल या पत्रकारांचे आम्ही अभिनंदनच करितो. आमचे म्हणणे तरी तेच आहे. परंतु ' बोले तैसा चाले, त्याची वंदावी पाऊले.' आजपर्यंत आम्ही एकाच ईश्वराची लेकरे आहोत, या समभावनेने, ब्राह्मण म्हणविणाऱ्यांनी ब्राह्मणेतरांना केव्हातरी वागविले आहे काय ? वागविणे तर दूरच राहो, परंतु बोलणे सुद्धा आता सुचू लागले आहे हे कशाचे फळ आहे ?

क्षत्रियांचे गुरु ब्राह्मणच होते असेही तेच पत्र म्हणते. वसिष्ठ ऋषींचा जन्म वेश्येपासून झाला आहे, त्यांनी आपल्या गुणकर्माने अधिकार संपादून ब्राह्मणपद मिळविले होते. ब्रह्माधिकारयुक्त ब्राह्मण हे आम्हास केव्हाही पूज्यच वाटतील. मग ते जन्मतः शूद्र असोत अगर अतिशूद्र असोत. महाभारत, भागवत वगैरे महापुराणे व इतर पुराणे ही सर्व ब्राह्मणांनीच लिहिली आहेत. त्यातील लिहिणाऱ्यांच्याविरुद्ध विधाने, ही लिहिणाऱ्यालाच बंधनकारक होतात. इतरांस विरूद्ध असलेली विधाने मात्र इतरांस बंधन होऊ शकणार नाहीत. हे पुराव्याचे कायद्यातील तत्त्व कायदेपंडित म्हणविणा-यास शिकवावयास पाहिजे काय ?

समाजाची नीतिमत्ता वाढणे हे सामाजिक सुधारणेचे एक महत्त्वाचे अंग आहे. वाईट रीतीभाती व धर्मभोळेपणा यांच्या योगाने आमच्यामध्ये मद्यपान, बालविवाह जुलूमाचे वैधव्य, देवास मुली वाहणे असे घातक प्रकार रूढ होऊन, त्यापासून शारीरिक, मानसिक व बौद्धिक अवनती झाली आहे. ही अवनती दूर करण्यास आपण उपाययोजना करावी. याबाबतीत शील बनविणे हेच मुख्य कर्तव्य आहे. शीलवान नागरिकाशिवाय राष्ट्र बनणे अगर उदयास येणे या गोष्टी शक्यच नाहीत. शारीरिक उन्नतीकडेही आपण लक्ष दिले पाहिजे. परंतु केवळ शारीरिक शौर्य, वीर्य कितीही अंगात असले तरी नीतिमत्तेची अवनती झाल्याबरोबर रोमसारखी बलाढच राष्ट्रेही कशी रसातळाला गेली हे आपण विसरता कामा नये.

गेल्या लढाईत ज्या विवक्षित हिंदू जातीची मदत फार झाली आहे, राजनिष्ठेकरिता व राष्ट्रकार्याकरिता जातिभेद व धर्मभेद विसरून ज्यांनी आपले कर्तव्यकर्म उज्ज्वलपणे पार पाडिले आहे; त्यांनी इतरांना हा एक कर्तव्यकर्माचा धडाच घालून दिला आहे. राष्ट्राची उन्नती व सार्वभौम सरकारशी राजनिष्ठा, हाच आपला धर्म समजून वागण्याचे श्रेष्ठ धारिष्टच दाखविण्याची संधी इंग्रज सरकारने गेल्या युद्धात आपणास दिली. याबद्दल त्यांचे खरोखरीच आपण फार आभार मानले पाहिजेत. त्यांच्या योगाने आपल्या धार्मिक, सामाजिक उत्क्रांतीस व उन्नतीस फारच मदत झाली आहे.

इंग्रज सरकारचे राज्य, १८५७ सालानंतर, या देशावर चिरस्थायी झाले. त्या वेळेपूर्वी, आम्ही जवळजवळ रानटी स्थितीतच होतो. रेल्वे नव्हत्या, तार ऑफिसे नव्हती, धर्मसहिष्णुता व नियमितपणा या गोष्टीस आम्ही पारखेच होतो. स्वराज्य मागण्याइतकी लायकी आपणास यावी, अशाप्रकारचे शिक्षण देऊन आमच्यात सामाजिक व धार्मिक सुधारणा घडवून आणली, ही गोष्ट आम्हास केव्हाही विसरता येणे शक्य नाही.

मुसलमान हे नेहमी मराठ्यांप्रमाणे क्षात्रकर्म करितात. त्यांच्या चालीरीतीही बहुतेक मराठ्यांप्रमाणेच आहेत. मराठ्यांच्या फौजेत मोठमोठे मुसलमान सरदार होते, त्याप्रमाणेच मुसलमानांच्या फौजेत मराठे सरदार होते. हल्ली इंग्रज सरकारच्या फौजेत मराठा व मुसलमान खांद्याला खांदा लावून लढले आहेत, तुर्कस्थानसारख्या मुसलमान राष्ट्रावर जय मिळविला आहे. टर्की, पर्शिया, अफगाणिस्थान वगैरे मुसलमान राष्ट्रांना रशियन अस्वलाच्या तावडीतून आजपर्यंन्त वाचविण्याचे श्रेय इंग्लंडास दिले पाहिजे. १८७७ साली रशियाने कॉन्स्टॅंटिनोपल घेऊन तुर्कस्थानची युरोपातून उचलबांगडी करण्याचा घाट घातला होता. तो बहुतेक यशस्वीही झाला होता. इतक्यात, इंग्लंडने धाव घेऊन तुर्कस्थानचा त्यावेळी बचाव केला. त्याचप्रमाणे १८८० सालच्या सुमारास खलिफाचे संरक्षणही इंग्लंडनेच केले. ही गोष्ट विसरता कामा नये. हल्लीच्या लढाईत टर्कीचे रक्षण करावे, असे इंग्लंडास मुळापासूनच वाटत होते. परंतु टर्कीमधील जहाल पक्षाने जर्मनीशी संगनमत केल्यामुळे त्यांच्यावर मोठ्या नाखुषीने तरवार उपसणे इंग्लंडला अपरिहार्य झाले.

तुर्कास ते वैरी असताना व त्यांच्याबरोबर लढण्यात, हिंदुस्थानातील हिंदूमुसलमानांचे रक्त खर्ची पडले असताना त्यांना क्षमा करा असे म्हणणे ही निराळी गोष्ट आहे. परंतु त्यांना मित्र म्हणण हे उचित होईल काय ? औरंगजेब व शिवाजी यांच्यावेळी उभय पक्षात हिंदू व मुसलमान सरदार होते. त्यांनी राष्ट्रोन्नतीस विघातक अशा मागण्या कधी केल्या होत्या काय ? मराठे व मुसलमान यांचा हा परंपरागत धर्म आहे. 'ज्यांचे खावे मीठ, त्याशी रहावे नीट.' अरब, तुर्क हे आमचे बंधू आहेत. त्यांना मूठभर अविचारी चळवळ्यांच्या सांगण्यावरून कडेलोट करुन टाकून देणे, तरी योग्य होईल काय ? तथापि त्यांना दुश्मनाप्रमाणे न वागविता, मित्राप्रमाणे वागविण्यात येत आहे. हे, इंग्रज सरकार त्यांच्या हितानहिताचा विचार किती काळजीपूर्वक करीत आहे; त्यावरुन सिद्ध होत आहे. मुसलमानी धर्माच्या पवित्र स्थानाचे रक्षण करण्याची जबाबदारी इंग्लंडने आपणावर घतली. ते काम आतापर्यंत शक्य तितक्या चांगल्यारीतीने पार पाडले आहे.

अशाप्रकारचे इंग्लंड व हिंदुस्थान सरकारचे प्रयत्न सर्वास माहीत आहेतच. परंतु सर्व गोष्टी आपल्या मताप्रमाणे होत नाहीत म्हणून हिंदुस्थानच्या मुसलमानांस वाईट वाटणे साहजिक आहे. त्याबद्दल आमच्यासारख्या त्यांच्या, खऱ्या हितचिंतकास सहानुभूती फार वाटते. इंग्रज सरकारचे प्रयत्न कसे चालले आहेत हे माहीत असताही, त्यांच्या प्रामाणिकपणाविषयी शंका घेऊन लोकांची मने कलुषित करण्याचे काम, काही मुसलमान व हिंदू पुढाऱ्यांनी चालविले आहे. ही मोठी खेदाची गोष्ट होय. त्याच्या योगाने बहुजन समाजाच्या मनात सरकारविषयी अप्रीती उत्पन्न होते व वाढते. हे मुळीच इष्ट नाही. हे सर्व ध्यानी आणूनच आमचे ' हिज एक्झालेटेड हायनेस ' निजामसाहेब यांनी, या चळवळीपासून प्रजेस अलिप्त राहाण्यास बजाविले आहे. त्यांचे उदाहरण ब्रिटिश इंडियात व इतर ठिकाणी घेतील अशी मला उमेद आहे. निजाम, अरब, खुद्द तुर्क यांच्यापेक्षा आपल्या म्हणण्यास अधिक महत्त्व द्यावे असे असे बाकी राहिलेल्या मूठभर मुसलमानांस, अवनतीस पोचलेले व आपणास पुढारी म्हणवून घेणारे कसे दाखवू शकतील ? मुसलमानांसारख्या बहुसंख्यांकांनी जर ही चळवळ केली तर हिंदुस्थानातील पुढाऱ्यांनी त्यांना मदत करणे योग्य होईल. परंतु मूठभर नाराज लोकांचा पुढाकार घेऊन, बेकायदेशीर बेसनदशीर चळवळीत सामील होऊन अवनतीला कारण होऊ नका. हिंदु मुसलमानांची पूर्वापार चालत आलेली व नुकत्याच झालेल्या महायुद्धात खांद्यास खांदा भिडवून एकदिलाने लढून घट्ट बसलेली सामाजिक घडी पुन्हा विस्कळित होऊ देऊ नका. सरकारबरोबर असहकारिता करणे म्हणजेच आपली उन्नती खुंटविणे आहे; समाजाचा मूळ पायाच खणून काढणे आहे. सरकार सुव्यवस्थित चालेल तेव्हाच आमची शारीरिक, धार्मिक व नैतिक उन्नती करून घेण्यास अवसर मिळेल. यासाठी देशाचे खरे हित ज्यांना करून घेण्याचे आहे ते अशा चळवळींपासून अलिप्त राहातील अशी मला उमेद आहे.

'चेम्सफर्ड मॉन्टेग्यू रिफॉर्म्स' प्रमाणे आज आम्हास स्वराज्य मिळत आहे. तेवढेही स्वराज्य कोणत्याही पूर्वीच्या कॉन्फरन्सपासून मिळाले नव्हते. याचा आम्ही दुरुपयोग न करता सदुपयोग करून आमच्या बादशहास दाखविले पाहिजे. ते चिरायु व्हावेत म्हणून परमेश्वराची प्रार्थना केली पाहिजे. आम्ही योग्य पुढारी नेमून दिले पाहिजेत. रिफॉर्म्स यशस्वी करून दाखविल्या पाहिजेत. जर अयोग्य व अविचारी पुढारी नेमले तर त्याच्या दुष्परिणामास आम्हीच जबाबदार होऊ, सरकार होणार नाही; हे लक्षात ठेविले पाहिजे. आपली सामाजिक व धार्मिक उन्नती करून घेतली पाहिजे. म्हणजे आमच्यामध्ये जे पुष्कळसे, जातिभेदामुळे पक्ष झाले आहेत ते मोडले पाहिजेत. सर्वांना समतेने बागविले पाहिजे. सर्वांना विद्यादान दिले पाहिजे, सर्वांचा धार्मिक हक्क समान समजला पाहिजे;

वगैरे सुधारणा कशा केल्या पाहिजेत याचा विचार परिषदेने करावा. या कामात काही ब्राह्मण म्हणविणारेही मदत करतीलच, अशा आमच्या हितकर्त्यांचे आम्ही उपकार मानू आजची ही संधी न दवडता ब्राह्मणेतरांनीही आपापसांतील भेदभाव मोडून खऱ्या बंधूप्रमाने सामाजिक ऐक्य व धार्मिक सहिष्णुता कृतीने घडवून आणली पाहिजे. अशा प्रकारची ही परिषद नवीनच आहे. यात काळाचा व द्रव्याचा व्यर्थ व्यय झाल्याचा आरोप आपणावर न येईल असे आपल्या कृतीने आपण दाखविले पाहिजे.

स्वराज्यदानामुळे हिंदुस्थानात निरनिराळ्या चळवळी सुरू झाल्या आहेत व होतील. त्यामुळे हिंदुस्थानास सध्या केवळ धार्मिक व सामाजिकच नव्हे तर सर्वप्रकारे नाजूक परिस्थिती प्राप्त झाली आहे. आपल्या इलाख्याचे माजी गव्हर्नर लॉर्ड विलिंग्डन यांना पाच वर्षांची मुदत अपुरी आहे. म्हणून अशा जोखमीच्या प्रसंगी धुरीण असण्याकरिता मुदत वाढवून मागितली आहे. त्यांनीही मोठ्या उत्साहाने, कठीण प्रसंगात काम करून वाढविलेल्या मुदतीतही आपली शरीरसंपत्ती उत्तम राखून काम केले. काही लोकांचे जे असे म्हणणे आहे की, गव्हर्नरास हिंदुस्थानात पाच वर्षांपेक्षा जास्त मुदत ठेवल्यास, त्यांच्या प्रकृतीवर अनिष्ट परिणाम होतो; यास हरताळ लाविला. आमच्या इलाख्याचे हल्लीचे अधिपती सर जॉर्ज लॉईड हे तरूण, हिंदुस्थानास नवीन व येथील अनुभवही नसता, त्यांनी सत्याग्रह व संपासारख्या मोठ्या कठीण प्रसंगात शांत राहून, इतर इलाख्याप्रमाणे फौजेची मदत न घेता शांतता राखिली हे त्यास फारच भूपणावह आहे. आता तर त्यांना येथील परिस्थितीचे पूर्ण ज्ञान झाले आहे. नवीन होणाऱ्या कौन्सिलमूळे सामाजिक, धार्मिक व इतर बाबतीत पुष्कळ फरक होण्याचा संभव आहे. अशा उत्क्रांतीच्या वेळी आमचे गव्हर्नर आम्हास पाच वर्षे लाभल्यास आमचा भाग्योदय झाला असे म्हणण्यास काही प्रत्यवाय नाही. गव्हर्मेन्टमध्ये आतापासून त्या दृष्टीने आपण खटपट केली पाहिजे.

आपले ब्राह्मणेतरांचे योग्य हक्क मागण्याचे काम पवित्र आहे. भूतदयेने प्रेरित असल्याने धार्मिकही आहे. त्यास ईश्वरी आशीर्वाद खात्रीने आहे असे समजून आपण सर्व उत्साहाने कामास लागू या. मी आपणा सर्वांच्या सेवेस तत्पर आहे. आपणास परमात्मा पूर्ण यश लवकर देईलच देईल.

बारा

# मराठ्यांचा परंपरा



छत्रपती शाहू महाराजांनी ' मराठ्यांची परंपरा ' या आवाहनामध्ये, प्रारंभीच मराठा पलटणीने गाजविलेल्या पराक्रमाचे तोंड भरून कौतुक केले आहे. तसेच " आम्हापैकी कित्येकांना प्रत्यक्ष युद्धात भाग घेता आला नाही. " म्हणून आमची निराशा होणे स्वाभाविक आहे, असे म्हणून आपल्या शिपाईगड्यांबरोबर आपण नाही याबद्दलची व्यथाही बोलून दाखविली आहे.

" आपण अशा संकटकाळीही मराठ्यांच्या परंपरेला जागून पराक्रमाची शर्थ केलीत, तसेच आपल्या महाभारतातील परंपरेला अनुसरून अशा प्रसंगी प्राण वाचविण्यासाठी मिळेल त्या अन्नावर, घोड्याच्या मांसावरही गुजराण करायला काहीच हरकत नाही. तुम्ही अधर्म करीत नाही हे खासच. तरी उपलब्ध असलेल्या अन्नावर तुम्ही जिवंत राहावे आणि आपले कर्तव्य बजावून तुमच्या पूर्वजांची कीर्ती निष्कलंक करावी." असे आवाहन करून, शेवटी राजर्षींनी मराठा पलटणींना, शिवरायांच्या आग्र्याहून सुटकेच्या चैतन्यप्रद प्रसंगाची आठवण करून दिली आहे. मराठ्यांच्या उर्जस्वल अस्मितेचे भान जागृत केले आहे.

एका बाजूला 'आपल्या' सारख्या शिपाईगड्यांविषयी काळजाला भिडणारी तळमळ आणि दुसऱ्या बाजूने मराठ्यांच्या परंपरेचा शिगोशिग अभिमान; यातून उपजलेल्या



कोल्हापूर : २३ मार्च, १९१६

' मराठ्यांची परंपरा ' हे जाहीरपणे दिलेले भाषण नसून, पहिल्या महायुद्धाच्या वेळी, इराकमधील टायग्रस-नदीवरील ' कुट. एल्. आभारा ' या शहरी, वेढ्यात अडकून पडलेल्या काही मराठा पलटणींना, शाहू महाराजांनी केलेले हे पत्ररूप आवाहन आहे.

राजाच्या कर्तव्यावर, "या कठीण प्रसंगात तुम्ही सापडला नसून, मी सापडलो आहे; असे मी समजतो. मला या संकटाची पूर्ण जाणीव आहे. म्हणून तुम्ही परत आल्यावर तुमच्या लग्नकार्यात व इतर धार्मिक समारंभात तुम्हाला कोणतीच गैरसोय भोगावी लागणार नाही, असे देवाला स्मरून मी वचन देतो." हे छत्रपती शाहू महाराजांनी केलेले शिक्कामोर्तब प्रातःस्मरणीय आहे; राजाचे 'शिवकल्याण' स्वरूप प्रकट करणारे आहे.



बारा

# मराठ्यांची परंपरा



मराठा पलटणीतील माझे बांधव, अधिकारी लोक व शिपाई गडीहो,

सार्वभौम सरकार आपल्या दोस्तांसह गेली, सुमारे दोन वर्षे महायुद्धामध्ये गुंतले आहे. आपल्या शूर पूर्वजांच्या निष्कलंक यशाला साजेशी, धैर्याची व शौर्याची कामगिरी मराठ एकसारखे बजावीत असल्याचे ऐकून प्रत्येक मराठ्याला मोठा अभिमान वाटत आहे. आपणास माहीत असल्याप्रमाणे मी ब्रिटिश सेनेतील शूर मराठा पलटणीचा कर्नल असल्यामुळे, या पराक्रमाचे महत्त्व मला विशेष वाटते.

या महायुद्धामध्ये आम्हांपैकी कित्येकांना प्रत्यक्ष भाग घेता आला नाही; म्हणून आमची निराशा होणे स्वाभाविक आहे. तथापि आपल्या जीवनाची यत्किंचितही पर्वा न करिता मोठे हाल सोसून, साम्राज्याच्या कार्यासाठी आमचेच बांधव रात्रंदिवस झटत असल्याचे पाहून, प्रत्येकाला मोठे समाधान वाटत आहे. माझे मराठा बांधव निस्सीम निष्ठेने आपले पवित्र कर्तव्य बजावित असताना, ते मोठ्या संकटात सापडले आहेत व जातीच्या निर्बंधानुसार कोणते खाद्य व कोणते अखाद्य ठरवावयाचे, यासंबंधी एक प्रश्न उपस्थित झाला आहे, असे मला समजते. शत्रूच्या वेढ्यात ते सापडले असल्यामुळे, त्यांना दिवसानुदिवस अन्नाचा पुरवठा कमी पडत चालला आहे. सामुग्रीचा पुरवठा करण्यासाठी साम्राज्य सरकार आपल्या प्रयत्नांची शिकस्त करीत आहे. तरीदेखील वेढ्यात सापडलेल्या सैनिकांना सामुग्री पाठविणे दुरापास्त झाले आहे. अशाप्रसंगी प्राण वाचविण्यासाठी मिळालेल्या अन्नावर जगणे जरूर आहे. संकटाच्या प्रसंगी लोकांनी कसे वागावे हे ज्यात सांगितले आहे, अशा ‘ महाभारता ’ मध्ये हेच तत्त्व प्रतिपादन केले आहे. घोड्याच्या मांसाचा उपयोग करण्यास कोणतीच आडकाठी नाही, असे खुद्द आमच्या शास्त्रावरूनदेखील स्पष्ट होते.

प्राचीन काळी घडलेल्या महाअश्वमेधांची हकीकत तुम्हांपैकी प्रत्येकाला ठाऊक आहे. त्याकाळी घोड्याचे मांस खात असत, म्हणून शत्रूच्या कचाटीत सापडले असता त्याचा उपयोग करण्यास यत्किंचितही आडकाठी करणे शक्य नाही. मी माझ्या नातलगांसह व माझ्या जातीच्या इतर लोकांसह या युद्धात भाग घेऊन तुमच्या कष्टांचा व संकटांचा मोठ्या आनंदाने वाटेकरी झालो असतो. मग हा अन्नासंबंधीचा प्रश्न सहजच सुटला असता. परंतु दुर्दैवाने ही संधी प्राप्त होणे माझ्या नशिबी नाही. आता तुम्हाला येऊन मिळणेही अशक्य आहे, म्हणून माझे बांधव हो, माझी अत्यंत कळकळीची व अंतःकरणपूर्वक अशी प्रार्थना आहे की, याप्रसंगी छाती घट्ट करून, संकटसमयी शास्त्राने सांगितलेले कर्तव्य लक्षात आणून, उपलब्ध असलेल्या अन्नावर तुम्ही जिवंत राहावे आणि आपले कर्तव्य बजावून, तुमच्या पूर्वजांची कीर्ती निष्कलंक राखावी.

माझे थोर व पूज्य पूर्वज, मराठा साम्राज्याचे संस्थापक शिवाजी हे आपल्या अनुयायांसह दिल्लीत अटकेत असल्यावेळी, या महायोद्ध्याने या बिकट प्रसंगाला कसे तोंड दिले हे तुम्हाला माहीत आहेच. घोड्याच्या मांसाचा उपयोग करून, जातिनिर्बंध मोडल्याबद्दल तुम्हाला यत्किंचितही दूषण लागणार नाही. मी त्याबद्दल हमी देतो. माझ्या शब्दावर पूर्ण भरंवसा ठेवून आपण राहावे. या कठीण प्रसंगात तुम्ही सापडला नसून मी सापडलो आहे; असे मी समजतो. मला या संकटाची पूर्ण जाणीव आहे. म्हणून तुम्ही परत आल्याबर तुमच्या लग्नकार्यांत व इतर धार्मिक समारंभात तुम्हाला कोणतीच गैरसोय भोगावी लागणार नाही, असे देवाला स्मरून वचन देतो.

या गोष्टीच्या सत्यतेबद्दल या विनंतीपत्रावर माझी सही व शिक्कामोर्तब करीत आहे. माझे शब्द निरर्थक होणार नाहीत व तुम्ही आपले प्राण वाचवाल आणि जातिविषयक नुसत्या अडचणी उपस्थित करून; आपल्या पवित्र कर्तव्याची हेळसांड करून, तुम्ही आपल्या पूर्वजांच्या चांगल्या नावलौकिकाला काळे फासणार नाही, अशी माझी खात्री आहे.

# तेरा

# देशात ऐश्वर्य कसे वाढेल ?



राजर्षी शाहूनी ' देशात ऐश्वर्य कसे वाढेल ? ' मध्ये भारताच्या आर्थिक उन्नतीचा अत्यंत महत्त्वपूर्ण असा विचार मांडला आहे. त्यांच्या मते, " सध्या जितक्या ज्ञातिसंस्था व धार्मिक सभा आहेत त्यांच्याकडे मी अनुकूल दृष्टीने पाहतो आहे. त्यांची भरभराट व्हावी अशी माझी मनापासून इच्छा आहे. " अशा ह्या ज्ञातिसंस्थांमुळे लोक शहाणे होऊन आपापला उद्योग चांगला करतात. त्यामुळे त्यांची उन्नती होते; यावर राजर्षींची श्रद्धा आहे.

आर्यांच्या समाजव्यवस्थेची वेगळीक विशद करुन सांगताना, गुणकर्मावर आधारलेली मूळची समाजव्यवस्था जन्मावर कशी व कोणी ठरवली याचे विवेचन राजर्षींनी केले आहे. त्या दृष्टीने गुणवंत, बलवंत क्षत्रियांचीच समाजाला गरज आहे हे सांगताना ते म्हणतात: " नुसत्या जन्माने क्षत्रिय अगर ब्राह्मण झालेल्या लोकांचा आता कोणी आदर करणार नाहीत. आपण गुणकर्माने क्षत्रिय व्हा. आज क्षत्रियांनी कृषिकर्म हे प्रधान कर्म मानले पाहिजे. वैदिक काळातही वर्षातून एकदा चक्रवर्ती राजा व त्याचे मंत्रीही नांगर हाकीत असत. ज्या कृषिकर्मावर सारी मनुष्यजात उपजीविका करते ते कृषिकर्म हलके अथवा वाईट असे मी मुळीच मानीत नाही. कृषिकर्म करताना क्षात्रधर्माला बाध येतो असे नाही." भारतासारख्या कृषिप्रधान देशात, कृषिकर्म हाच क्षात्रधर्म होऊन बसलेला असताना; राजर्षींचा हा दूरगामी दृष्टीकोण त्यांच्या द्रष्टेपणाची साक्ष देतो. हे द्रष्टेपण



कानपूर : उत्तर प्रदेश : १९ एप्रिल, १९१९

अ. भा. कुरमी क्षत्रियांच्या तेराव्या सामाजिक परिषदेच्या अध्यक्षपदावरुन, शाहू महाराजांनी केलेले भाषण

अचूक तितकेच वास्तव आहे. शास्त्रीयही आहे.

क्षत्रियांनी कृषिकर्म करणे आवश्यक असून भारतीयांचा तोच खराखुरा क्षात्रधर्म आहे. त्याची आबाळ उपयोगाची नाही, त्याशिवाय देशाला तरुणोपाय नाही. असा 'देशात ऐश्वर्य कसे वाढेल ?' मध्ये, कृषिप्रधान औद्योगिक समृद्धीच्या दृष्टीकोणाचा शाहू महाराजांनी वस्तुपाठ सांगितला आहे.



## तेरा

# देशात ऐश्वर्य कसे वाढेल ?



मी तुमच्यापैकीच आहे. मला मजूर समजा अगर शेतकरी समजा. माझे वाडवडिल हाच धंदा करीत होते. जे काम माझे पूर्वज करीत होते तेच काम करणाऱ्या लोकांचा अध्यक्ष होण्याकरिता मला आज बोलाविले आहे, याबद्दल मला अत्यानंद होत आहे.

मी काही ज्ञानी नाही अगर लायकही नाही. माझ्यापेक्षा हुषार लोक पुष्कळ आहेत. माझ्या लायकीकडे लक्ष न देता मी केवळ शेतकरी व महान् पराक्रमी शिवाजी महाराज व त्यांच्या स्नुषा ताराबाई महाराणीसाहेब यांच्या वंशातला आहे; म्हणून अध्यक्षाचा हा मोठा मान मला आपण दिला आहे. ज्यावेळी आपली आज्ञा मला झाली त्यावेळी मुंबईत मी तापाने अतिशय आजारी होतो. परंतु आपल्या सर्वांच्या आशिर्वादाने मी लवकर बरा झालो. तथापि माझ्यापुढे डोंगरासारखी मोठी अशी एक अडचण आली. ती अडचण कोणती म्हणाल तर, हिंदीत भाषण करण्याची. तीन दिवसपर्यंत आगगाडीतच तिचा अभ्यास करून आपल्यापुढे भाषण करण्याचा मी निश्चय केला. माझी ही मातृभाषा नाही; शिवाय ही लिपीही मला अपरिचित असल्यामुळे आमचे परमपूज्य स्वामी परमानंदजी हे माझे भाषण वाचून दाखवितील. जे माझे नातलग आहेत व ज्यांना मी पित्यासमान व गुरुसमान लेखितो असे माझे परमपूज्य खासेराव जाधव हे येथपर्यन्त आलेले पाहून मला दुप्पट आनंद होत आहे. आपली सेवा करण्यास मला शक्ती देण्याबद्दल मी परमेश्वराजवळ प्रार्थना करतो. पुढे आपली आज्ञा होईल तशी सेवा करण्यास मी तयार आहे.

मी आणखी एका मुद्यावर बोलणार आहे. या विषयावर बोलण्याचे हे स्थळ नव्हे. परंतु आपल्या सभोवती काय चालले आहे तिकडे डोळेझाक करून चालणार नाही. आजकाल जो बखेडा चाललेला आहे, तो मला बिलकूल पसंत नाही. इंग्रज सरकारने आम्हाला विद्यादान दिले नसते तर हा झगडा कधीही चालला नसता. सरकारने विद्यारुपी दान आम्हाला द्यावे व त्याच्याऐवजी आम्ही सरकारला विष पाजावे, हे परस्पर विसंगत नव्हे

का ? ज्यांनी आम्हाला विद्यामृत पाजिले, ते आम्हाला पारतंत्र्यातून–त्या बेडीतून-खात्रीने मुक्त करतील. तुम्हाला जे काही पाहिजे आहे ते ज्याप्रमाणे मूल आईबापाजवळून मागून घेते, त्याप्रमाणे, म्हणजे प्रेमाने व जोराने सरकारजवळ मागा. ते सरकार खात्रीने देईल. माझी पूर्ण खात्री आहे की जसे प्रेमाने काम होते तसे ते सक्तीने कधीही होत नसते. माझ्या प्रकृतीला बरे नाही व येथील हवाही उष्ण असल्यामुळे मला बरे वाटत नाही. म्हणून मला कॉन्फरन्सकरिता तिन्ही दिवस हजर राहता येणार नाही. याबद्दल आपण मला क्षमा कराल अशी आपणांस दोन्ही हात जोडून विनंती करतो. तिचा स्वीकार कराल अशी मला आशा आहे. म्हणून म्हणतो :

" हे परमेश्वरा ! आमच्या ब्राह्मणांमध्ये तेज धारण कर. आमच्या क्षत्रियांमध्ये तेज धारण कर. आमच्या वैश्यांमध्ये आणि शूद्रांमध्येही तेज धारण कर. माझ्या अंतःकरणामध्येही तुझ्या ज्योतीचा प्रकाश पाड, अशी माझी तुला प्रार्थना आहे. " ‡

प्रिय बंधूनो, प्रथम मी असे विचारतो, आपल्या सभेचे अध्यक्षस्थान देण्याकरिता मला आपण एक हजार कोसावरून का आमंत्रण केले ? काय आपल्या या प्रांतात माझ्यासारखा क्षत्रिय कोणीही नाही ? आहेत. माझ्यापेक्षाही अधिक आहेत. त्यांच्यापैकी एखाद्यास न निवडता माझ्याकडे आपली दृष्टी का गेली? माझ्या हातून प्रजेची सेवा विशेषप्रकारे घडली म्हणून का मला हे आमंत्रण दिले ? आपणास याचे कारण सांगण्यास संकोच वाटत असेल म्हणून मीच सांगतो. ज्या शिवछत्रपतींनी सिसोदिया क्षत्रिय वंशात जन्म घेऊन आपले सर्व आयुष्य पतिव्रतांचे रक्षण करण्यात, दीन प्रजेचे रक्षण करण्यात व आर्यधर्माचे रक्षण करण्यात खर्चिले; त्या क्षत्रियकुलावंतास श्री शिवाजी महाराज यांचे यशोचिन्ह आपल्या हृदयात प्रतिबिंबित झाले असले पाहिजे. अशा शिवाजी महाराजांच्या पुत्रपौत्रांपैकी मी एक आहे. म्हणून आपण मला हे अध्यक्षस्थान मुद्दाम आमंत्रण करून दिले असावे. यापेक्षा मला दुसरे कोणतेही कारण दिसत नाही. काहीही असो. आपण आपल्या जातीच्या सभेचे अध्यक्षस्थान देऊन जो माझा आदरसत्कार केला आहे. त्याबद्दल आपल्या सभेला तसेच तिच्या कार्यकर्त्यांना मी अंतःकरणापासून धन्यवाद देतो. मला जे काही बोलावयाचे आहे त्याचा आरंभ करतो. जर माझी मातृभाषा हिंदी



‡रुचं नो धेहि ब्राह्मणेषु रुचं राजसु नस्कृधि ।
रुचं विश्येषु शूद्रे मयि धेहि रुचा रुचम् ॥ ४८ ॥

असती तर आपल्याला आनंद झाला असता, तो होणार नाही; तरी माझे भाषण आपण शांतचित्ताने ऐकून घेऊन आपला उदारपणा दाखवाल अशी मला आशा आहे.

भारतवर्षातील प्रत्येक प्रांतात उन्नतीची चिन्हे दृष्टीस पडू लागली आहेत. ही मोठी आनंदाची गोष्ट आहे. हिंदुस्थानच्या प्रत्येक प्रांतात दिवसानुदिवस जातिसभा व धार्मिक सभा अधिकाधिक होऊ लागल्या आहेत. सध्या जितक्या धार्मिक सभा अगर जातिसभा आहेत, त्याकडे मी अनुकूल दृष्टीने पाहात असून त्यांची भरभराट व्हावी अशी माझी मनापासून इच्छा आहे. कारण त्यांच्याद्वारे शिक्षण, समाजसुधारणा, धर्मप्रसार वगैरे कितीतरी परोपकाराच्या गोष्टी झाल्या आहेत, होत आहेत. पुढे सुद्धा या सभांचे ध्येय असेच उच्च राहिल्यास पुष्कळ उन्नती होईल अशी मला आशा वाटत आहे. या जागृतीचे कारण काय ? याचा विचार केल्यास आपल्यास तीन महत्त्वाची कारणे दिसून येतील: पहिले व सर्वात श्रेष्ठ कारण म्हटले म्हणजे, ब्रिटिश गव्हर्मेंटचे शांततेचे राज्य होय. दुसरे, इंग्रजी शिक्षण. तिसरे, धार्मिक आचार्यांचा धर्मप्रसार. भारतवर्षीयांनी लक्षात ठेविले पाहिजे की, या न्यायशील ब्रिटिश गव्हर्मेंटपासून झालेल्या उपकारांचे विस्मरण होऊ न देता आपण सदैव राजनिष्ठ असले पाहिजे. त्याचप्रमाणे धार्मिक आचार्यांचेही उपकार विसरु नयेत. विशेषेकरून ज्याने धार्मिक स्वराज्य देऊन प्रजेला धार्मिक दास्यापासून मुक्त केले आहे, त्या वैदिक धर्मोद्धारक महर्षी दयानंद सरस्वतीना विसरु नका.

इंग्रजी शिक्षणापासून भारतीयांना तिसरा डोळा आला आहे. हा केवढा मोठा फायदा आहे बरे ! प्रथम आम्ही कोण होतो, आमची काय स्थिती होती, आता काय स्थिती आहे, पुढे आमची काय स्थिती होईल वगैरे गोष्टींचे ज्ञान होत आहे; ही मोठ्या आनंदाची गोष्ट आहे. भारतवर्षात ज्या सभा, देश, जाती, धर्म, समाज, सुधारणादी कार्ये करीत आहेत त्या सर्वांबद्दल माझी अंतःकरणपूर्वक सहानुभूती आहे. या सर्वांच्या कार्यात मी मिसळून असतो व त्याच भावनेने मी आपल्या सभेत आलो आहे. आता विशेष काही न बोलता आपल्या मुख्य विषयाकडे वळतो. ज्या देशात आपण राहतो त्या देशाचे नाव आर्यावर्त असे आहे. याला आर्यावर्त म्हणण्याचे कारण असे की, प्रथम आर्य लोकांनी वसाहत केली. या देशाच्या रहिवाशाना आर्य म्हणत असत. आर्यांचे मूलस्थान तिबेट. ( त्रिष्टित तिब्बात ) आर्य प्रथम दोन वर्णाचे होते: एक, आर्यवर्ण. दुसरा, दस्यूवर्ण. हे सर्व एकाच आईबापांपासून जन्मलेले होते.

आर्यांच्या गुणकर्मांचा स्वीकार करून दस्यू लोकांना आर्य होता येत असे. आर्य लोक दस्यूचे गुणधर्म स्वीकारुन दस्यू बनत असत. आर्यांची सामाजिक कार्ये जसजशी वाढू

लागली तसतशी ती करण्याकरिता चार वर्णांची स्थापना झाली. ' निरूक्त ' मध्ये वर्ण शब्दाचा अर्थ असा दिला आहे: ' वर्णो वृणोति ' *

" धर्माचरणाने खालचा वर्ण वरच्या वर्णात जाऊ शकतो. तसेच वरचा बर्ण अधर्माचरणाने खालच्या वर्णाप्रत जातो. वैदिककाळापासून ते महाभारताच्या काळापर्यंत ही मर्यादा राहिली आहे. " ●

" वेदांचा सांगोपांग व समजून उमजून अभ्यास करणे, दुसऱ्यास शिकविणे; दुसरे यज्ञ आदीकरून कर्म स्वतः करणे व दुसऱ्याकडून करविणे; तिसरी गोष्ट, दान घेणे आणि देणे हे ब्राह्यकर्म "ψ

" शांती, मनोनिग्रह, तप, आतून व बाहेरून स्वच्छता, क्षमा, सरळपणा, ज्ञान, विज्ञान ( ईश्वर, जीव, प्रकृती यांचे ज्ञान ) आस्तिक्यभाव ही ब्राह्मणांची कर्मे होत." *

" प्रजेचे रक्षण करणे, प्रजेच्या कल्याणाकरिता दान देणे, होम करणे, वेदांचे पठण करणे, युद्ध करणे, निर्भयपणे राहणे, धैर्यवान होणे, युद्धात चातुर्य, विषयात न रमणे, न फसणे, युद्धातून परत न फिरणे, प्रजेच्या रक्षणासाठी सर्वस्व अर्पण करणे, ईश्वरावर दृढ विश्वास ठेवणे हे क्षत्रियाचे स्वभाविक कर्तव्य होय." ὄ

⁂ ⁂

* **वर्णाचा स्वीकार करता येतो म्हणून अगर वर्णाच्या योग्यतेचे गुण प्राप्त करून घेऊन मनुष्य वर्णाचा स्वीकार करतो, शिवाय वर्णाचे परिवर्तनही होते. म्हणून त्याला 'वर्ण' असे म्हणतात. 'निरूक्त' : आ: २ खंड ३:**

● **धर्म्मचर्य याजचप्पन्यो वर्णा: पूर्वं पूर्वं वर्णमापद्यते जातीपरिवृतौ ।**
**अधर्म्मंचुर्य्यया पूर्वो वर्णो जधन्यं वर्णमापद्यते ।। जातीपरिवृतौ ।। आपस्तम्ब**
**।। २ ।। ८ ।। ७**

ψ **ब्राह्म वर्णाचें कर्म (अध्यापनं अध्ययनं यजनं याजन तथा । दानं प्रतिग्रहश्चैव ब्राह्मणानामकल्पयत् ।**

* **शमो दमस्त पःशौचं क्षांतिरार्जवमेव च ।**
**ज्ञानं विज्ञानामास्तिवयं ब्रह्मकर्म स्वभावजम् ।।**

ὄ **प्रजनां रक्षणं दानमिज्याऽध्ययनमेव च ।**
**विषयेष्व प्रसक्तिश्च क्षात्रकर्म स्वभावजम् ।।**
**शौर्यं तेजो धृतिर्दाक्ष्यं युद्धे चाप्यपलायनम् ।**
**दानमिश्वरभावश्च क्षात्रकर्म स्वभावजम् ।।**

" जनावरे पाळणे व त्यांची वाढ करणे, दान देणे, यज्ञादी कर्म करणे, वेदांचे सांगोपांग अध्ययन करणे, देशावर जाऊन व्यापार करणे, सावकारी करणे, शेतकी करणे हे वैश्यांचे कर्तव्य आहे. "卐

" शिल्पकलेचे ज्ञान मिळविणे व ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य यांच्या कामात मदत करणे हे शूद्राचे कर्तव्य होय. " *

वैदिक काळात अशा तऱ्हेची स्वतंत्रता होती की, जो कोणी एखाद्या वर्णाचे कर्तव्य करी त्याला त्या वर्णात सामील करून घेतले जाई. वेद आदीकरून शास्त्रांचा अभ्यास करण्यास प्रत्येक स्त्रीपुरुषांस अधिकार होता. वैदिक काळात सर्व वर्गांचे लोक ऋषी झालेले आहेत. जोपर्यन्त स्त्रिया मंत्र जाणणाऱ्या होत्या तोपर्यन्त आर्यावर्त स्वर्गांप्रमाणे होता. ' स्त्रियांनी व शूद्रांनी वेद वाचू नयेत ' अशा कल्पित श्रुतीचा आवाज आकाशातूनसुद्धा काढू देत नसत. त्यावेळी शूद्रांनी वेद ऐकले तर त्यांच्या कानात शिसे कढवून ओतले जात असे. ज्यावेळी वर्णव्यवस्था वंशपरंपरा रजिस्टर झाली तेव्हा एका वर्णाच्या मनुष्याला दुसऱ्या वर्णाचे काम करणे कठीण होऊ लागले आणि लोक आपल्या वर्णातील कर्तव्यापासून हळूहळू मुकू लागले. समाजाची घडी बिघडू लागली. शेवटी जी वर्णव्यवस्था गुणकर्मावर अवलंबून होती ती जन्मावर येऊन बसली. याप्रकारचे नियम करून त्याविरूद्ध कोणाची ब्र काढण्याची छाती होऊ नये म्हणून ते स्मृतीमध्ये घुसवून दिले.

वर्णव्यवस्था जन्मावर आहे, म्हणजे आईबाप ब्राह्मण आहेत; त्यालाच ब्राह्मण म्हणावे. दुसऱ्या कोणालाही ब्राह्मण म्हणता कामा नये. तसेच ज्याचे आईबाप क्षत्रिय तोच क्षत्रिय. मग त्याच्या अंगी गुण असोत वा नसोत. ज्याचे आईबाप वैश्य, तोच वैश्य. ज्याचे आईबाप शूद्र तो शूद्र. मग त्याच्या अंगी कितीही प्रतीचे गुण असोत. जे जुने ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य गुणकर्मांवरून श्रेष्ठ होऊन जन्माचा अभिमान जसेजसे



卐 **पशूनां रक्षणं दानमिज्याऽध्ययनमेव च ।**
**वणिक् पथं कुसीदं च वैश्यस्य कृषिमेव च ॥**

* **परिचर्यात्मकं कर्म शद्रास्यापि स्वभावजम् ।**

धरू लागले तसतसे नव्या मनुष्याला ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य होता येईनासे झाले. या पद्धतीच्या योगाने हिंदूंची जी अधोगती झाली ती इतिहास वाचणाऱ्याला पूर्ण अवगत आहे. याच समयी चार वर्णांच्या पाच हजार जाती झाल्या. यामुळे हिंदूंचे सामाजिक बळ ऱ्हास पावू लागले. प्रत्येक जात दुसऱ्या जातीशी खाणेपिणे करीत नसून लग्नसंबंधही करीत नाही. एका जातीवर जुलूम होऊ लागला तर दुसरी जात डोळे उघडून पाहात राहाते. त्याबद्दल तिला थोडीही दया येत नाही. खरोखर मानवी प्राण्यांची एकच जात आहे. जातीचे लक्षण शास्त्रकारांनी असे लिहून ठेविले आहे:

" ज्यांच्यामध्ये समान भाव, समान आकृती व समान उत्पत्ती आहे त्यांची एक जात समजावी.याप्रमाणे व्याकरणशास्त्रामध्येही लिहून ठेविले आहे की, ज्यांची आकृती समान त्यांची जात एक. जसे मनुष्य, गाय, घोडा, हत्ती, पिंपळ, वगैरे."*

आमच्या हिंदू लोकांची समज अशी आहे की, हिंदुस्थानाखेरीज इतरत्र वर्णव्यवस्था नाही. हा आमचा भ्रम आहे. ऐतिहासिक जग याच्या उलट आहे. आमच्याप्रमाणे दुसरेही आर्य वंशज आहेत. आमच्याप्रमाणे इतर देशातही वर्णव्यवस्था आहे. मात्र आमच्यात व त्यांच्यात फरक हा आहे की, दुसऱ्या देशात वर्णव्यवस्था गुणकर्मावर अवलंबून आहे. पण आमच्या येथे ती जन्मावर अवलंबून आहे. त्यांच्या येथे वर्णांचे परिवर्तन याच जन्मात होते. पण आमच्या येथे जन्मजन्मान्तरीसुद्धा त्यांचे परिवर्तन होत नाही. हा सर्व रूढीचा महिमा आहे. वेदादीशास्त्र तरी याच्या उलट आहे. 'मनुस्मृती' मध्ये असे लिहून ठेविले आहे की :

" क्षत्रियांच्या जातीमध्ये उपनयन संस्कारांचा लोप झाल्यामुळे व ब्राह्मणांमध्ये नुसत्या दर्शनाने मनुष्य वृषल होतो म्हणजे संस्कारहीन होतो. त्यांना काय नाव द्यावे ? "Φ

पौण्ड्र, चौण्ड्र, द्रविड, कंबोज यवन, शक, पारद, पल्हव, चीन', किरात, दाद वगैरे ब्राह्मणादी वर्ण, क्रियेचा लोप झाल्यामुळे संस्कारहीन झालेले; दुसऱ्या देशात, दुसऱ्या जातीच्या नावाने वाखाणू लागले. पैकी काही म्लेंच्छ व काही आर्य भाषा बोलणारे

⁂

* समान प्रसवात्मिका जाती ।। न्यायशास्त्रम्

Φ शनकैस्तु क्रियालोपादिमा : क्षत्रियजातय : ।।
वृषलत्वं गता : लोके ब्राह्मणादर्शनेनच ।। मनु : अध्याय: १० : २ लो. ४३ ।।

होते. त्या सर्वांना दस्यू म्हणू लागले. केवळ अन्य जातींमध्ये वेदोक्ताचा संस्कार लोप पावला म्हणूनच नव्हे तर ब्राह्मणांच्या अज्ञानामुळे व अत्याचारी वर्तनामुळेही ही म्लेंच्छ जात उत्पन्न झाली. *

विष्णु पुराणाच्या चवथ्या अध्यायात असे लिहून ठेविले आहे की, त्रिशंकूच्या वंशात बाहू नावाचा राजा होऊन गेला. तो हैह्य, ताल, जंघादी क्षत्रियांना हार जाऊन आपल्या राणीसह अरण्यात गेला. पुढे काही दिवसांनी तो मरण पावला. तेव्हा त्याची राणी त्याच्याबरोबर सती जाऊ लागली. ती गर्भवती असल्याने ऋषीने तिला सती जाण्यास प्रतिबंध केला व म्हटले की, " हे राणी, तुझ्या पोटी एक पराक्रमी पुत्र होईल. तो सर्व क्षत्रियांचा नाश करील. " राणी सती न जाता ऋषींच्या आश्रमात राहू लागली. त्या ऋषींचे नाव वसिष्ठ. पुढे तिला पुत्र झाला. त्याचे नाव सगर ठेवून ऋषीने त्यास क्षात्रविद्या शिकविली. सगर मोठा झाल्यावर सर्व हकीकत त्याला आईकडून समजली. तेव्हा क्षत्रियाबरोबर तो युध्द करण्यास गेला व क्षत्रियांस जर्जर करून सोडले. त्यामुळे सर्व क्षत्रिय वसिष्ठास शरण गेले. तेव्हा ऋषी सगरास म्हणाला, " हे पुत्रा, आता ह्या क्षत्रियांना मारू नकोस. मी या क्षत्रियांना द्विजत्वापासून व धर्मापासून वेगळे केले आहे. त्यांना जिवंतपणीच मारून टाकीले आहे. हे आता जिवंत मुडदे आहेत. " आणि सगराने, या क्षत्रियांच्या वंशाचे परिवर्तन करून टाकीले. कित्येकांची शेंडी काढून टाकून त्यांना ' यवन ' हे नाव दिले. त्याचबरोबर वेद आदीक न शास्त्रांचा अभ्यास करण्याचा अधिकारही काढून घेतला. क्षत्रिय धर्मापासून त्यांना काढून टाकीले. अशाप्रकारे परशुरामाच्या अत्याचारानेही पुष्कळ क्षत्रिय क्षत्रियवर्णापासून पृथक् होऊन दुसऱ्या जाती बनल्या."

आमच्या या देशात हजारो जाती झाल्या. अशाचप्रकारे कोणत्या तरी समयी आपली ही जात क्षत्रियापासून पृथक् झाली असावी. याप्रमाणे जगामध्ये ' ऐतिहासिक काळी कित्येक वेळा परिवर्तन झाले व होत आहे. पुढेही होईल. हा नैसर्गिक नियमच आहे. महाभारताच्या काळापर्यंत, येथील क्षत्रियांचा विवाह दुसऱ्या देशातील

**

* पौण्ड्रका श्चौन्ड्रद्रविडा : काम्बोजा : यवना : शका : ।
पारदापल्हबाश्चीना : किराता दरदा : खशा : ॥
मुखबाहूरूपज्याना या लोके जातयो बहि : ।
म्लेंच्छवाचश्चार्यवाच सर्वे ते दस्यव : स्मृत : ॥ :

क्षत्रियांबरोबर होत असे. ‘ महाभारत ’ ग्रंथावरून हे दिसून येण्यासारखे आहे. अर्जुनाचा विवाह उलुपीबरोबर, धृतराष्ट्राचा गांधारीबरोबर वगैरे झाले आहेत. महाभारताच्या पूर्वीही काही राजांचा विवाहसंबंध दुसऱ्या देशातील राजांबरोबर झाला आहे; असे इतिहासच सांगतो.

आता पुढे विशेष काही न सांगता आपल्या विषयाच्या संबंधाने दोन शब्द सांगावयाचे आहेत. जर तुम्ही अंतःकरणपूर्वक क्षात्रधर्म स्वीकारणार असला तर आपले मी अंतःकरणपूर्वक स्वागत करतो. तुम्ही क्षत्रिय झाला आहात. क्षत्रिय वर्णाचे गुणधर्म स्वीकार करा. आपल्या देशातील दुःखी प्रजेचे रक्षण करण्यास कंबर बांधा. आपल्यास क्षत्रिय होण्यास वेदादीशास्त्राकडून अधिकार आहे. परमेश्वराने आपल्याला साधनही करून दिले आहे. मला वाटते, प्रत्येक मनुष्य चारी वर्णाची योग्यता प्राप्त करून घेईल तेव्हा देशाची सुधारणा होईल. परंतु आपल्याला एक गोष्ट लक्षात ठेविली पाहिजे ती ही की, हा विद्येचा समय आहे.

सर्वांच्या अंतःकरणामध्ये ज्ञानाचा प्रकाश पडला आहे. नुसत्या जन्माने क्षत्रिय अगर ब्राह्मण झालेल्या लोकांचा आता कोणीही आदर करणार नाही. आपण गुणकर्माने क्षत्रिय व्हा. नावाच्या क्षत्रियांच्या यादीत तुमच्या नावाची भर घालू नका. तसेच आम्ही क्षत्रिय होतो, अमूक वंशात आम्ही जन्मलो वगैरे वितंडवादात पडू नका. आपला कोणाशीही संबंध असो वा नसो, उन्नती करून घेण्यास हा मार्ग उत्तम नव्हे. सेन्सस रिपोर्टाचे अधिकारी व दुसरे कोणीही आपल्यास काहीही म्हणोत, त्याबद्दल मुळीच फिकीर करू नका. आपल्या जातीत वेदोक्त संस्कार, वेदोक्त कर्माचा प्रसार व सदाचाराची वाढ करा. आपल्या मुलांना शिक्षण द्या, असहाय्य व गरीब बांधवांना मदत करा.

कुरमी क्षत्रियांमध्ये विधवा विवाह प्रचलित असलेला पाहून मला मोठा आनंद होतो.

आपली क्षत्रिय जात भ्रूणहत्या, व्यभिचारादी पापांपासून सुरक्षित राहील असा माझा विश्वास आहे. हा अपधर्म आहे. मनुष्य समाज निर्दोष राखण्याकरिता हे आहे. वेदादी शास्त्रांचे याला पाठबळ आहे. आमच्या गव्हर्मेंटनेही विधवा विवाहाचा कायदा पास केला आहे. ज्या जातीमध्ये या अपधर्माचा प्रचार नाही त्या जातीत भ्रूणहत्या, व्यभिचार आदी करून पाप घडत आहे. हजारो मुले प्रत्येक वर्षी मरत आहेत; ही किती दुःखाची गोष्ट आहे बरे !

भारतवासीय लोक उन्नतीची तीन मुख्य साधने समजतात. ती ही : पहिले, पडदा. दुसरे, विवाह निषेध आणि तिसरे, कोणाशीही मिसळून भोजन न करणे.

काय आश्चर्य आहे ! कोल्हापूर राज्य संस्थापक महाराणी ताराबाई, महाराणी सती अहिल्याबाई, झाशीची राणी लक्ष्मीबाई, महाराणी कमलाबाई आदी करुन क्षत्रिय स्त्रियांनी राज्याचा गाडा हाकलेला आहे. रणांगणावर जाऊन शत्रूबरोबर लढायाही मारलेल्या आहेत. हे सर्व काम पडद्यात राहून केवळ अशक्य होते. सध्याही पडद्याची चाल सर्व देशात नाही. महाराष्ट्र, मद्रास, गुजराथ वगैरे प्रांतांत पडदा बिलकूल नाही. दुसऱ्या प्रांतांमध्येही काही थोड्या जातींमध्येच पडदा आहे. पडद्यामुळे स्त्रियांमधील शूरतादी गुणांचा सर्वथा नाश होतो. आपला विवाह कृषिकर्मावर विशेषेकरून होतो. हे ऐकून मला मोठा आनंद होतो. कृषिकर्म इतके पवित्र आहे की वैदिक काळात, वर्षातून एकदा चक्रवर्ती राजा व त्याचे मंत्री हे कृषिकर्माची उन्नती करण्याकरिता नांगर हाकीत असत. ज्याच्या योगाने भूमीमध्ये एक दाणा टाकून हजारो दाणे मिळतात व ज्या कृषिकर्मावर सारी मनुष्यजात उपजीविका करते; ते कृषिकर्म हलके अथवा वाईट असे मी मुळेच मानीत नाही. मी माझ्या युवराजाला कृषिविद्या शिकण्याकरिता विलायतेला व अलाहाबादला कृषी स्कूलमध्ये पाठविले होते. आपल्याला माहीत आहेच की कृषिकर्मापासून दुहेरी उन्नती होते. स्वतःला सुख होऊन सर्व मनुष्य जातीलाही सुख मिळते. कृषिकर्माशी पशुपालन व रक्षण यांचाही संबंध येतो. याकरिता पशुपालनासंबंधीही पुष्कळ काम करावयाचे आहे. दूध तूप वगैरेची समृद्धी देशांदेशामध्ये झाली पाहिजे. कृषिकर्म करताना क्षात्रतेजाला बाध येतो असे नाही. ज्यावर मनुष्यसमाजाची सुव्यवस्था व उन्नती अवलंबून आहे, ते कर्म करणारे नीच आहेत हे म्हणणे मुळीच पटत नाही.

युरोपात शेतकरी लोक प्रतिष्ठित समजले जातात. तेथील शेतकरी, राज्यातील उच्च दर्जाच्या नोकरीवर आहेत. तसेच तिकडे शिल्पकलेमधील लोकांची प्रतिष्ठा मोठी आहे. जो आज चांभार अथवा भंगी आहे त्यास नीच असे म्हणण्याचे साहस कोणाच्याही अंगी नाही. याचे कारण असे आहे की, शिल्पकला सर्वस्वी त्यांच्याच हातात असते. येथील लोक निर्धन व अज्ञानी असल्यामुळे इथल्या शिल्पकलेची सुधारणा कशी होईल ? सुशिक्षित बी. ए. ; एम. ए. झालेले लोक हे काम अशा भीतिपोटी घेत नाहीत की, आम्हाला शूद्र म्हणतील, आम्हाला नीच समजतील. अशाने देशात ऐश्वर्य कसे वाढेल ? ऐश्वर्याशिवाय देशाची उन्नती कशी होईल?

हे परमेश्वरा ! आमच्या देशातील लोकांना सुबुद्धी देऊन त्यांच्या अंतःकरणात ज्ञानाचा प्रकाश पाड. आम्ही सर्व माणसे आपले सद्गुणी चिरायु पुत्र होऊन बंधूप्रेमाने राहू. दुसऱ्याचे दुःख ते आपले दुःख व दुसऱ्याचे सुख तेच आपले सुख असा आमचा समज

होऊ दे. सर्वजन मिळून शारीरिक, आत्मिक व सामाजिक उन्नती करून, संसाराला स्वर्गधाम बनवू या. शेवटी, कुरमी क्षत्रियांना धन्यवाद देऊन आपली मंगल कामना पूर्ण करावी व आपल्या जातीच्या सभेची दिवसेदिवस भरभराट होवो, अशी मी परमेश्वराजवळ प्रार्थना करतो.

चौदा

# योग्य काम, योग्य दाम



स्वदेशाचा विकास कशावर अवलंबून आहे याचे मर्म राजर्षी शाहू महाराजांना चांगले उमजले होते. त्यांच्या मते, "देशाची उन्नती उद्योगधंद्यांच्या वाढीवर अवलंबून आहे; हे तत्त्व सर्वमान्य आहे. अशाप्रकारे उद्योगधंद्यास उत्तेजन मिळावे याविषयी मला मोठी आवड असून त्या दिशेने माझे प्रयत्न आपणास माहीतच आहेत." भारतासारख्या कृषिप्रधान देशात कोणते उद्योगधंदे उभारता येतील याचा अंदाज घेताना राजर्षी म्हणतात : "हिंदुस्थान हा मुख्यत्वे करून शेतीचा देश आहे. पाश्चात्य राष्ट्रात भांडवलवाले आणि मजूर यांच्यात मोठी स्पर्धा चालू आहे. शेतीच्या प्रगतिअभावी लोक शहरांकडे धाव घेत आहेत. परिणामी खेडी ओस पडत आहेतच परंतु त्यामुळे शहरे व यांचे आरोग्यही बिघडून गेले आहे... या करिता देशाचे कल्याण ज्यांना करावयाचे आहे, त्यांनी प्रथमतः आपल्या शेतीच्या सुधारणेकडे आवश्यक लक्ष दिले पाहिजे... नांगर व विहिरींचे पाणी काढण्याची मोट यांची सुधारणा ही आजच्या प्रत्येक शेतकऱ्याचे हित करणारी आहे. सुधारलेले तंत्र-विज्ञान शिकण्याच्या दृष्टीने कारागीर व शेतकऱ्यांनी पुढे आले पाहिजे. देशाच्या उद्योगधंद्यांच्या वाढीवर आपली प्रगती अवलंबून आहे. शेतीवर चालणारे कारागिरीचे उद्योगधंदे हेच या दृष्टीने उपयुक्त साधन आहे." 'सहकारी कारखाने, सहकारी संस्था व सहकारी दुकाने काढा, त्यास हवी ती मदत देईन, असे आश्वासन देऊन राजर्षींनी सहकारी तत्त्वावरील औद्योगिकरणाच्या तत्त्वाचा उच्चार आणि कृतीने प्रचार केला आहे. त्या दिशेने देशात सर्वप्रथम यशस्वी प्रयोगही केला आहे.



कोल्हापूर : १५ ऑगस्ट, १९२०

पाचव्या आर्यक्षत्रिय परिषदेच्या अध्यक्षपदावरून, शाहू महाराजांचे झालेले भाषण

शाहू महाराज 'लोकांचे राजे' असल्याने 'जनतेचा सहभाग' प्रमुख मानत आले आहेत. साहजिकच आर्यक्षत्रिय परिषदेला जोडूनच 'राजाराम इंडस्ट्रियल स्कूल बोर्डिंग'च्या, शोरुमच्या भरविण्यात आलेल्या प्रदर्शनाच्या संदर्भात, 'योग्य काम, योग्य दाम' मध्ये राजर्षी सांगतात : "आपणास काय करिता येईल हे त्यावरून स्पष्टपणे दाखविण्यात आले आहे, आपणास खरे खरे स्वदेशीचे व्रत पाळावयाचे असेल तर कोणकोणते जिन्नस येथे करविता येतील याचाही बोध आपल्या प्रदर्शनापासून आमच्या स्वदेशभक्तांस मिळणार आहे."

हरेक बाबतीत 'हे तुझे आहे, तुझ्यासाठी आहे. तू त्यात सामील झाल्याखेरीज ते पुढे रेटणार नाही.' अशी सामान्य माणसाच्या मनामध्ये भावना निर्माण करून, त्याच्यामधील सुप्त गुणांना अवकाश मिळवून देण्याकडे शाहू महाराजांचे असलेले लक्ष 'लोकांचा राजा' हे बिरुद सार्थ करणारे आहे.

ಅ

चौदा

# योग्य काम, योग्य दाम



आजच्या प्रसंगी अध्यक्षस्थान स्वीकारून, आपल्या कार्यास उत्तेजन देण्यास मला फार आनंद वाटत आहे.

आत्ताच जी हकीकत आपल्या उद्देशासंबंधाने व कार्यासंबंधाने वाचण्यात आली ती अनेक प्रकारे मनोरंजक आणि बोधप्रद आहे. आपल्या जातीच्या लोकांचे हस्तकौशल्य सर्वश्रुत आहेच. ज्या ज्या प्रसंगी अशा कौशल्याची जरूरी लागते त्या त्या वेळी मला आपल्यातील कारागिरांची आठवण झाल्याशिवाय राहात नाही. माझ्या नित्याच्या व्यवहारातील बऱ्याच जिनसा आपल्या कारागिरांच्या हातच्या आहेत हे मी मोठ्या आनंदाने सांगतो. माझ्या रयतेत असे कुशल पुरूष आहेत याचा मोठा अभिमान वाटतो. आपल्या हस्तकौशल्याचे प्रदर्शनदेखील यादृष्टीने बोधप्रद आहे. आपणास काय करता येईल हे यावरून स्पष्टपणे दाखविले आहे. आपणास खरे खरे स्वदेशीचे व्रत पाळावयाचे असेल तर कोणकोणते जिन्नस येथे करविता येतील याचाही बोध आपल्या प्रदर्शनापासून, आमच्या स्वदेशभक्तांस मिळणार आहे. देशातील कलाकौशल्यास उत्तेजन मिळण्याकरिता असल्या प्रदर्शनाची किती आवश्यकता आहे हे पाश्चात्य राष्ट्रांनी आपणास दाखविले आहेच. कोणत्याही मोठ्या उत्सवाच्या किंवा समारंभाच्या प्रसंगी ते एक स्व-राष्ट्रीय प्रदर्शन भरवीत असतात. आपले हे प्रदर्शन, आपल्या लोकांस भूषणावह असून होतकरु कारागीरांस मार्गदर्शक होऊन राहील. त्याचप्रमाणे आपला माल घेणाऱ्या गिऱ्हाईकासही त्यापासून कोणता जिन्नस कोठे मिळेल हे कळून उपयोग होईल.

देशाची उन्नती उद्योगधंद्यांच्या वाढीवर अवलंबून आहे. हे तत्त्व सर्वमान्य आहे. अशा-प्रकारे उद्योगधंद्यास उत्तेजन मिळावे याविषयी मला मोठी आवड असून त्या दिशेचे माझे प्रयत्न आपणास माहीत आहेतच.

हिंदुस्थान हा मुख्यत्वेकरून शेतकीचा देश आहे. यातील प्रजेचा मुख्य धंदा शेती हा आहे. शेकडा ८० टक्के लोक येथे शेतीवर उदरनिर्वाह करीत आहेत. येथील कारागिरांचे अंगी कलाकौशल्य श्रेष्ठ दर्जाचे आहे. त्याविषयी वाद नाही. परंतु हे कलाकौशल्य सांप्रतच्या यांत्रिक चढाओढीत टिकाव धरण्यासारखे नाही. सध्या पाश्चिमात्य राष्ट्रात भांडवलवाले व मजूर यांच्यामध्ये मोठी स्पर्धा लागली आहे. आजपर्यंत भांडवलवाल्यांचे दिवस होते. आता मजुरांनी आपला काळ आणला आहे. आपल्या मंडळया स्थापन करून सर्वांचे एकदिल केल्याने, आता त्यांना आपल्या मागण्या एकमुखाने मागता येतात व संघशक्तीच्य जोरावर त्या भांडवलवाल्यांकडून मान्य करविता येतात. पण आजही मजुरांची स्थिती तेथे फारशी स्पृहणीय नाही. अशाप्रकारच्या मजुरांचा पेशा हिंदुस्थानात यावा हे मला पसंत नाही.भांडवलवाल्यांच्या मर्जीवर व स्वार्थबुद्धीवर,न्यायबुद्धीवर नव्हे; हजारो माणसांचे जीवित अवलंबून राहावे ही स्थिती बरोबर नाही. याकरिता अशाप्रकारचे, पश्चिमेच्या धर्तीवर सर्वस्वी चालणारे कारखाने आमच्या देशात फारसे फायदेशीर होणार नाहीत. शेतकीत पुरेशी प्राप्ती नाही; पोट भरत नाही म्हणून मोठ्या शहरात मजुरी करण्यास जावे लागणारे लोक दिवसेदिवस वाढत चालले आहेत. या योगाने खेड्यातील वस्ती कमी पडून शहरात वस्ती फार दाट होत आहे. तेथील आरोग्य अगदी बिघडून गेले आहे. त्यामुळे खेड्यांतही रोगाचा प्रसार जास्त होत आहे. याकरिता देशाचे कल्याण ज्यांना करावयाचे आहे त्यांनी प्रथमतः आपल्या शेतीच्या सुधारणेकडे आवश्यक लक्ष दिले पाहिजे इतर देशांच्या मानाने आमच्या शेतकीचे उत्पन्न सरासरीने पुष्कळच कमी आहे. ते वाढविण्यास पुष्कळ जागा आहे. शेतीच्या उद्योगात जितक्या अधिक लोकांना नेहमी काम मिळेल तितके चांगले. यापेक्षा जास्त असलेली लोकसंख्या मजुरदारांच्या धंद्यात जावी. शेतकी सुधारणेस सुधारलेल्या औतांची फार जरूरी आहे. आपले लक्ष तिकडे आहे ही मोठी आनंदाची गोष्ट आहे. आपल्यासारख्या कुशल लोकांनी, या बाजूस विशेष लक्ष दिल्यास ही उणीव भरून येणारी आहे. नांगर व विहिरीचे पाणी काढण्याची मोट यांची सुधारणा ही आमच्या प्रत्येक शेतकऱ्याचे हित करणारी आहे. त्यादृष्टीने आपल्या प्रयत्नांचे अभिनंदन करतो. आपले प्रयत्न यशस्वी होण्याच्या कामी मजकडून योग्य ती मदत अवश्य मिळेल याविषयी शंका नको.

आपल्या जातीत विद्येचा प्रसार करण्याचा प्रयत्न करणे हे प्रत्येकाचे काम आहे, विद्यार्थी वसतिगृहे स्थापणे हे कोल्हापूरचे एक वैशिष्टच आहे. येथे विद्यार्थी वसतीगृहांची जितकी संख्या आहे तितकी दुसऱ्या ठिकाणी क्वचित्च असेल ! आपला हा प्रयत्न फार चांगला आहे व तो सर्वांच्या वैभवास पात्र आहे.

कलाकौशल्याच्या शाळेसंबंधी फारसे सांगावयास नको. आपले कौशल्य आपल्या मुलांशिवाय दुसऱ्यास शिकवावयाचे नाही अशी घातुक प्रवृत्ती होती. तिच्यामुळ आपल्या कलांचा फार ऱ्हास झाला आहे. विद्येचे खरे रक्षण, ती गुप्त ठेवून रक्षण करावयाची ही चुकी ब्राह्मणबंधूंनी प्रथम केली. त्यांचे अनुकरण इतर लोकांनी केले. या चुकीमुळे ब्राह्मणांची विद्या निस्तेज झाली. ब्राह्मणेतर अज्ञान-अंधःकारात बुडाले. कारागिरांच्या विद्येचीही स्थिती तशीच झाली. त्यांची कला ऱ्हास पावली. आता आपण आपल्या जातीबाहेरील मुलांसही, आपल्या शिल्पशाळेत घेऊन आपल्या मुलांच्याबरोबर त्यास शिक्षण देण्यास तयार आहात ही मोठी संतोषाची गोष्ट शाहे. पूर्वीची चूक आपल्या लक्षात आलेली असून ती पुनः होऊ नये याविषयी आपण खबरदारी घेत आहात ही योग्य गोष्ट आहे.

जातिभेद हा, हिंदुस्थानास फार मोठा रोग आहे असे मी याप्रसंगी स्पष्ट बोलून दाखविले आहे. जातिभेद मोडण्याचे माझे प्रयत्न सतत चालू आहेत. असे असतानाही मी आपल्यासारख्या जातीविशिष्ट प्रयत्नास मदत देतो. हे माझे वर्तन माझ्या बोलण्याशी विसंगत आहे असे कोणीही म्हणेल; तेव्हा यासंबंधाने चार शब्द सांगणे गैर नाही. काही पर्यायापर्यंन्त जातिभेद व जात्याभिमान सुटत नाही. मनुष्य आपल्या मुलांबाळांची विशेष काळजी घेतो. हे त्यांचे करणे गैर असे कोणी म्हणणार नाही. परंतु ज्याला आपल्या सबंध आयुष्यात आपल्या मुलाबाळांच्या हितापलिकडे काही दिसत नाही त्याला कोणीही दोष देईल. ज्या समाजात आपण वाढलो, त्या समाजाची उन्नती करण्याची जबाबदारी आपणावरही आहे, याची विस्मृती होऊ देता कामा नये. थोडक्यात सांगावयाचे म्हणजे, जात्याभिमान हा राष्ट्रकार्यास पोषक असावा. राष्ट्राचे हित नजरेआड करणारा नसावा.

आपल्या जातीचा जो थोडा इतिहास आपण सांगितला, त्यावरून प्रत्येकजण आपल्या हस्तकौशल्याने व राजा किंवा सरदार अशा व्यक्तींच्या आश्रयाने उदयास आला आहे असे दिसते. त्यामुळे त्यांचे कूळ उदयास आले असेल. या काळात बहुजनसमाजाच्या हाती सत्ता जात असल्याने ही आपली पुराणी पद्धत आता आपल्या उपयोगी पडणार नाही. सध्या राजाश्रयापेक्षा लोकाश्रयच विशेष श्रेयस्कर आहे. तसेच आता प्रत्येकाने निरनिराळे काम करण्याचे दिवस गेले. पुष्कळ लोकांनी आपली कुशलता, अक्कल, पैसा व अंगमेहनत एकत्र केली पाहिजे, म्हणजेच सहकार्य केले पाहिजे. पूर्वी फार तर एक कुटुंब एका ठिकाणी काम करी. येणारा नफा, त्या कुटुंबातील माणसास उपयोगी पडे. आता आपली ही कुटुंबाची व्याख्या पुष्कळ विस्तृत केली पाहिजे. १०।२०।५० कुटुंबे या उद्योग धंद्याकरिता एक झाली पाहिजेत. त्यांना त्यांच्या योग्यतेप्रमाणे वेतन मिळाले पाहिजे.

होणारा नफाही वाटून मिळाला पाहिजे. यासाठी आपण सहकार्य करण्यास शिका. आपली सहकार पतपेढी काढा.

आपल्या शाळेची भरभराट व्हावी, त्याचप्रमाणे आपल्या उद्योगाची व कारखान्याचीही भराभराट व्हावी असे मी इच्छितो. या कामी सवलत व उत्तेजन देण्यास मी केव्हाही माघार घेणार नाही, याची आपण खात्री बाळगा.

८१

पंधरा

# हक्कांसाठी झगडा !



समाजाच्या सर्व स्तरातील मागासलेल्या लोकांना, खचलेल्या-पिचलेल्या अवघ्या दलितांना मार्गदर्शन करून, त्यांना उच्च स्थिती प्राप्त करून देणे हे शाहू महाराजांचे जीवितकार्य होते. कामगारवर्ग हा त्यापैकीच एक सामाजिक घटक. त्यांच्या उन्नतीसाठी मार्गदर्शन करताना ते म्हणतात : " लॉर्ड विलिंग्डनसाहेब व लेडी विलिंग्डनसाहेब यांच्या मनामध्ये सामान्यांविषयी जे प्रेम आहे, त्यामुळेच आज आपण येथे जमला आहात. तेव्हा त्यांच्या निर्भिड व स्पष्टवक्तेपणाप्रमाणे आपणही आपले विचार त्यांच्यापुढे मांडले पाहिजेत. मुंबई शहर हे व्यापार व उद्योगधंदा या बाबतीत सुप्रसिद्ध आहे. कारण "भांडवल व व्यवस्थापनचातुर्य यावरच व्यापार व उद्योगधंदा अवलंबून आहे अशी आजपर्यंतची समजूत आहे. भांडवलवाले लोकांची मजूरदार लोकांवर बेसुमार सत्ता चालते." म्हणून हिंदुस्थानातही ' मजूर संघ ' बनवावेत असा राजर्षींनी आदेश दिला आहे. त्याप्रसंगी 'गवताच्या एकेका काडीची ताकद जास्त नसते पण अनेक काड्यांचा वेठ वळला तर त्याने हत्तीलाही बांधता येईल', हे संघशक्तीचे, सांगितलेले महत्त्व विशेष स्वरूपाचे आहे. त्याहूनही विशेष हे आहे की, राजर्षी शाहू हे, ब्रिटिश साम्राज्यामधील एक मांडलिक संस्थानिक असूनही त्यांनी संघटना बांधणीचा, आदेश द्यावा. होऊ घातलेल्या क्रांतीची स्वप्ने- ज्यात स्वराज्यप्राप्तीची क्रांतीही अंतर्भूत आहे– सामान्य जनतेच्या कळवळ्याचे लेणे ल्यालेल्या, शाहू महाराजांनी सूचित केली आहेत; असेच नव्हे काय ?



मुंबई : १० नोव्हेंबर, १९१८

परळ येथील कामगार मेळाव्याच्या अध्यक्षपदावरून, शाहू महाराजांनी केलेले भाषण

त्या दृष्टीने ' हक्कासाठी झगडा ' मध्ये कोणत्या विशेष योजना केल्या पाहिजेत याचे विवेचन करताना राजर्षी सांगतात : " इंग्लंडमध्ये मजूर संघाचे प्रतिनिधी पार्लमेंटमध्ये व प्रधानमंडळात शिरले असून ते आपल्या वर्गाच्या हिताचे रक्षण करीत आहेत. तेव्हा आपल्याकडील सर्वात मागासलेला वर्ग शेतकऱ्यांचा आहे. कारखान्यात मजुरी करणारे आपण सर्व शेतकरीच आहात. मजूरदार व इतर मागासलेले वर्ग यांच्या हिताचे संरक्षण करणे, या हिंदुस्थान देशातही जरूरीचे आहे. येथील पुढारलेल्या वर्गाकडून मागासलेल्यांच्या हितसंबंधांचे रक्षण होणे शक्य नाही. याकरिता जातवार किंवा वर्गवार मतदार संघातर्फे, त्यांच्यातील प्रतिनिधी निवडून आले पाहिजेत." राजर्षींनी कामगार शेतकऱ्यांना उद्देशून केलेले हे आवाहन प्रेरक आहे.

समाजजीवन, उत्तमोत्तम गोष्टींनी निरामय बनावे, समान संधी आणि समान न्याय प्राप्त होत जावा; ही राजर्षींची धडपड. ' हक्कासाठी झगडा ' मधील सर्वस्पर्शी उपाययोजनात ती दृष्टीस पडते.



पंधरा

# हक्कांसाठी झगडा !



आजच्या सभेचे अध्यक्षस्थान स्वीकारण्यास आपण मला निमंत्रण केले आहे. हे अध्यक्षस्थान स्वीकारण्यास मला विशेष आनंद व अभिमान वाटत आहे. कारण मी आपल्यांपैकीच एक आहे.

मागासलेल्या लोकांचा मार्गदर्शक होऊन त्यांना उच्च स्थिती प्राप्त करून देण्याचा प्रयत्न करण्यात मला आनंद वाटतो. मी आपला पुढारी झालो तरी आपणाला केव्हाही भलत्या मार्गांने नेणार नाही. त्याविषयी खात्री असू द्या. आजच्यासारख्या सभेचे अध्यक्षस्थान स्वीकारण्यास मला जितका आनंद वाटतो आहे, तितका आनंद एखाद्या पुढारलेल्या लोकांच्या सभेचे अध्यक्षस्थान स्वीकारण्यात मला खास वाटला नसता ! अशा लोकांच्या सभेचा अध्यक्ष मी होतही नाही; कारण ते आपल्या पायावर उभे रहाण्यास पूर्ण समर्थ आहेत. ते लोक कधी कधी मला बहुमान देण्याकरिता बोलावतात; तरी कधी मी ह्या कामास योग्य नाही असे समजून, मी त्यांची विनंती मान्य करीत नाही. कारण मजपेक्षा दुसरे लायक लोक पुष्कळ आहेत. त्यांनी हे काम करावे असे मी त्यांना सांगतो.

दर पाच वर्षांनी नवे गव्हर्नरसाहेब येतात व पूर्वीचे जातात. असे नेहमी होत असते. परंतु आपणासारख्या गरीब व अशिक्षित म्हणून मुक्या मजुरांची अशा प्रकारची प्रचंड सभा कोणत्याही गव्हर्नरसाहेबाने आजवर भरविली नव्हती. मग आजच अशी सभा भरत आहे त्याचे प्रयोजन काय ? असा प्रश्न साहजिकपणे उपस्थित होतो. या प्रश्नाचे उत्तर माझे मित्र नारायणराव चंदावरकर यांनी नुकतेच दिले आहे. ते म्हणतात, "या (लार्ड विलिंग्डन) गव्हर्नरसाहेबाप्रमाणे दुसऱ्या कोणत्याही गव्हर्नरानी इतक्या आस्थेने व नेटाने, सर्वांच्या, विशेषेकरून गरीब लोकांच्या आयुष्यक्रमाशी संबंध ठेविला नव्हता." अशिक्षित बहुजनसमाजा गव्हर्नरसाहेब मिसळत. त्याजविषयी भरवसा व प्रेम उत्पन्न केले होते.

लॉर्ड विलिंग्डनसाहेब आपणावर प्रेम करतास व आपणही त्यांच्यावर प्रेम करीत आहोत. ते, आपले प्रेम व त्यांच्याविषयी आपले ठायी असलेला आदर जाहीररीत्या व्यक्त करण्याकरिता आज रोजी आपण येथे जमलो आहोत.

नामदार गव्हर्नरसाहेब यांच्या पत्नी लेडी विलिंग्डंन ह्याही आपल्या अंगच्या दया, परोपकार. दाक्षिण्य इत्यादी थोर सद्गुणांनी फार लोकप्रिय झाल्या आहेत. 'हार्डिंग्ज हॉस्पिटल' हे तर केवळ त्यांच्याच प्रयत्नांचे फल आहे. इतकेच नव्हे तर, नामदार गव्हर्नरसाहेबांना आपल्या कामात नावाजण्यासारख यश मिळाले आहे; त्याचे बरेच श्रेय त्यांच्या अर्धांगीकडे आहे; ही गोष्ट उभयतांसही भूषणावह आहे. लेडी विलिंग्डन ह्या लॉर्ड ब्रेसी यांच्या कन्या होत, हे घराणे जुने नामांकित असून भूतदया, औदार्य इत्यादी उदात्त गुणांनी ते पुढे आलेले आहे. म्हणून लेडी विलिंग्डन यांच्यावरही हे अनुवंशिक संस्कार व्हावेत काही आश्चर्य नाही.

लॉर्ड विलिंग्डनसाहेब आज इतके लोकप्रिय झाले आहेत, त्यास केवळ त्यांच्या अंगचे गुण कारणीभूत आहेत. त्यांचे अंगभूत गुण विशेषप्रसंगी कसे दृष्टोत्पत्तीस आले व त्यांच्या कर्तबगारीची साक्ष कशी पटू लागली, हे मी आपणास सांगितले पाहिजे असे नाही. गेल्या एप्रिल महिन्यात मुंबई येथे भरलेल्या 'वॉर कॉन्फरन्स' च्या वेळी त्यांनी जे भाषण व व आचरण केले त्यावरून ते किती निर्भिड व स्पष्टवक्ते आहेत हे चांगले दिसून आले. आपले कर्तव्य बजाविण्यात ते आपल्या शरीराचीही पर्वा करीत नसत. गेल्या दोन वर्षांत शारीरिक व मानसिक त्रास सोसून, ते आपल्या इलाख्यात चोहोकडे फिरले व कर्तव्य म्हणून लढाईला शक्य ती मदत केली. हे प्रेमळ स्वभावाचे असल्यामुळे दररोज हॉस्पिटल-मध्ये जाऊन जखमी शिपायांची विचारपूस करीत.

ह्या कृतीचा रयतेवर कसा इष्ट परिणाम झाला हे युद्धकर्जाच्या आकडेवारीवरून स्पष्ट होते. पहिल्या युद्धकर्जात मुंबई इलाख्याने आघाडी मारली. दुसऱ्या युद्ध कर्जातही बंगाल इलाख्याच्या खाली जागा पटकाविली. आपल्या इलाख्यातील युद्ध कर्ज इतके यशस्वी होण्यास बहुतेक अंशी ना. गव्हर्नरसाहेब कारणीभूत आहेत असे म्हटल्यास अतिशयोक्तीचा प्रकार आहे असे मला मुळीच वाटत नाही. खरी परिस्थिती अंत:करणपूर्वक लोकांच्या-समोर मांडून पैसा जसा करण्याच्या वेळी लोकांत अस्वस्थता होऊ दिली नाही. मागासलेल्या लोकांकडून जी मदत मिळाली त्याजबद्दल त्यांनी कृतज्ञताच व्यक्त केली आहे.

परवाच कलकत्ता व मद्रास येथे बाजारलुटीचे जे दंगे झाले; असल्या प्रकारचे दंगे आपल्या इलाख्यात त्यानी आपल्या कर्तबगारीने होऊ दिले नाहीत. त्यांना Sporting ची विशेष आवड आहे. ' विलिंग्डन स्पोर्टस क्लब ' ह्या संस्थेचे ते संस्थापक असून या संस्थेत आपणास त्यामध्ये मिसळू दिल्याने विशेष फायदा होणार आहे. Sporting ची त्यांना इतकी आवड आहे, तरी कर्तव्य बजावीत असता ते सर्व बाजूस ठेवीत असत. संस्थानिकांना स्वतंत्र राजाप्रमाणे वागविण्याची यांनी शक्य तितकी खटपट केली. त्यांच्यातील विशेष गुण म्हटला म्हणजे, मध्यरात्रीसुद्धा कोणी जरुरीच्या कामाकरिता यांच्याकडे गेला तरी त्यास मज्जाव नाही. ह्या सर्व गुणांमुळेच ते आम्हास आज हवेसे झाले आहेत.

मुंबई शहर हे व्यापार व उद्योगधंदा या बाबतीत सुप्रसिद्ध आहे. धनिकांचे भांडवल व कारखानदारांचे व्यवस्थापनचातुर्य यावरच हा व्यापार व उद्योगधंदा अवलंबून आहे अशी, आजपर्यंत इकडच्या प्रांती समजूत होती. पाश्चात्य देशात भांडवलवाले व मजूर असे दोन वर्ग आहेत. तिकडेही भांडवलदार लोकांची मजूरदार लोकांवर बेसुमार सत्ता चाले. पण आता मजूरदार लोकांनी आपले संघ बनविले आहेत. गवताच्या एकेका काडीची ताकद जास्त नसते पण अशा अनेक काड्यांचा वेठ वळला तर त्याने हत्तीलाही बांधता येते. मजूरदार लोकांना, विलायतेत मजुरी वाढवावी एवढ्याकरिताच झगडावे लागते. तेथील समाजामध्ये कोणत्याही दर्जास पोचण्यास जन्मसिद्ध अडचणी मुळीच नाहीत. त्यामुळे ते उच्च वर्गात सहजरीतीने मिसळतात तशी स्थिती आमच्या इकडे नाही. विलायतेत मजूरदार लोकांच्या संघांना बरेच महत्त्व आले आहे. पार्लमेंटसारख्या संस्थांत व प्रधानमंडळात त्या लोकांतीलच प्रतिनिधी शिरले असून ते आपल्या वर्गाच्या हिताचे योग्यरीतीने संरक्षण करीत आहेत.

आता आपल्या हिंदुस्थानातील स्थिती पाहू गेल्यास इकडे मुख्य मागासलेला वर्ग म्हणजे शेतकऱ्यांचा आहे. मीही त्यापैकीच एक आहे. कारखान्यात मजूरी करणारे आपण सर्व शेतकरीच आहात; तेव्हा सर्वांविषयी एकत्र विचार करणे सोईचे आहे. मजूरदार व इतर मागासलेला वर्ग यांच्या हिताचे संरक्षण करणे, या हिंदुस्थान देशातही जरूरीचे आहे. जातिभेदामुळे हिंदू समाजाचे अत्यंत नुकसान झाले आहे असे माझे ठाम मत आहे.

ख्रिश्चन, मुसलमान, बुद्धधर्मीय वगैरे लोक आमच्या मागासलेल्या समाजाशी प्रेमळपणाने व सहानुभूतीने वागतात. त्यामुळे हे लोक परधर्मिय असूनही आम्हास त्यांच्याविषयी

जास्त आपलेपणा वाटतो. मजूरदारांचे इतर संबंध, भांडवलवाल्यांच्या इतर संबंधाशी विरोधी असल्यामुळे ह्या मंडळातील प्रतिनिधींकडून मजूरदार लोकांच्या हक्कांचे संरक्षण होत नव्हते, अशी स्थिती इंग्लंडात होती. तसलीच स्थिती येथेही आहे. पुढारलेल्या वर्गाकडून मागासलेल्यांच्या हितसंबंधांचे रक्षण होणे शक्य नाही. याकरिता जातवार किंवा वर्गवार मतदार संघातर्फे त्यांच्यातील प्रतिनिधी निवडून आले पाहिजेत. अशा विशेष योजना केल्या पाहिजेत; असे माझे पूर्वीपासून मत आहे. त्याप्रमाणे शक्तीनुसार मी खटपटही करीत असतो.

इंग्लंडात मजूरदारांनी आपल्या उन्नतीकरिता आपले संघ स्थापन करून स्वावलंबनाचे मार्ग स्वीकारले. त्याप्रमाणे आपण आपले सुव्यस्थित संघ तयार केले पाहिजेत. आपल्या मुलांबाळांस शिक्षण देऊन, आपले आरोग्य वाढविण्याचे प्रयत्न करून आपली उन्नती आपणच करून घेतली पाहिजे. दुसरा आपल्याकरिता काही करील, अशी अपेक्षा करणे केव्हाही कमीपणाचे आहे. ही गोष्ट अहर्निश लक्षात ठेवा. [परधर्मापासून आपल्या धर्मावर आलेले संकट आपल्याच लोकांच्या मदतीने छत्रपती शिवाजी महाराजांनी निवारण केले. आजही आमच्या धार्मिक कामात, आर्थिक व अशाच हक्कांवर संकट, आमच्या देशाच्याच पुराणमताभिमानी लोकांकडून आले आहे, ते दूर करण्यास आपण सर्वांनी झगडले पाहिजे. हा झगडा पूर्वीसारखा तरवारीच्या साहाय्याने करावयाचा नाही. आता सर्वांस समदृष्टीने पाहणारे व दीनांची कळकळ बाळगणारे, इंग्रजी छत्र आपणावर आहे. त्यामुळेच आम्हाला थोडेबहुत समजू लागून, आपण एकत्र जमलो आहोत.

आमच्या शिक्षणाला पूर्वी इतक्या अडचणी होत्या की, खुद्द सातारच्या महाराजांना मध्यरात्री शिक्षण घ्यावे लागत असे. मग इतरांची ती काय कथा ? परंतु तो काळ आता उरलेला नाही. आम्हास लिहिणे–वाचणे शिकण्यास असलेला प्रतिबंध नाहीसा झाला आहे. याचे कारण आपणा सर्वांकडे समदृष्टीने पाहणारे इंग्रजांचे एकछत्री राज्य हे होय. याकरिता आपण त्यांचे जितके आभार मानावे तितके थोडेच आहेत. मोफत व सवलतीचे शिक्षण लवकरच सुरू होईल असे मला वाटत होते, परंतु मागासलेल्या जातीचे प्रतिनिधी कौन्सिलात असल्याशिवाय या प्रश्नांची उठावणी लवकरच सुरू होईल, असे दिसत नाही. याजकरिता शांततेच्या मार्गांनी आपण आपला उद्दिष्टहेतूसाध्य केला पाहिजे. ऐक्य, परस्पर प्रेम, विश्वास व चिकाटी न सोडता अव्याहत प्रयत्न हीच आमची ह्या झगड्यातील शस्त्रे आहेत.

मागासलेल्या लोकांच्या उन्नतीकरिता माझे कैलासवासी मित्र न्या. मू. रानडे व गोपाळराव गोखले यांनी पुष्कळ श्रम केले. मागासलेल्या लोकांत विद्येचा प्रसार होण्याकरिता विशेष

प्रयत्न केले पाहिजेत, ही मूळ कल्पना रानडे-गोखले यांच्यापासूनच मला आली. आजच्या काळीदेखील ना. सर शंकरन नायर, ना. सर इब्राहिम रहिमतुल्ला, ना. पटेल, मि. गांधी, मद्रासचे डॉ. नायर, रा. ब. त्यागराज चेट्टी व या इलाख्यातील माझे मित्र रा. कोठारी, व्होरा, लठ्ठे, मुकुंदराव पाटील, तसेच येथील काही निवडक मंडळींनी स्वार्थत्यागपूर्वक समाजकार्यास वाहून घेऊन आपल्या ज्ञातिबांधवांची उन्नती करावी, असे माझे त्यांना आग्रहपूर्वक सांगणे आहे.

इंग्रज लोक कसे दिलदार आहेत, त्यांना रयतेच्या कल्याणाची व उन्नतीची किती कळकळ आहे याचे उत्कृष्ट उदाहरण म्हणजे आमचे गव्हर्नरसाहेब व त्यांच्या पत्नी, ही होत. त्याचप्रमाणे सर वुइलियम वेडरबर्न ह्यूम, सर जॉर्ज बर्डवूड वगैरे लोक आमच्या देशाकरिता कसे झटले हे मी आपणास सांगितले पाहिजे; असे नव्हे. हल्ली माझे परम मित्र व्हॅलेंटाईन चिरोल व लॉर्ड सिडनहॅम हे आपल्या मागासलेल्या वर्गाच्या हिताकरिता निरपेक्षबुद्धीने प्रयत्न करीत आहेत. अशा प्रकारचे उदार मनाचे लोक आपणास सदा लाभल्यास आपली उन्नती झपाट्याने होईल त्यात संदेह नाही. ह्यासाठी लॉर्ड विलिंग्डन यांची कारकीर्द आपणावर आणखी पाच वर्षे असावी, अशी जी आपली मागणी आहे ती अगदी रास्त आहे. आपल्या आजपर्यंतच्या मागासलेल्या वर्गास आता वाचा फुटली आहे. आपण आपली गाऱ्हाणी आता सांगू लागलो आहोत. इंग्रज लोक हे मोठे बहुमताचे चाहते आहेत. नवीन येणाऱ्या गव्हर्नरसाहेबास मुंबई व मद्रास सारखेच पण येथे राहून लोकप्रिय झालेले गव्हर्नर येथेच राहू देणे हिताचे आहे. म्हणून आमची एवढ्या समाजाची मागणी आपले सरकार, शक्य तितकी मान्य करील अशी मला उमेद आहे,

हिंदुस्थानची राजनिष्ठा अढळ आहे, असे या लढाईने सर्व जगास स्पष्ट कळविले आहे. या प्रसंगी आपल्या देशातील मागासलेल्या लोकांकडूनच सरकारास फार उत्तम प्रकारची मदत झाली आहे. त्यांनी रणांगणावर शौर्य गाजवून आपले क्षात्रतेज जगाच्या निदर्शनास आणून दिले आहे. असे असता भावी राज्यसुधारणेत अशा लोकांचे हक्क राखून ठेवण्याची तजवीज करण्यात आलेली नाही; ही खेदाची गोष्ट आहे. महायुद्धात ज्यांनी आपल्या बादशहाकरिता प्राणांचीही आहुती दिली त्यांच्या ज्ञातिबांधवांस सरकारने विसरु नये, एवढेच आमचे म्हणणे आहे. आता लढाई बहुतेक संपल्यासारखी आहे. ईश्वराने सत्पक्षास यश दिले असून, जुलूमी राजसत्तेचा नायनाट होण्याची वेळ जवळ आली आहे. बेल्जम, सर्व्हिया वगैरे लहान राष्ट्रांवरील जुलूम-जबरदस्ती नाहीशी करण्यास ज्याप्रमाणे इंग्रज सरकारने कंबर बांधली, त्याप्रमाणे त्यांना मागासलेल्यांच्या उन्नतीकरिताही काम करावयाचे आहे. त्यासाठी पुढारलेल्यांच्या मनाविरुद्ध बऱ्याच गोष्टी त्यांना कराव्याही

लागतील. जातवार प्रतिनिधीत्वाच्या नावासाठी माझे मित्र व या कामातील मार्गदर्शक लॉर्ड सिडनहॅमसारखे आपल्या सर्वांच्या पूर्ण परिचयाचे थोर व वजनदार गृहस्थ विलायतेस खटपट करीत आहेत. त्यांच्या या प्रयत्नांस यश येईल अशी मला उमेद आहे. मात्र, आपण याबाबतीत आपले कर्तव्य म्हणून शक्य तितक्या जोराचे प्रयत्न सुरु ठेविले पाहिजेत.

शेवटी बेल्जस व सर्व्हिया यांचेच उदाहरण मी आपणापुढे ठेवितो. जर्मनी, ऑस्ट्रिया या सारखी प्रबल राष्ट्रे चालून आली असताही व त्यांच्यापुढे आपला निभाव लागणार नाही अशी खात्री असतानाही त्यांनी हिंमतीने युद्ध सुरू केले. नावाजण्यासारखे पराक्रम करुन आपली योग्यताही जगास दाखविली. विपत्तीच्या काळी धीर सोडला नाही. यामुळे त्यास आता यश येत आहे. तसेच आपणही आपल्या हक्कांकरिता झगडत राहिले पाहिजे. ईश्वर सत्पक्षास यश देईल अशी खात्री बाळगा. आपल्या मागासलेल्या वर्गाकरिता कळकळ बाळगणारे लॉर्ड विलिंग्डनसाहेब ह्यांची सुखद कारकीर्द आणखी पाच वर्षे आम्हास लाभो, ती मिळविण्याकरिता आपण जे प्रयत्न करीत आहोत त्या यत्नाला यश मिळो; अशी माझी परमेश्वराजवळ प्रार्थना आहे.

सोळा

# पहिला लोकसंघ



१० नोव्हेंबर, १९१८ च्या परळ येथील कामगार मेळाव्यात, शाहू महाराजांनी मजूर संघटनेचा मंत्र दिल्यानंतर पंधरा दिवसांच्या आत, मुंबईच्या कामगारांनी 'पीपल्स युनियन'– लोकसंघाची–स्थापना केली. त्याचे उद्घाटन राजर्षींच्या हस्ते व्हावे हे उचितच होते.

याप्रसंगी केलेल्या भाषणात राजर्षींनी मजूर-संघाची निकड आवर्जून प्रतिपादली आहे. ते म्हणतात : "वास्तविक पाहता ज्याने त्याने आपले वाजवी हक्क तेवढेच सांभाळले. दुसऱ्याचे वाजवी हक्कांस विरोध केला नाही म्हणजे तंट्यास जागा राहत नाही." या मूलभूत विचारांभोवती हिंदुस्थानात वरिष्ठ वर्ग–ब्राह्मण वर्ग–कसा विषमता निर्माण करतो याचे चित्र रेखाटले आहे.

हिंदुस्थानातील ब्राह्मण व ब्राह्मणेतर पक्षातील अंतर कमी करणाऱ्या आर्यसमाजाच्या कार्याचे महत्त्व राजर्षींनी पुढे पटवून दिले आहे. त्यांच्या मते, सामाजिक समता आणि संघटना यासाठी सर्वांनी झटले पाहिजे. त्यासाठी, "ऐक्य, परस्पर प्रेम, विश्वास व चिकाटीने सतत प्रयत्न ही आमची शस्त्रे असली पाहिजेत. वयात आलेल्या प्रत्येक माणसाला मत देण्याचा अधिकार मिळाला म्हणजे बहुजनसमाजाच्या मताप्रमाणे कारभार चालला पाहिजे. येथेही इंग्लंडप्रमाणे मजुरांचे संघ झाले पाहिजेत व सर्वांस आपले हक्क काय आहेत हे कळले पाहिजे. भांडवलवाल्यांत ब्राह्मण व वैश्य वृत्तीच्या



मुंबई : २४ नोव्हेंबर, १९१८
'पीपल्या युनियन' या कामगार संघटनेच्या स्थापनादिनी उद्घाटक म्हणून, शाहू महाराजांनी दिलेले भाषण

क्रांतिसूक्ते : ९

लोकांचा भरणा विशेष आहे. त्यांना दाबात ठेवल्याशिवाय मजुरांची उन्नती होणे कठीण आहे." १९१८ साली, 'पहिला लोकसंघ' मध्ये, राजर्षीनी श्रमजीवी लोकांना संघटित होण्याचा दिलेला महामंत्र, दूरवरचा न्याहाळ स्पष्ट करणारा आहे.

सोळा

# पहिला लोकसंघ



गेल्या १० नोव्हेंबर रोजी, परळ येथे भरलेल्या प्रचंड सभेत मी आपणा सर्वांच्या मनात घोळत असलेलेच विचार बोलून दाखविले. पाश्चात्य देशात मजूरदार वगैरे लोकांचे संघ आहेत तसे संघ आपणही करावे व एकजुटीने आपली उन्नती करून घ्यावी, असे आपणास सांगितले. त्याप्रमाणे 'People's Union' म्हणजे 'लोकसंघ' या नावाची संस्था आपण काढली हे फार चांगले केले.

इंग्लंडात भांडवलदार व मजूरदार असे दोन प्रबल पक्ष आहेत. त्यांचे हितसंबंध परस्परविरोधी आहेत, अशी आजपर्यंतची समजूत आहे. वास्तविक पाहाता ज्याने त्याने आपले वाजवी हक्क तेवढेच सांभाळले व दुसऱ्याच्या वाजवी हक्कांस विरोध केला नाही म्हणजे तंटयास जागा राहात नाही. तशी बुद्धी वरिष्ठ लोकांस होईल, दाबून टाकलेल्यांना मान वर करण्यास संधी मिळेल, तो सुदिन होय ! हा सुदिन लवकरच उगवेल अशी आशा वाटत आहे. हिंदुस्थानातही ब्राह्मण व ब्राह्मणेतर असे पक्ष पडले आहेत. त्यांच्यातील विरोध दिवसेदिवस स्पष्ट होत आहे. ब्राह्मणेतर वर्ग बहुतांशी अज्ञानात गढला असल्याने त्याची अवनती झाली आहे. त्यास गुलामाची स्थिती आली आहे. त्यांच्या श्रमावर शारीरिक कष्ट न करणारे लोक पोसले जात आहेत व त्यास कधी कधी चिथावून भलत्या मार्गासही लावतात. अशा स्थितीतच पश्चिम दिशेकडील भांडवलवाल्या सत्तेचे तत्त्व इकडील कारखान्यात शिरल्याने गरीब मजुरांची स्थिती जास्तच कष्टमय झाली आहे. ही स्थिती सुधारण्यास संघटित प्रयत्न जोराने, स्वार्थत्यागपूर्वक केले पाहिजेत आपण तसे करीत आहात ही अभिनंदनीय गोष्ट आहे.



मुंबई : १० नोव्हें, १९१८
परळ ( मुंबई ) येथे भरलेल्या कामगारांच्या जाहीर सभेत अध्यक्ष या नात्याने शाहू महाराजांनी केलेले प्रमुख भाषण

ब्राह्मणसभा, शंकरवाडी, 'मीमांसा विद्यालय' वगैरे आपल्याकरिताच स्वतंत्र संस्था, ब्राह्मणांनीच काढून इतरांस वगळले आहे. अशा रीतीने त्यांनी फुटीचा पाया घातला आहे. वास्तविक पाहाता सर्वांशी एकोप्याने वागून एकीचे व प्रेमाचे उदाहरण, सुशिक्षित आणि समंजस वर्गाने घालून दिले पाहिजे. पण ते तसे करीत नाहीत. ते काम आर्यसमाजाने हाती घेतले आहे. आर्य समाजाचा महशूर नरवीर सर प्रतापसिंह महाराज यांचा मी अनुयायी आहे. त्या मताच्या ग्रंथाचे वाचनही मी बरेच केले आहे. आर्यसमाजाची मते दयानंद सरस्वतींचीच आहेत. वेदातील अनादि तत्त्वे स्वामी दयानंद, नित्यानंद, माझे मित्र पंडित आत्माराम व स्वामी परमानंद वगैरे प्रज्ज्वलित करीत आहेत. धर्मोपदेशकांची व उपाध्यायांची जात बनवून जी नवीन नवीन तत्त्वे धर्मात घुसडली जात आहेत; त्याबद्दल त्यांचे जितके आभार मानावे तितके थोडेच !

मी आर्यसमाज मताचा कसा झालो हे थोडक्यात सांगतो: क्षत्रियकुलवंतस महाप्रतापी महाराज प्रतापसिंह हे युद्धाच्या आरंभापासून फ्रान्समध्ये लढत आहेत. ते व मी एका स्टीमरने राज्यारोहण समारंभाकरिता विलायतेस गेलो, तेव्हा त्यांनी मला ही मते समजावून दिली. त्यानंतर बऱ्याच वर्षांनी पंडित आत्माराम यांची गाठ पडली. तेव्हापासून मी अलिकडे या समाजाचा झालो. हल्लीचे कुचबिहारचे महाराज ब्रह्मसमाजिष्ट आहेत. आर्यसमाज, ब्रह्मोसमाज, प्रार्थनासमाज हे का उत्पन्न झाले याचे थोडक्यात उत्तर, धर्मोपदेशक बनलेल्या जातीचे जुलमी जू झुगारून देण्याकरिता हे आहे. आपले संघ बनवून भांडवलवाल्यांचा जुलूम नाहीसा करणे जितके महत्त्वाचे आहे, त्यापेक्षाही हे बनावटी धार्मिक जू काढून टाकणे जास्त जरूरी आहे. याकरिताच मी आर्यसमाज चाहतो पण बनावटी धर्मवाले आर्यसमाजाला विरोध करतात. लॉर्ड किचनेर, लॉर्ड फ्रेंच वगैरे योद्धे मनाने आर्यक्षत्रिय-आर्यसमाजी–आहेत. त्यास आर्यधर्मी होता येईल. याप्रमाणे आर्यसमाज हा आम्ही व इंग्रज राष्ट्र यास ऐक्याने जोडणारी साखळी आहे. याचे मोठे उदाहरण महाराज प्रतापसिंह हे होत.

बरे असो. ब्राह्मण व ब्राह्मणेतर यामधील ही फूट लवकरच नाहीशी होईल व सर्वांचे ऐक्य होईल अशी मला मोठी आशा आहे. परंतु जोपर्यन्त त्यांच्या अशा स्वतंत्र संस्था चालू आहेत व त्यात इतरांचा प्रवेश होत नाही तोपर्यन्त आपणही आपली संस्था निराळीच चालविणे भाग आहे. याकरिता ब्राह्मणेतर लोकच आपल्या संघात घ्यावयाचे असा आपला नियम चालू स्थितीत गैर म्हणता येत नाही. आमच्याकडे आहे त्याप्रकारचा जातिभेद दुनियेत कोठेही सापडावयाचा नाही. कोणत्याही देशात उपाध्यायांची स्वतंत्र जात नाही. आमच्याकडेही वेदकाली ती नव्हती,

पण अलिकडेच ती उत्पन्न झाली आहे. त्यायोगाने पुढारलेल्या थोडचा लोकांच्या हाती सर्व सत्ता जाऊन त्यांची एक ' ऑलिगार्की'च झाली आहे. त्यामुळे बहुजनसमाजाला शक्य तितकी मदत होत नसून त्यांच्या हिताकडे व सुधारणांकडे दुर्लक्ष होत आहे. याकरिता आपल्या स्वावलंबनाचा मार्ग योग्य आहे. अशा या आपल्या संघामार्फत बोलाविलेल्या संस्थेचे अध्यक्षस्थान स्वीकारण्यास मला फार आनंद वाटत आहे.

महायुद्धाचा शेवट झाला, दोस्त राष्ट्रास पूर्ण यश मिळाले;. याबद्दल आनंद प्रदर्शनार्थ आजची सभा भरविली आहे. या लढाई संबंधाने चार शब्द सांगणे प्रसंगास अनुसरून आहे : ही लढाई ' बळी तो कान पिळी ' हे तत्त्व स्थापित करण्याकरिता सुरु करण्यात आली. १८७० साली जर्मनीने फ्रान्सचा पूर्णपणे पराभव करून दोन प्रांत व लढाईचा खर्च म्हणून अब्ज रुपयांची संपत्ती हिसकावून घेतली. यामुळे जर्मनीची महत्त्वाकांक्षा जास्तच वाढली. युरोपात, सर्वात बलाढच असे ते राष्ट्र ठरले. तेथील राजकारणात त्याच्या मतास फार मान मिळू लागला. पण एवढचानेच जर्मनीची तृप्ती झाली नाही. युरोपातच नव्हे, तर सर्व जगात आपल्या इच्छेला मान वाकविली पाहिज, आपल्या शब्दाशिवाय पानही हालता कामा नये, अशी दांडगी हाव जर्मनीस सुटली. ती सफल होण्याकरिता जर्मनीने ऑस्ट्रिया व इटलीसह तीन देशांचे एक कूट बनविले. यापासून आपणास फार धोका आहे असे जाणून रशिया व फ्रान्स यांनी एकमेकांचे रक्षण करण्याचा तह केला.

फ्रान्स कमकुवत झाला आहे, तेथील लोकसंख्या वाढत नाही तेव्हा त्यास पाहिजे तेव्हा दाबता येईल, अशी जर्मनीस खात्री होती. इंग्रजांना खाली कसे आणावे, याचा विचार जर्मन कैसरच्या व त्यांच्या मुत्सद्यांच्या डोक्यात सारखे घोळत असत. जर्मन प्रजेत इंग्रजाविषयी द्वेष उत्पन्न करण्याची अतोनात खटपट करून त्या कामी त्यांनी चांगलेच यश मिळविले. हे जाणून इंग्रजांनी फ्रेंचाबरोबर जास्त स्नेहसंबंध ठेविला. इंग्रजांची शक्ती, त्याच्या साम्राज्यावर आहे; तेव्हा त्या साम्राज्यातील महत्त्वाच्या भागास म्हणजे हिंदुस्थानास शह द्यावा व आपलेही मोठे साम्राज्य पसरावे याकरिता मेसापोटेमिया ताब्यात आला पाहिजे, असे जर्मनीने ठरविले. त्यासाठी तुर्काच्या सुलतानास वळविण्याचे काम सुरू केले. तुर्क लोकांवर भुरळ टाकली. या कामी त्याला यश आले. पण जर्मनीचा खरा कावा दिसून आल्याने इटलीचे डोळे उघडले व हे महायुद्ध सुरू झाले. तेव्हा आपल्या दोस्ताविरुद्ध म्हणजे जर्मनी व ऑस्ट्रियाविरुद्ध इटली उठला. खोटचाचा अवलंब केल्याने मित्रही शत्रू होतात व खऱ्या पक्षाला शत्रूही मिळतो, ह्याची सत्यता अशा रीतीने पटते. मेसापोटेमिया ताब्यात राहण्याला बाल्कन द्वीपकल्पातील सर्व्हियाच्या राजाची मोठी

आडकाठी होती. ह्याकरिता सर्व्हिया पादाक्रांत केला पाहिजे असे जर्मनीने ठरविले. ऑस्ट्रियाकडून कुरापत काढवून लढाईचे शिंग फुंकले.

लढाईचे धोरण कशाप्रकारे आहे, यात बाहेरून दाखविण्यात येतो त्यापेक्षा निराळा कावा कसा आहे हे समजून येण्यास अवकाश लागला नाही. रशिया व फ्रान्स यांची रग जिरविल्याशिवाय सर्व्हिया आपणास पचणार नाही, अशी जर्मनीची खात्री असल्यामुळे; या युद्धाची प्रथमपासूनच त्याने कडेकोट तयारी ठेविली होती व रशियाची जमवाजमव होईपर्यंत फ्रान्सला चीत केले पाहिजे, याकरिता त्या देशात लवकर शिरण्यासाठी, बेल्जम-मधून घुसण्याचे व वचनभंगाचे पापही शिरावर घेण्याचे पत्करिले. बेल्जमने नेहमी तटस्थ राहावे, युरोपच्या राजकारणात बिलकूल पडू नये, यासाठी त्या देशात कोणाच्याही फौजेने पाय घालू नये; असा सर्व राष्ट्रांनी करार केला होता. त्यात जर्मन व ऑस्ट्रिया हेही देश होते. पण गरज ही फायदा जाणत नाही, असे तत्त्व लढवून तहास कागदाचे चिटोरे ठरवून बेल्जममध्ये जर्मनी जबरदस्तीने घुसला; त्यामुळे बेल्जमच्या स्वातंत्र्य व आपल्या साम्राज्य रक्षणासाठी इंग्रजासही या युद्धात शिरावे लागले. जर्मनीचे हेतू किती दुष्ट आहेत, त्यापासून लहान लहान असंख्य राष्ट्रांचे स्वातंत्र्य कसे नष्ट होईल, शिवाय जर्मनीचे वर्तन किती जुलूमी व मदांधपणाचे आहे याची खात्री पटल्याने, अमेरिकाही मागाहून युद्धात सामील झाली. सव्वा चार वर्षे युद्ध चालले. पुष्कळ जयापजय झाले. पहिली चार वर्षे तर जर्मनी जिंकती व सत्यपक्षाला हार येते की काय, अशी भीती पडली. पण अखेर ' सत्यमेव जयते ' या तत्त्वाचा खरेपणा जगाच्या निदर्शनास आला. जर्मनीचा पूर्ण पराभव होऊन त्याला दोस्त राष्ट्रांस शरण यावे लागले. त्याची तीन दोस्त राष्ट्रे तर पूर्वीच शरण आली होती. अशा रीतीने युद्धाचा शेवट होऊन सर्वांना आनंदी आनंद झाला आहे. तो व्यक्त करणे हे आपले आजचे मुख्य काम आहे.

या युद्धात हिंदुस्थान देशाने मोठी कामगिरी बजाविली आहे. सर्वतऱ्हेने साम्राज्य लष्करास मदत केली. समरांगणावर लढून शूरांनी आपले आणि आपल्या देशाचे नाव राखिले. आमच्या मराठे वीरांनीही थोर थोर पराक्रम केले. क्षत्रियांचा मुख्य धर्म लढण्याचा आहे. त्या कामी देश, परदेश अमक्याच्या हातचे खावे, तमक्याच्या हातचे खाऊ नये, अमूक खावे, अमूक खाऊ नये, अशाप्रकारच्या धर्मांच्या नावाखाली लोकांवर घातलेले मूर्खपणाचे निर्बंध; याचा विचारदेखील करण्याची जरूरी नाही, असे जाणून त्याप्रमाणे त्यांनी वर्तन केले आहे. अशा रीतीने आपल्या खऱ्या धर्मास जागणारे वीरच आमच्यापेक्षा धर्मपालनाच्या कामात पुढे आहेत व त्याकरिता तेच जास्त शुद्ध आहेत हे लक्षात ठेवा. हे आमचे बंधू परत येतील तेव्हा, त्यांचा उत्तम आदरसत्कार करून

आपण पवित्र होऊ या. धर्मरक्षणाच्या सबबीवर त्यांना प्रायश्चित देण्याचा किंवा ब्राह्मणांच्या अशुद्ध पायांचे तीर्थ या पवित्र लोकांस पाजण्याचा विचारदेखील आमच्या मनास शिवता कामा नये. मेसापोटेमियाच्या रणांगणावर, खरे क्षत्रिय व शूद्र मानलेल्या लाखो लोकांनी केलेल्या पराक्रमाची वर्णने वाचून युद्धपराङ्मुख अशा पुढारलेल्या ब्राह्मण वैश्यादीकांना लाज वाटली पाहिजे. त्यांचे अनुकरण करून लढाईस न जाता नानातऱ्हेच्या सबबी सांगून, लोकांत गैरसमज व सरकारास अडचणी उत्पन्न करणाऱ्या लोकांस काय नाव द्यावे हे कळत नाही. आपल्या देशासाठी आणि राजासाठी आमच्या खऱ्या क्षत्रिय व मानलेल्या शूद्र शिपायांनी मोठे शूरत्व गाजविले. त्याबद्दल त्यांचे अभिनंदन केले पाहिजे. क्षत्रिय कुळात जन्म घेतल्याने जे क्षत्रिय होतात त्यापेक्षा या रणगाजींची योग्यता मोठी असल्याने मी आपणा सर्वांतर्फे त्यास धन्यवाद देतो. त्यांना व त्यांच्या जातीच्या लोकांना कौन्सिलात जातवार प्रतिनिधी निवडून देण्याचा हक्क मिळू नये असा स्वार्थी प्रयत्न करणाऱ्या पुढारलेल्या वर्गाची मला फार कीव येते. आपमतलबी लोकांना दुसऱ्याचे न्याय हक्क देणे बरे वाटत नसेल तरी ईश्वराच्या व ईश्वरी अंशभूत जॉर्ज बादशहाच्या दरबारी हे मान्य आहे. माझी तशी पूर्ण खात्री आहे. पुढारलेल्या 'ऑलिगार्की'च्या जुलूमी अंमलातून बहुसंख्यांक क्षत्रिय व शूद्रांस सोडवून, त्यांना त्यांचे योग्य अधिकार देऊन, त्यांच्या अंगच्या गुणांचे चीज करील असा मला भरवसा आहे. देशाकरिता व राजाकरिता प्राणांची पर्वा न करणारेच राजकीय हक्कांसाठी खरोखर लायक आहेत.

सर्व ठिकाणी डेमोक्रॅटिक मतांचा फैलाव जोराने होत असता आमच्या क्षत्रिय व शूद्रांनी पूर्वीसारखीच धार्मिक जुलूमाखाली मान वाकवावी हे शक्य नाही. माझे प्रिय मित्र व्होरा व कोठारी आणि येथील आपले पुढारी यांचे आपण ऐकल्यास आपले हितच होईल. व्होरा व कोठारी यांनी आपल्या कल्याणाकरिता पुष्कळ नुकसान सोसून दोन वर्तमानपत्रे चालविली आहेत. त्यास आपण आश्रय देऊन त्यातील सुबोध घेतला पाहिजे. फार पुरातन काळापासून आमच्या डोकीवर 'ऑलीगार्की' चा बसलेला बोजा ढकलून देण्याच्या कामी आम्हास माझे प्रिय गुरू लॉर्ड सिडनहॅमसाहेब व त्यांचे अनुयायी मदत करीत आहेत. हे त्यांचे प्रयत्न सफल आले नाहीत तर युद्धात केलेल्या पराक्रमाचा आम्हास उपयोग न होता 'ऑलिगार्की' च्या जुलूमाखाली आम्ही चिरडून जाऊ. हे जू मानेवर आहे तोपर्यंत आमची सुधारणा आम्हास करता येणार नाही.

सध्याची लढाई जर्मनीने आपली राजकीय सत्ता वाढविण्याकरिता सुरू केली. तिचा शेवट त्या राजसत्तेचा नाश होऊन प्रजासत्ता वाढविण्यात झाला आहे, अशा प्रकारची पण विनरक्ताची लढाई आमच्या समाजात चालली आहे. सर्व जातीवर आपले धार्मिक व सामाजिक प्रभुत्व चालावे, ह्याकरिता राजकीय हक्कही आपल्याच पदरी पडावेत या हेतूने

प्रेरित झालेली एक 'ब्युरॉक्रसी' आहे, तिच्या सत्तेपासून मुक्त व्हावे व सर्वांस माणुसकीचे हक्क मिळावेत असे मागणारा, अज्ञानात पडलेला बहुजनसमाज आहे. या समाजाच्या उन्नतीकरिता पुष्कळ महात्मे यत्न करीत आहेत. आर्यसमाज, ब्राह्मोसमाज, सत्यशोधक समाज वगैरे संस्था लोकांत समानतेचे तत्त्व पसरवीत आहेत. सर्व माणसे एकाच ईश्वराची लेकरे असल्यामुळे त्यांच्यामध्ये जन्मतःच उच्चनीच भाव आहेत असे मानणे पाप आहे, वगैरे उपदेश करून ते बहुजनसमाजास त्यांच्या हक्कांची जाणीव करून देत आहेत. अशा प्रकारची झटापट प्रत्येक देशात झाली आहे. येथेही ती नवीन नाही. अशा रीतीने झगडा चालविणे हे राष्ट्राच्या जिवंतपणाचे एक चिन्हच आहे. या लढाईत आपली शस्त्रे काय असावीत, हे मागील खेपेस सांगितलेच आहे.

ऐक्य, परस्पर प्रेम, विश्वास व चिकाटीने सतत प्रयत्न ही आमची शस्त्रें असली पाहिजेत. पाश्चात्य देशात भांडवलवाले व मजूर पक्षाच्या हाती राज्यकारभार बहुतांशी जाणे, असा परिणाम या युद्धाचा झाला आहे. रशिया व जर्मनी ही निरंकुश राजसत्तेची दोन मोठी पीठे होती. त्या ठिकाणी आता मजूर पक्षाच्या नेतृत्वाखाली प्रजासत्ताक राज्ये स्थापन होत आहेत. इंग्लंडातही मजूर पक्षाचा जोर आस्ते आस्ते वाढत आहे. हॉलंड वगैरे तटस्थ राष्ट्रांवरही या लाटेचा परिणाम झाल्याशिवाय राहात नाही. वयात आलेल्या प्रत्येक माणसास मत देण्याचा अधिकार मिळाला. याचा अर्थ, बहुजनसमाजाच्या मताप्रमाणे कारभार चालणार, अल्पसंख्यांकांची सत्ता कमी होणार असा आहे. ते अटळ आहे. आपणासही असेच अधिकार मिळविले पाहिजेत. त्याकरिता स्वार्थत्यागपूर्वक सतत नेटाने प्रयत्न केले पाहिजेत.

आपण अडाणी व अशिक्षित आहोत, आपणाला सुव्यस्थित रीतीने काम करण्याची सवय लागणे जरूर आहे. त्यासाठी आपल्या पहिल्या शाळा म्हणजे चाळीचाळीतील किंवा कारखान्यांतील सहकारी पतपेढ्या होण्यास योग्य आहेत. त्या दिशेनेही आपण प्रयत्न करावेत. आपणांपैकी बरेच लोक गिरणीत कापड विणण्याचे काम करतात. आपल्याच धंद्यातील लोकांनी सुमारे ६० वर्षापूर्वी राचडेल येथे सहकारी हुडकून काढून, दुकान सुरू केले, त्याचा परिणाम इंग्लंडच्या व जगाच्या प्रगतीवर झालेला आहे हे आपण विसरता कामा नये. अशा सर्वोपयोगी तत्त्वांचा अवलंब करून आपण त्याची वाढ केली म्हणजे आपणास हक्क मिळविण्यास सामर्थ्य येणार आहे.

येथे इंग्लंडप्रमाणे मजुरांचे संघ झाले पाहिजेत व सर्वांस हक्क काय आहेत, ते कळले पाहिजे. भांडवलवाल्यात ब्राह्मण व वैश्य वृत्तीच्या लोकांचा भरणा विशेष आहे. त्यांना

दाबात ठेवल्याशिवाय मजुरांची उन्नती होणे कठीण आहे. मजूरदार या शब्दात कमीपणा नाही. मी कोल्हापूरच्या राजपदावर असताही शिपाई, शेतकरी किंवा मजुर म्हणवून घेण्यात मला अभिमान वाटतो. माझी जनक आई मुधोळकर घोरपडे घराण्यातील, दत्तक आई शिर्के घराण्यातील. दत्तक वडिल भोसले कुळातील; असे शेतकरी वर्गातीलच होते. हलक्या दर्जाचे व अशिक्षित लोकांशी सहवास ठेवणे बरे नाही, अशी पुष्कळांची समजूत आहे. मलाही तसा उपदेश होत असे. परंतु ज्या शेतकरी व मजूर वर्गात माझे कूळ वाढले; त्यांच्याविषयी प्रेम व अगत्य हे जन्मसिद्ध असल्याने अशा शिकविण्याचा माझ्यावर परिणाम होणार नाही. कारण माझ्या हाडीमाशी शिपाईगिरी, शेतकरी यांचे रक्त खेळत आहे. म्हणून मला आपल्यात मिसळण्यास आनंद वाटतो. एका थोर इंग्रज साधु पुरुषाने म्हटले आहे की, ' राजवाड्यापेक्षा गरीबांच्या झोपडीत सद्‌गुण जास्त सापडतात. ' माझाही अनुभव तसाच आहे. इमानीपणा, बंधूप्रेम, देशप्रीती, राजनिष्ठा, मत्सराचा अभाव असे अनेक सद्‌गुण मला आपल्याठायी दिसतात. म्हणून आपल्याविषयी माझ्या मनात फार पूज्यबुद्धी आहे. आपणही मला आपणांपैकीच एक समजावे असे आपणाकडे माझे मागणे आहे.

अशा प्रकारे या युद्धापासून आम्ही व आमचे हक्क बळकाविणाऱ्या लोकांनी बोध घेण्यासारखा आहे. या युद्धात मित्र संघास पूर्ण यश मिळाले, याबद्दल आपण ईश्वराचे आभार मानून; आमच्या सार्वभौम सरकारचे अभिनंदन करु या.

सतरा

# अधिकारदान थैली



शाहू महाराज हे ब्रिटिश साम्राज्यांतर्गत मांडलिक संस्थानिक होते. या साम्राज्यापासून कितीही स्वतंत्रता घ्यायची म्हटले तरी शेवटी लगाम कुणाच्या हाती, याचे भान राखणे चातुर्याचे होते.

ब्रिटिश शासन कितीही सुधारणाप्रिय, पुरोगामी म्हटले तरी, हिंदुस्थानची जनता किंवा राजेरजवाडे यांना पुरेपूर विश्वास देऊन, त्यांचे राज्यशकट कार्यरत होते असे नव्हे. राज्यकर्त्याला ते शक्य आणि इष्टही नसते. पण किमान विश्वास टाकून, विश्वास संपादन करावा अशी वाजवी अपेक्षा ठेवली तर ती अनाठायी नसते.

१८६१ साली, ब्रिटिश सरकारने हिंदुस्थानातल्या संस्थानिकांवर काही कडक बंधने जारी केली. बडोद्याचे सयाजीराव महाराज किंवा कोल्हापूरचे शाहू छत्रपती यांच्यासारख्यांवर तर ब्रिटिशांची करडी नजरच होती. साहजिकच ब्रिटिशानी लादलेली कडक बंधने, मुक्ततेने हातपाय हालवायला अडचणीची होती.

स्वाभाविकपणेच १८९४ मध्ये, छत्रपती शाहू महाराजांनी कोल्हापूर संस्थानची राज्यसूत्रे हाती घेतल्यावर ही बंधने नाहीशी व्हावीत, किमानपक्षी शिथिल तरी व्हावीत असा प्रयत्न जारी राखला. १७ जून, १९०३ च्या ब्रिटिश खलित्यान्वये



कोल्हापूर : २ जानेवारी, १९०५
करवीर संस्थानचे मांडलिक जहागिरदार, सरदार व अन्य मंडळी यांच्या सभेत १७ जून, १९०३ च्या खलित्यान्वये कोल्हापूर संस्थानावर ब्रिटिश शासनाने लादलेल्या अटी शिथिल झाल्याच्या निमित्ताने शाहू महाराजांनी केलेले ' दरबार भाषण '

'अधिकारदान थैली' ने–तशी थोडी मुक्तता लाभली. त्यानिमित्ताने, करवीर संस्थानचे मांडलिक जहागिरदार, सरदार वगैरे मंडळींच्या भरविण्यात आलेल्या सभेत, 'अधिकारदान थैली'च्या अनुषंगाने 'सुनियंत्रित कारभाराविषयी' उदारबुद्धीने महाराजांनी विचार प्रकट केले आहेत.

या 'थैली' मुळे, अधिकारक्षेत्राची थोडीफार व्याप्ती वाढल्याचा राजर्षींना आनंद झाला आहे. आपण राबवत असलेल्या धोरणांच्या कार्यवाहीच्या दृष्टीशी तो संलग्न आहे. 'थैली' ने प्रदान केलेली 'मुक्तता' राजर्षींना मोलाची वाटते,

राजर्षी शाहूना फक्त आपल्या संस्थानातील प्रजेचे हित व्हावे किंवा त्यास आवश्यक व इष्ट त्या सोयीसवलतींचा फायदा व्हावा, एवढेच वाटत नव्हते. त्यासाठीच त्यांची कृती व उपक्रम नव्हते; तर अधिकारांचे संक्रमण व्हावे; मिळालेले अधिकार राबविण्यास लोक निर्भय बनावेत अशी त्यांची आकांक्षा होती. ब्रिटिशांकडून संस्थानिक जहागिरदारांना व त्यांच्याकडून प्रजेला म्हणजेच सबलांकडून दुर्बलांकडे सत्तेचे क्रमाने संक्रमण व्हावे एवढी शाहू महाराजांची विस्तृत व व्यापक दृष्टी होती. 'अधिकारदान थैली' त ही व्यापकता आहे.



## सतरा

# अधिकारदान थैली



१९०३ सालच्या जून महिन्याच्या १७ तारखेच्या खलित्यान्वये ना. लॉर्ड नॉर्थकोट यांनी आमच्या मांडलिक जहागिरदारांविषयीचे अवशिष्ट सर्व अधिकार आम्हाला परत दिले. ही गोष्ट तुम्हांपैकी पुष्कळांना माहीतच आहे यापूर्वी हे अधिकार पोलिटिकल एजंटना होते. परंतु आता क्रिमिनल प्रोसिजर कोडान्वये हायकोर्टाला जे फौजदारी अधिकार असतात, ते चालविण्याचा आमचा हक्क आहे. तथापि आमचे काही मांडलिक जहागिरदार विद्येने व बुद्धिमत्तेने 'अधिकारदान थैली' च्या अर्थव्याप्तीपेक्षा काहीशा अधिक, अधिकार स्वातंत्र्याला पात्र झाले आहेत; असे वाटल्यावरून त्यांच्याशी उदारबुद्धीने वागण्याचा आमचा इरादा आहे. म्हणून त्यांचे वरिष्ठ सरकार व त्यांच्या सत्तेचे उगमस्थान या नात्याने, 'अधिकारदान थैली' च्या आधारे त्यांना प्राप्त न झालेले सर्व अवशिष्ट अधिकार आम्हाला आहेत. तथापि त्यांना अधिकारसूत्र प्राप्त झाल्यापासून अपील अर्ज दाखल करून घेणे, त्यांच्या कोर्टांनी केलेल्या ठरावांची तपासणी करणे, अहवाल मागविणे, त्यांच्या खालच्या कोर्टातील न्यायाधीशांची नेमणूक करणे, त्यांच्या कोर्टातील कज्जांचे वर्ग करणे अशाप्रकारचे हक्क, जे कायद्याने कोर्टाला आहेत; त्याची अंमलबजावणी करण्याचे प्रसंग सहसा आजपर्यंत आमच्यावर आले नाहीत. ही गोष्ट लक्षात घेऊन व विशाळगड, बावडा, कागल ( मोठी पाती ) व इचलकरंजीचे जहागिरदार आपल्या बुद्धिमत्ता व उच्च शिक्षणाने, खालच्या कोर्टावर नेहमी बारीक नजर ठेवावी लागते, तीतून त्यांना काही अंशी मुक्त करण्यास पात्र झाले आहेत. अशा प्रकारची बारीक नजर न ठेवल्यापासून त्यांच्या हद्दीतील लोकांना अन्याय झाल्याचे दिसून आले नाही; या गोष्टीकडे लक्ष पुरवून, आमच्या सत्तेचा उपयोग करण्याचा प्रसंग न येईपर्यंत, ते आजपर्यंत अनुभवीत असलेली उपरीनिर्दिष्ट सवलत अशीच पुढे, त्यांच्यापुरती चाल ठेवण्याचा आमचा हेतू जाहीर करीत आहोत. त्यांच्या सुनियंत्रित कारभाराविषयी आम्ही जो हा विश्वास दाखवीत आहोत, त्यांचा ते दुरुपयोग करणार नाहीत, अशी आमची खात्री आह. सन १८६२ च्या तहान्वये मांडलिक जहागिरदारांसंबंधी जे अधिकार दिले

नव्हते, ते अधिकार आम्हास परत देऊन आमच्या संस्थानच्या सुधारलेल्या राज्यकारभाराचे गुण उदारबुद्धीने मुंबई सरकारने जाणले, त्याबद्दल आमच्या कृतज्ञतेच्या भावना, याप्रसंगी व्यक्त करण्यासही आम्हाला मोठा आनंद होतो. लॉर्ड नॉर्थकोर्टच्या शब्दातच सांगावयाचे म्हणजे, " कोल्हापूर संस्थानला पूर्वीचा दर्जा प्राप्त करून देण्याच्या कामी या गोष्टीने मोठी मजल मारली. " असे आम्हीही समजतो.

अठरा

# कृतज्ञतेचे वैभव



शाहू महाराजांनी 'कृतज्ञतेचे वैभव' मध्ये, व्हिक्टोरिया राणीच्या पुतळ्याच्या अनावरणाच्या निमित्ताने, लोकाभिमुख शासन देऊ पहाणाऱ्या महाराणीच्या अधिसत्तेबद्दल कृतज्ञता प्रकट केली आहे. महाराजांसारख्या लोकाभिमुख शासन देणाऱ्या एका अधिपतीने सर्वसाधारण त्या प्रकारचे काम करणाऱ्या दुसऱ्या राज्यकर्त्याबद्दल कृतज्ञता व्यक्त करावी हे मनाच्या सुजनतेचे आणि संस्कृतीमधील भलेपणाचे लक्षण आहे.

शाहू महाराज ब्रिटिशांचे मांडलिक, साहजिकच 'डावपेच' म्हणून अशी कृतज्ञता व्यक्त केली आहे असे समजणे अयुक्त आहे. मूलतःच मनाच्या गाभ्यात गुंतलेल्या भलेपणाचे ते प्रतिक आहे.

यादृष्टीने, राजर्षींच्या "प्रजेच्या कल्याणाप्रित्यर्थ सुसंस्कृत राज्यपद्धतीची व निरलस परिश्रमाची जर कोठे संस्थानात स्पष्ट चिन्हे दिसत असतील..." या विधानामधील 'निरलस परिश्रमाने, प्रजेच्या कल्याणार्थ उभी करावयाची सुसंस्कृत राज्यपद्धती.' या शब्दसंहतीमधील गाभ्यासंबंधीची, महाराजांची ओढ स्पष्ट दिसते.

शाहू महाराज, 'काय केले? काय करीत आहेत? आणि कुठे पोचायचे आहे?' हे



मुंबई : २१ मार्च, १९०८
मुंबईच्या टाऊन हॉलमध्ये, गव्हर्नर जॉर्ज क्लार्क यांच्या हस्ते झालेल्या व्हिक्टोरिया राणीच्या पुतळ्याच्या अनावरणप्रसंगी, शाहू महाराजांनी दिलेले प्रास्ताविक भाषण

प्रतिपादन करण्यासाठी हरेक संधीचा—मग ती लहानमोठी कोणतीही असो – लाभ उठवितात.

वक्तृत्वाला नव्हे तर कर्तृत्वाला बहर आणणारी राजर्षी शाहूंची ' सरंजामी लोकशाही ' मुक्तपणे संधीची देवाणघेवाण करताना आढळते.

७२

अठरा

# कृतज्ञतेचे वैभव



माजी सम्राज्ञीच्या ज्या पुतळ्याचे अनावरण करण्यासाठी आज आपण माझ्या शब्दाला मान देऊन येथे जमला आहात, तो पुतळा सम्राज्ञीवरील माझ्या भक्तीचे व स्वामीनिष्ठेचे अत्यंत साधे असे चिन्ह आहे; हे मी सांगावयास पाहिजे असे नाही. हे अल्पसे स्मारक तयार होऊन बरेच दिवस झाले. परंतु त्याचा अनावरण समारंभ मुंबईच्या गव्हर्नरसाहेबांच्या हातून व्हावा या हेतूने योग्य संधीची मी इतके दिवस वाट पाहात होतो. आपल्या पूर्वीचे गव्हर्नर लॉर्ड लॅमिंग्टन यांनी हे कार्य पार पाडण्याचे आम्हास अभिवचन दिले होते. परंतु इंग्लंडला त्यांचे एकाएकी प्रयाण झाल्यामुळे हा योग पुढे लोटणे भाग पडले. आपल्या येथील आगमनाचा फायदा घेऊन हे कार्य सिद्धीस नेताना मला मोठा आनंद होत आहे. माझ्या छोट्याशा संस्थानची नैतिक व आधिभौतिक प्रगती ही सम्राज्ञी सत्तारूढ होऊन एक वर्ष होते न होते तोच, चक्रवर्तीचे पूर्ण अधिकार उपभोगीत असलेले या संस्थानचे शेवटचे नृपती स्वर्गवासी झाले; अर्थातच त्यांच्या मृत्यूमुळे ब्रिटिशांची खास राजनीती प्रस्थापित झाली. त्यांच्यामागून आलेले नृपती अकाली कालवश झाल्यामुळे चवथे शिवाजी महाराज उर्फ बाबासाहेब महाराज यांच्या अल्पकालीन कारकीर्दीखेरीज करून, हे संस्थान सन १८९४ पर्यंत ब्रिटिश नेतृत्वाखाली राहिले. यावर्षी माझ्या हाती अधिकारसूत्रे देण्यात आली. प्रजेच्या कल्याणाप्रित्यर्थ सुसंस्कृत राज्यपद्धतीची व निरलस परिश्रमाची जर कोठे संस्थानात स्पष्ट चिन्हे दिसत असतील तर त्याचे सर्व श्रेय कार्यक्षम ब्रिटिश अधिकाऱ्यांच्या नेतृत्वाखाली, वरील मुदतीत जे उत्कृष्ट कार्य झाले त्यालाच दिले पाहिजे. या कार्याची जाणीव मला व माझ्या प्रजाजनांना नाही, असे नाही.

सम्राज्ञीच्या कारकीर्दीच्या ' डायमंड ज्युबिली ' च्या प्रसंगी दोन संस्था स्थापन झाल्या. या दोन संस्था म्हटल्या म्हणजे ' कोल्हापूर इन्फन्ट्री हॉस्पिटल ' आणि ' महारोग्यांचा

आश्रम ' या होत. यांचे ध्येय, रुग्ण क्लेशनिवारण करणे हे होय. माजी सम्राज्ञीच्या अंगी विशेष प्रसिद्ध व कौतुकास्पद असा जर कोणता गुण असेल तर, तो गरीब व आर्त लोकांसंबंधी त्यांच्याठायी वसत असलेला कळवळा व त्यांचे दुःखनिवारण करण्यासाठी त्यांचा एकसारखा प्रयत्न हा होय. स्त्रीजनांतील दैवी अंशनिदर्शक असा स्त्रीजनोचित गुण म्हणजे कोमल हृदयत्व. त्यांचे या संस्था यथार्थ स्मारक आहेत. त्यांच्या निधनानंतर गरीब व कर्जबाजारी शेतकरी लोकांना मदत करण्यासाठी म्हणून माझ्या प्रजाजनांनी एक फंड गोळा केला. पुष्कळ कर्जबाजारी इस्टेटींना याचा फायदा मिळाला आहे. मराठ्यांकरिता म्हणून ' व्हिक्टोरिया बोर्डिंग इन्स्टिटयूशन ' नावाची संस्था त्यांच्याच स्मरणार्थ सुरू करण्यात आली. माझ्या प्रजाजनांतील मागासलेल्या वर्गापैकी, एका वर्गाचे हितसंवर्धन हे या संस्थेचे ध्येय आहे. येथे मराठ्यांची मुले, राजाराम हायस्कूल व कॉलेज यात अध्ययन करीत असताना त्यांचे पालनपोषण केले जाते.

ही संस्था यशस्वी झाली आहे. या संस्थेच्याअभावी ज्यांच्या शिक्षणाची हेळसांड झाली असती, अशा पुष्कळ तरुण मराठ्यांचे लक्ष या संस्थेकडे वेधले. आतापर्यन्त जी यशप्राप्ती झाली आहे, तिचा या संस्थेला मोठा अभिमान वाटत आहे. सम्राज्ञीच्या ज्ञानविषयक वा सहृदयत्वद्योतक उदात्त गुणांविषयी मी व माझे प्रजाजन यांच्याठायी वसत असलेला आदर व्यक्त करण्यासाठी अशा प्रकारचे विविध मार्ग आम्ही स्वीकारले आहेत. आपल्या विस्तीर्ण साम्राज्यापेक्षा व सम्राटपदापेक्षाही अधिक मौल्यवान ठेवा म्हणून हे गुण आपल्या पश्चात् आपल्या संततीला त्या ठेवून गेल्या आहेत. आमचे पुण्यशील प्रभू बादशहा, [युवराज या नात्याने, हिंदुस्थानात झालेल्या आगमनाच्या स्मरणार्थ उभारण्यात आलेली 'अल्बर्ट एडवर्ड हॉस्पिटल' नावाची भव्य इमारत (सध्याचे छत्रपती प्रमिलाराजे हॉस्पिटल] त्यांनी जगात ' शांतता-प्रस्थापक ' असे सुंदर नाव यापूर्वीच कमाविले आहे. त्यांचे पुत्र युवराज, हे आपल्या ठायी वसत असलेल्या हिंदी लोकांविषयीची खरी कळकळ व आपला मनोवेधक साधेपणा यामुळे, हिंदुस्थानातील अधिकारी वर्गास त्यांनी पाठविलेला प्रख्यात संदेश प्रत्येक हिंदी मनुष्याच्या अंतःकरणावर खोदण्यासारखा आहे. "हिंदुस्थानला आवश्यक अशी जर कोणती गोष्ट असेल तर ती सहानुभूती होय," असे युवराजांनी उद्गार काढले होते.

# एकोणीस

## विनंती ऐसाजे



शाहू महाराजांना वेळोवेळी जनतेने प्रेमाने मानपत्रे दिली : त्यात आपल्या जीवाभावाच्या राजासंबंधी अत्यंत श्रद्धेची भावना होती तशीच ती, महाराज लोकांसाठी करीत असलेल्या हितवर्धक कार्यांची विनम्रभावे दिलेली पावतीही होती.

या निमित्ताने शाहू महाराजांना, आपण करीत असलेल्या कार्यामागची भूमिका वेळोवेळी स्पष्ट करण्यास संधी लाभली आहे. चातुर्याने ती त्यांनी घेतली आहे. शाहू महाराजांना दिल्या गेलेल्या मानपत्रांतूनही, क्वचित् असे काही मुद्दे उपस्थित केले गेले आहेत की, महाराजांना आपली भूमिका स्पष्टपणे मांडणे इष्ट वाटले आहे.



१. पुणे : सप्टेंबर, १८९४

' पुणे सार्वजनिक सभे'ने, हिराबागेतील मेजवानीनंतर दिलेल्या मानपत्रास, शाहू महाराजांनी केलेले उत्तरादाखल भाषण

२. कोल्हापूर : २ सप्टेंबर, १९०२

शाहू महाराज १९०२ मध्ये, पहिला परदेश दौरा आटोपून मायदेशी परतल्यावर कोल्हापूरकरांनी दिलेल्या मानपत्रास महाराजांनी दिलेले उत्तर

३. कोल्हापूर : सप्टेंबर, १९०२

शाहू महाराजांच्या परदेश दौऱ्याच्या निमित्ताने, ' राजारामीयन क्लब'ने दिलेल्या मानपत्रास शाहूमहाराजांनी दिलेले उत्तर

४. कोल्हापूर : सप्टेंबर, १९०२

शाहूमहाराज इंग्लंडहून परत आल्यानंतर जनतेच्या वतीने देण्यात आलेल्या मानपत्र अर्पणप्रसंगी राजर्षींनी सत्कारास दिलेले उत्तर

अत्यंत सावध महाराजांनी, मानपत्रातील सूचकतेइतक्याच सावध परखडपणाने, जरूर त्या मुद्द्यांचे निराकरण करण्याचा प्रयत्न केला आहे. हितसंबंधियांचा हेतूपुरस्सर प्रचार ही, नित्याची बाब असली तरी तशा प्रचारास बळी पडणाऱ्या सर्वसाधारण जनतेच्या मनात किल्मिष उरता कामा नये, अंती उभ्या राहाणाऱ्या कार्याच्या दृष्टीने त्यात हानी असते; म्हणून राजर्षीनी निःसंदिग्धपणे, अशा चोरवाटांना मोकळ्या मैदानात घेतले आहे.

त्यादृष्टीने सार्वजनिक सभेच्या मानपत्रातील "आपल्या प्रजाजनांचे सौख्य व प्रगती हे आपले पहिले कर्तव्य आहे यात तिळमात्र शंका नाही. तथापि सामान्यपणे आपणा सर्वांच्या मातृभूमीचा व विशेषतः महाराष्ट्राच्या अभ्युदयासाठी प्रयत्न करणे हेही आपले कर्तव्य आहे. आपल्या संस्थानच्या प्रजाजनासंबंधाने असलेल्या आपल्या कर्तव्याच्या खालोखाल हे महत्त्वाचे कर्तव्य आहे." या हेत्वारोपी सदुपदेशाला महाराजांनी 'माझ्या प्रजाजनांच्या कल्याणाखेरीज अखिल महाराष्ट्रातील लोकांच्या कल्याणाची मी काळजी बाळगावी, असे आपण सांगण्याची मुळीच जरूरी नव्हती.' असे जोषाने उत्तर दिले आहे: आणि "दयाळू ब्रिटिश सरकारच्या अंमलाखाली सर्व घटकावयव इतके संलग्न झालेले आहेत की, सर्वांची सारखीच प्रगती झाल्याखेरीज एका विशिष्ट अवयवाची प्रगती होणे अशक्य आहे." असा, कुणीही न सांगता राजर्षी, स्वतः स्वयंप्रेरणेने आचरणात आणत असलेला सर्वसिद्ध सिद्धांत, संबंधितांनी समजून घ्यावा, म्हणून ते हे आवर्जून नमूद करीत आहेत.

त्याचप्रमाणे 'राजारामीयन क्लब' च्या मानपत्रातील, जातिपंथ-भेद भावरहित छद्मी उल्लेखाचा परामर्श घेताना महाराजांनी "ज्ञानाच्या सामान्य झऱ्याचे पाणी आम्ही पीत असल्यामुळे, उदय पावलेल्या नवीन शैक्षणिक भ्रातृत्वाच्या जोरावर जुने जातिभेद लय पावत आहेत, असे जे आपण म्हटले, ते मला अतिशय पटले." असे छद्मीपणाला निरूत्तर करणारे उद्गार काढले आहेत. त्यामधील 'ज्ञानाच्या सामान्य झऱ्याचे पाणी' व 'ते मला अतिशय पटले' यासारख्या विधानातील 'सामान्य' आणि 'अतिशय' वरील जोर, राजर्षीच्या अचूक हेरण्याच्या दृष्टीचा प्रत्यय आणून देतो.

शाहू महाराज एकाचवेळी अनेक आघाड्यांवर लढत आहेत. त्यांना तसे लढणे जरूरच झाले आहे.

ब्रिटिश शासन, सनातनी हेकट वर्ग, भोळ्याभाबड्या अज्ञ जनतेचे अज्ञान–दारिद्र्य आणि मागासलेपणा अशा विविध पातळ्यांवर ही लढाई सुरू आहे. ती जिंकायची,

संपूर्णांशाने जिंकायची असा महाराजांचा निर्धार आहे. त्यादृष्टीने समाजाच्या सर्व क्षेत्रातील श्रेष्ठत्वाच्या सामाजिक अपप्रवृत्तीविरूद्ध दंड थोपटून ते उभे आहत. सामाजिक न्याय भूमिकेवर सामूहिक समाजजीवन आणण्यासाठी, जे जे चांगले, ते ते स्वीकारण्याची दृष्टी आहे. त्यात चिंतनाचा भाग अगोदरचा, पण क्रम मात्र कार्य आधी आणि त्याअंगाने चिंतनाचे प्रतिपादन असे घडले आहे.

त्या संदर्भात, सामान्यांबरोबरच, सामान्यांसाठी सापडेल तेथून चांगले उचलण्याची, त्याला प्रतिष्ठित करण्याची महाराजांची भूमिका खास रीतीची आहे. इंग्लंडहून परत आल्यावर जनतेने प्रेमाने दिलेल्या मानपत्राला उत्तर देताना, " इंग्लंडमधील सार्वजनिक भव्य इमारती, सुंदर पटांगणे व बागबगीचे, भूगत रेल्वे व बोगदे, भव्य पूल, मोठमोठे कारखाने, गर्जना करणाऱ्या आगगाड्या व वहाने" वगैरेसारख्या भौतिक गोष्टींच्या उल्लेखाबरोबरच इंग्रज माणसातील " कडक शिस्त, व्यवहारयोग्य गुण, चोख प्रामाणिकपणा, सत्याची व न्यायाची आवड, स्वार्थत्यागपूर्वक सार्वजनिक कार्य करण्याची हौस, पराकाष्ठेची चिकाटी व परक्या लोकांशी पराकाष्ठेचे दाक्षिण्य" ह्या राष्ट्रवर्धक सद्‌गुणांचा आवर्जून उल्लेख, तोही क्रमाने पहिला; यात 'राष्ट्राला काय हवे असते'? 'ते कसे बांधायचे असते ?' आणि, जे असते, घडते, त्यात चिरकालिक महत्त्व कशास असते ?' यासंबंधीचा दूर पल्ल्याचा विचार आहे. समाजजीवन सर्व अंगांनी कसे फुलते आणि त्यासाठी काय करावे लागते, त्याचा हा इसार आहे.

'विनंती ऐसाजे' मधून जाणवते ते हे की, नदी वाहात असते. अवतीभोवतीच्या लोकांचे जीवन समृद्ध होत जाते. अमक्याचेच जीवन समृद्ध व्हावे आणि अमक्याचे होऊ नये असा काही नदीचा आग्रह नसतो. धरताही येत नाही. शाहू महाराजांचे जीवन, असेच अनेकांना फुलविण्यात तृप्त होते. म्हणूनच या 'केशराच्या मळ्याला', कृतार्थतेचे लेणे लाभले.

एकोणीस

# विनंती ऐकावी



एक

---

## पुणे सार्वजनिक सभा

माझ्या प्रजाजनांच्या कल्याणाखेरीज अखिल महाराष्ट्रातील लोकांच्या कल्याणाची मी काळजी बाळगावी, असे आपण सांगण्याची मुळीच जरूरी नव्हती. दयाळू ब्रिटिश सरकारच्या अंमलाखाली साम्राज्याचे सर्व घटकावयव इतके संलग्न झालेले आहेत की, सर्वांची सारखीच प्रगती झाल्याखेरीज एका विशिष्ट अवयवाची प्रगती होणे अशक्य आहे. शिवाय महाराष्ट्रातील लोकांना आजपर्यन्त ज्या सामान्य बंधनांनी एकमेकांशी जखडून टाकले आहे तीच बंधने त्यांच्यांत परस्पर सहानुभूती कायम राखतील, याबद्दल खात्री करण्यास पुरेशी आहेत.

दोन

---

## कोल्हापूर मराठा सभा

या थोड्याशा अवधीत माझ्या मनावर जो कायमचा परिणाम झाला; त्यामुळे माझी ब्रिटिश सिंहासनाविषयी कृतज्ञता व सम्राट सातवे एडवर्ड यांच्याविषयीचे माझे प्रेम व निष्ठा द्विगुणित झाली आहेत. बादशहाशी प्रत्यक्ष मुलाखतीचा बहुमान मला मिळाला. बादशहाच्या दयाळू छत्राखाली सुखसमृद्धीची वृद्धी होऊन भाग्यवान इंग्लंडच्या अनुग्रहांचा फायदा अखिल ब्रिटिश साम्राज्याला मिळेल.

मराठ्यांची अलिकडे जी प्रगती होत आहे; तिचे मी मोठ्या उत्सुकतेने निरीक्षण केले. आपली बौद्धिक जागृती करून घेण्याची या जातींना जी स्तुत्य स्फूर्ती उत्पन्न झाली आहे. तिचेच 'मराठा शिक्षण संस्था,' हे एक नामी फळ आहे; यात शंका नाही. इतिहासामध्ये गतकालीन मराठ्यांची प्रतापशाली कृत्ये नमूद आहेत. तेव्हा सभ्य गृहस्थहो ! तुम्ही आखलेल्या मार्गांनी जर धीमेपणाने प्रगती कराल तर तुम्हाला पुढे उत्तम दिवस प्राप्त होतील याची मी आपणास ग्वाही देतो.

तीन

## राजारामीयन क्लब

ज्ञानाच्या सामान्य झऱ्याचे पाणी पीत असल्यामुळे, उदय पावलेल्या नवीन शैक्षणिक भ्रातृत्वाच्या जोरावर जुने जातिभेद लय पावत आहेत, असे जे आपण म्हटले; ते मला अतिशय पटले. शिक्षणाचे महत्त्व समजून घेऊन विस्तृत प्रमाणावर शिक्षणाचा प्रसार झाल्याखेरीज, अशा प्रकारचे भेदभाव नष्ट होणार नाहीत. आणि हाच हेतू साध्य करण्यासाठी माझा सतत प्रयत्न आहे. निरनिराळ्या जातींच्या शैक्षणिक प्रगतीत जोपर्यन्त अशा प्रकारचे महदन्तर आहे, तोपर्यंत पुष्कळ दिवसाचे भेदभाव नष्ट करण्याचे, सर्व औपचारिक प्रयत्न निष्फळ होणार; म्हणून त्या दिशेने मी ज्या उपायांचे अवलंबन केले आहे, त्याकडे अशा दृष्टीने आपण पहाल; अशी माझी खात्री आहे.

चार

## कोल्हापूर जनता सभा

खरोखरच इंग्लंडमध्ये माझे स्वागत मोठ्या प्रेमाने करण्यात आले. इंग्लंडमध्ये मी ज्या ज्या ठिकाणी गेलो त्या त्या ठिकाणी माझ्याशी लोकांकडून जे एकसारखे व प्रेमाचे वर्तन

झाले, त्याबद्दलची कृतज्ञता मला यथार्थपणे व्यक्त करता येत नाही; मला त्याची शंका वाटते. केंब्रिजच्या नामांकित विश्वविद्यालयाने व तत्सदृश सुप्रसिद्ध संस्थांनी माझा जो सन्मान केला, त्याची महती मला अतिशय वाटते. परंतु तुम्ही आपल्या मानपत्रात ज्यांना यथार्थ महत्त्वाचे स्थान दिले आहे, असे प्रख्यात मुत्सद्दी लॉर्ड जॉर्ज हॅमिल्टन यांनी माझा जो मोठा सत्कार केला; त्याचे महत्त्व मी अतिशय मानतो. या सत्काराचा मला खरोखरच मोठा अभिमान वाटतो.

ज्यांच्या मृत्यूमुळे सर्वांना हळहळ वाटली असे माझे प्रिय वडिल, कोल्हापूरचे माजी रीजंटसाहेब यांची शेवटची इच्छा, इंग्लंडला प्रयाण करून मला पूर्ण करता आली ही गोष्ट कोणत्याही प्रकारे कमी आल्हाददायक नाही. येथील पुष्कळशा सार्वजनिक संस्था मी प्रत्यक्ष पाहिल्या व तेथील सार्वजनिक व राजकीय सभांना हजर राहण्याची संधी मला मिळाली. या सर्व गोष्टीमुळे इंग्लिश लोकांविषयी मला अतिशय आदर व कौतुक वाटते. जेथे जेथे तुम्ही दृष्टी फेकाल तेथे तेथे कडक शिस्त, व्यवहारयोग्य गुण, चोख प्रामाणिकपणा, सत्याची व न्यायाची आवड, स्वार्थत्यागपूर्वक सार्वजनिक कार्य करण्याची हौस, पराकाष्ठेची चिकाटी व परक्या लोकांशी पराकाष्ठेचे दाक्षिण्य हे गुण दृष्टोत्पत्तीस आल्याखेरीज राहणार नाहीत. हे सद्‌गुण इंग्लिश गृहस्थांच्या सद्वर्तनाचे आधारस्तंभ असून, इंग्लंडने जगात जे विलक्षण यश संपादिले आहे, त्याचे ते मर्मनिदर्शक होत.

इंग्लंडमधील सार्वजनिक भव्य इमारती, सुंदर पटांगणे व बागबगीचे, भूगत रेल्वे व बोगदे, भव्य पूल, मोठमोठे कारखाने, गर्जना करणाऱ्या आगगाड्या व वाहने, भव्य पदार्थसंग्रहालयात गोळा करून ठेवलेली संपत्ती व कित्येक शतकांच्या कुबेरांनी व हॉवर्ड विल्बर फोर्ससारख्या गृहस्थांनी संस्थापिलेल्या परोपकारी संस्थांनी राष्ट्राला मेहेरनजर केलेल्या कलाकुसरीचा व इतर विस्मयजनक गोष्टींचा संग्रह ही, या सद्‌गुणांची दृश्य रूपे होत. माझ्या मनावर जे परिणाम घडले व माझ्या मनात ज्या भावना उद्‌भूत झाल्या, त्यांचे वर्णन; या छोटयाशा उत्तरात मी अंशत: देखील करू शकत नाही. इंग्लंडमध्ये मला आणखी थोडे राहता आले असते तर बरे झाले असते असे मला वाटते. परंतु माझ्या संस्थानात डोकावू पाहणाऱ्या दुष्काळाच्या व प्लेगच्या भीतीने मला अधिक दिवस तेथे राहता आले नाही, तथापि या दोन्ही आपदा क्षणिक का होईना दूर झाल्या आहेत. हल्लीच्या आनंदाच्या प्रसंगास भविष्यकाळाच्या चिंतेचे गालबोट लागले नाही, हे मी मोठे भाग्य समजतो.

वीस

# लोकसेवेचा शुभारंभ



राजर्षी शाहू महाराजांनी, आगगाडीच्या कामाच्या बांधणीच्या प्रारंभाच्या निमित्तान, वयाच्या चौदाव्या वर्षी केलेल्या ‘ लोकसेवेचा शुभारंभ ’ या भाषणात त्यांची लोकसेवेची तळमळ स्पष्ट रीतीने व्यक्त झाली आहे.

राजर्षींच्या दृष्टीने, लोकांच्या कामाच्या संबंधातील, आगगाडीचे काम तडीस जाण्याचा हा पहिलाच प्रसंग आहे; त्याचप्रमाणे लोकसमुदायांसमोर उभे राहून चार शब्द सांगणे हाही पहिलाच अनुभव आहे. त्यासंदर्भात ‘ जे थोडेबहुत शब्द बोलण्यास मला सुचविले आहेत ’ हे शाहू महाराजांचे सूचक उद्‌गार खूपच बोलके आहेत.

त्याचबरोबर ‘ माझ्या अल्पवयात कोल्हापूरचे कल्याण करण्याकरिता हरएक कृत्य केले जाईल. ’ हे राजर्षींनी गंभीरपणाने उच्चारलेले आश्वासन; राजर्षींना लाभलेले अल्पायुष्य आणि त्यामध्ये समाजजीवनाला गती देणारे, उभे केलेले पर्वतप्राय कार्य; हे सर्व; अनेक दृष्टींनी महत्त्वाचे आहे.



कोल्हापूर : ३ मे, १८८८

कोल्हापूर राज्य रेल्वे बांधणीच्या शुभारंभ समारंभप्रसंगी, युवराज शाहूनी उद्‌घाटक म्हणून, केलेले पहिले भाषण

वीस

# लोकसेवेचा शुभारंभ



सर्व लोकांच्या संबंधीचे काम करण्याचा हा माझा पहिलाच प्रसंग असून या कामी आपण सर्व मला मेहरबानीने मदत करीत आहात, याबद्दल मी आपले आभार मानतो. याहून, अधिक करणे मला योग्य दिसत नाही. जे थोडेबहुत शब्द बोलण्यास मला सुचविले आहेत, त्याच्याबाहेर मजकडून अधिक काही होईल अशी आशा आपल्या मनात येणार नाही असे मी समजतो.

हे आगगाडीचे काम तडीस गेल्याने माझ्या राज्याच्या संपत्तीची साधने वाढण्याच्या कामी ह्याचा फायदेशीर परिणाम होईल. माझी अशी उमेद आहे की, साहजिकरीतीने घडून येणाऱ्या क्रमाप्रमाणे आजपासून तीन वर्षांच्या आत हा आगगाडीचा रस्ता सुरू करण्याचे काम माझ्या हातून होईल.

आपण सर्व, लोककल्याणास झटणारे इंग्रज सरकारच्या आश्रयाखाली आहोत आणि आपणास माहीत आहे की, माझ्या अल्प वयात कोल्हापुरचे कल्याण करण्याकरिता हरएक कृत्य केले जाईल. हा आगगाडीचा रस्ता हे एक त्यापैकी ठळक उदाहरण होय असे मी जाणतो.



१

# शिक्षण



एक

---

**शिक्षण : स्वराज्यासाठी ! / ३.११**

या भाषणाचा प्रारंभ, राजर्षी शाहू छत्रपतींनी ' मिस्टर स्टॅन्डन, भगिनींनो व बंधूनो ' असा केला आहे.

मि. स्टॅडन हे खामगाव विभागातील ब्रिटिश अधिकारी. परिषदेसाठी खामगाव येथे आवर्जून उपस्थित राहिले होते.

बहुजनसमाजाच्या शिक्षणाविषयी तळमळ असलेले एक युरोपियन सद्‌ग्रहस्थ म्हणून स्टॅन्डन यांची ख्याती होती.

**वेरूळ** : देवगिरी जवळील, भोसले कुलाच्या पाटीलकीच्या वतनाचे गाव. मालोजीराजे भोसले यांचा उदय येथेच झाला.

**खासेसाहेब पवार** : देवास ( ज्युनियर ) संस्थानचे महाराजा. १९१६ सालच्या मराठा शिक्षण परिषदेचे अध्यक्ष. मराठ्यांच्या शिक्षणाविषयी तळमळ असलेले एक संस्थानिक

**छत्रपती शिवाजी व जातिनिर्मूलन :** छत्रपती शिवाजी महाराज गो–ब्राह्मण प्रतिपालक तर खरेच; परंतु त्याहीपेक्षा त्यांचे महत्त्वपूर्ण कार्य म्हणजे जातिनिर्मूलनासाठी त्यांनी केलेले प्रयत्न : फलटणच्या सरदार निंबाळकरांनी मुस्लिम धर्म स्वीकारला होता. छत्रपतींनी त्यांना पुन्हा हिंदू करून घेतले. खेरीज स्वत:ची मुलगी देऊन त्यास सन्मानाने क्षत्रियकुलात प्रवेश दिला.

**राजा अकबर** : मोगल बादशहा. हिंदु–मुस्लिम ऐक्याचा प्रयत्न करणारा पहिला इस्लामी राज्यकर्ता. त्याने जोधाबाई नामक एका राजपूत स्त्रीशी लग्न केले. तिच्या इच्छेप्रमाणे तिला शेवटपर्यन्त हिंदूच राहू दिले. तिच्या सूर्यव्रतासाठी (अर्घ्य देणे) लाखो रूपये खर्च केले. शिवाजी आणि राजा अकबर यांचा आदर्श राजर्षी शाहूंनी मनोभावे पाळला, वाढविला. राजर्षींनी सर्वच जातींशी रोटीसंबंध ठेवले. बेटीव्यवहाराचा पुरस्कार केला.

दोन

---

## रिलिजस क्युरॉकसी / १२.२५

**उदाजीराव पोवार** : राजपूत घराणे. धारचे महाराजा. उदारमतवादी मराठा राजा. मराठ्यांच्या शिक्षणासाठी प्रयत्न. नाशिक येथील 'मराठा विद्यार्थी वसतिगृहा' साठी देणगी दिली. अशा अनेक शैक्षणिक संस्थांना व विद्यार्थ्यांना मदत केली.

**रावसाहेब थोरात–पाटील** : मूळ गाव वणी. नासिक येथील 'मराठा बोर्डिंग' चे संस्थापक : कार्यकर्ते. 'सत्यशोधक समाजा' चे पुढारी. अत्यंत निरलस, स्वार्थत्यागपूर्वक कार्य करणारे म्हणून ख्याती. सत्यप्रेमी, कर्तव्यनिष्ठ मराठा पाटील.

**बाबा मोरे–पाटील** : मूळ गाव पिंपळगाव बसवंत (जिल्हा : नासिक), तेथील पाटीलकीचे वतन यांचेच आहे. मराठा बोर्डिंग्ज्चे कार्यकर्ते. 'सत्यशोधक समाजा' पासून स्फूर्ती घेऊन काम.

**'लोकसंग्रह' मासिकाचे एडिटर** : पंत पराडकर, दा. वि. गोखले : राष्ट्रीय पक्षाचे नवे दैनिक, सन १९१९ मध्ये पुण्यात सुरू झाले. 'संदेश' मधील हल्ल्यांना तोंड देण्यासाठी उपयोग.

**मार्टिन ल्यूथर** : ख्रिस्ती धर्मसुधारक. मध्ययुगात पोपच्या सत्तेविरुद्ध बंड करणारा समाजसुधारक. यांच्या प्रेरणेने 'ख्रिश्चन प्रॉटेस्टंट पंथा' ची निर्मिती झाली.

**'मदर ऑफ बोर्डिंग हाऊसेस्'** ( Mother of Boarding Houses ) करवीर नगरीला राजर्षींनी लावलेले एक विशेषण. करवीर नगरी म्हणजे बोर्डिंग्ज्‌ची जननीच. येथे राजर्षींनी मराठा, जैन, लिंगायत, सारस्वत, मुसलमान, दैवज्ञ, पांचाळ, शिंपी, कायस्थ, प्रभू, हरिजन या सर्वांसाठी बोर्डिंगे सुरू करून दिली. इतकी 'बोर्डिंग्ज' त्यावेळी तरी भारतातील दुसऱ्या कोणत्याही एका शहरी नव्हती.

'मदर ऑफ प्रार्लमेन्ट्स्' ( Mother of Parliaments ) प्रमाणे कोल्हापूर नगरी 'मदर ऑफ बोर्डिंग हाऊसेस' व्हावी हे शाहू छत्रपतींचे स्वप्न होते. त्यानी ते वास्तवात आणले.

**'जातवार प्रतिनिधित्व'** : ( Communal Representation ) : सर्व जातीच्या लोकांची सुधारणा होऊन सामाजिक, राजकीय, औद्योगिक, शिक्षणविषयक व सरकारी नोकरी ह्या बाबतीत आपली जबाबदारी पार पाडण्याचे सामर्थ्य त्यांच्यात येण्यासाठी काही काळ विशेष सवलतींची राजर्षींनी मागणी केली. ते 'जातवार प्रतिनिधित्व' होय. यासाठी नेहमीच त्यांनी ब्रिटिश सरकारकडे हट्ट धरलेला आढळतो. आपल्या संस्थानात राजर्षींनी असे प्रतिनिधित्व देऊनही टाकले होते.

**'केसरी' वगैरे जहाल पत्रे** : पुण्यातील जहाल पक्षाच्या पुढाऱ्यांनी राजर्षी शाहूंच्या सामाजिक सुधारणांना सतत विरोध केला. त्यामध्ये 'केसरी', 'लोकसंग्रह' यांचा अग्रक्रम होता. तशीच कोल्हापूर–पुणे येथून निघणारी 'ग्रंथमाला' व 'समर्थ' ही पत्रेही राजर्षींच्या कार्यावर टीका करीत.

**'ब्राह्मण ब्युरॉक्रसी'** : भारतातील ब्राह्मणवर्ग विशेषत: दक्षिणेतील महाराष्ट्र व मद्रास इलाख्यातील ब्राह्मणवर्ग बहुजन समाजावर धार्मिक वर्चस्व प्रस्थापित करून हजारो वर्षे सामान्य माणसांना लुबाडीत आला. ह्या ब्राह्मणी वर्चस्वाविरुद्ध बहुजनसमाजात जागृती करण्याचे लोकहितवादी, म. फुले, राजर्षी शाहू वगैरेंनी प्रयत्न केले. परंतु सुशिक्षित ब्राह्मणी हुकूमशाहीने नेहमीच ह्या प्रयत्नांना हाणून पाडण्याचा प्रयत्न केला. राजर्षींनी त्यांच्या या वर्चस्वाला 'ब्राह्मण ब्युरॉक्रसी' असे संबोधले आहे. त्यामध्ये वर्षानुवर्षांचा अन्यायही अंतर्भूत आहे.

**आधी राजकीय सुधारणा की आधी सामाजिक सुधारणा ?** : 'भारतीय असंतोषाचे जनक' लो. टिळक व सुधारकाग्रणी गो. ग. आगरकर यांच्या काळचा एक

वाद. काय अगोदर व्हावे, काय अगोदर करावे ? ते तसे करणे का इष्ट; त्यामुळे काय परिणाम होईल; इत्यादी रणतुंबळ चर्चेचा, महाराष्ट्रावर दूरगामी परिणाम करणारा वैचारिक असा हा वादविषय

राजर्षी शाहूंच्या मते, आधी राजकीय की आधी सामाजिक सुधारणा, हा वाद उचित नाही. ''या सुधारणा स्वतंत्र नाहीत. या दोन सुधारणा राष्ट्रोन्नतीच्या गाड्याची दोन चाकेच होत. सामाजिक सुधारणेची तूर्त जरुरी नाही; असे प्रतिपादन ऐकू येते तेव्हा तेथे काही तरी पाणी मुरते आहे असे समजावे.'' याचा अर्थ ब्राह्मण हाच एकमेव सुशिक्षित वर्ग असल्याने सर्व राजकीय सत्तास्थाने त्यांच्याच हाती राहणार. म्हणून आधी राजकीय सुधारणांचा आग्रह असा सूर. पण दोन्ही रीतीच्या सुधारणा होणे इष्ट, त्या अभिन्न; अशी राजर्षींची दृष्टी. सुप्रसिद्ध विचारवंत श्री वसंत पळशीकर यांनी, या वादासंबंधी 'तो नेतृत्वाच्या उभारणीचा परिणाम होता ' असे स. प्र. पत्रिकेतील आपल्या लेखात म्हटले आहे.

तीन

---

## हत्तीचे बळ / २६.३१

हुबळी ( कर्नाटक राज्य ) येथे कर्नाटक ब्राह्मणेतर सामाजिक परिषदेचे अधिवेशन दोन दिवस चालले होते : २७ व २८ जुलै, १९२० पर्यंत.

**आय् सी. एस्. ची परीक्षा :** भारतातील सनदी नोकरांच्यासाठी ब्रिटिश सरकारने ठेवलेली परीक्षा. उत्तीर्ण असलेल्यांना सनदी नोकरीत प्रवेश मिळे. ही परीक्षा देण्यासाठी भारतीयांना इंग्लंडला जावे लागे. त्यामुळे सनदी नोकरीत फारच कमी भारतीयांना प्रवेश मिळे. आर्थिक वगैरे दृष्टीने त्रासही होई. म्हणून ही परीक्षा भारतातच व्हावी यासाठी बहुसंख्य ब्राह्मण सुशिक्षितांनी चळवळ उभारली होती. त्यासाठी मोठा फंडही उभारला होता. राजर्षींच्या मते, येथील सामान्य जनतेला साधे प्राथमिक शिक्षण मिळावे म्हणून कुणी बारीकसाही फंड उभारलेला नाही; हे असे का ? या मागचा मतलब काय ? — हा राजर्षींचा प्रश्न आहे.

**सर जॅक्सन व रॅंडसाहेब :** ब्रिटिश सनदी नोकर, पैकी जॅक्सन यांचा कान्हेरे यांनी नासिक येथे व रॅंड यांचा चाफेकर बंधूंनी पुणे येथे खून केला. राजर्षी शाहूंना, ' ब्राह्मण ब्युरॉक्रसी ' च्या नेत्यांनी, ' रॅंड व जॅक्सन यांच्यासारखीच तुमची अवस्था करू,' अशी धमकी दिली होती. या धमकीचे नेतृत्व प्रा. विजापूरकर यांजकडे होते. ( ' ग्रंथमाला ' : ऑक्टोबर, १९०१ व मे, १९०२ )

**हुबळी बाजारास आग :** हुबळी येथे ' कर्नाटक ब्राह्मणेतर सामाजिक परिषद ' भरली होती. ( २७ जुलै, १९२० ) राजर्षी शाहू या सभेचे अध्यक्ष होते. त्यावेळी रात्रीच हुबळीच्या बाजारास आग लावण्यात आली.

**श्री नंदीची मूर्ती फोडली :** हुबळीच्या कर्नाटक ब्राह्मणेतर सामाजिक परिषदेच्या वेळी तेथील नंदीची मूर्ती कोणीतरी फोडली.

या दोन्ही गोष्टींच्या पाठीमागे परिषदेस अडथळा आणणे हा हेतू होता; असा भावार्थ.

२

# समाज

चार

---

## सोशल रिफॉर्म + एकी = स्वराज्य / ३३·४०

**शाहू महाराजांचे वंशज ( पहिले शाहू ) :** पेशव्यांनी साताऱ्याच्या छत्रपतींना वार्षिक तनखा देऊन, केवळ नामधारी राजा केले. या गादीवरील छत्रपती प्रतापसिंहांना तर शिक्षणही घेता येत नव्हते. त्यांच्या क्षत्रियत्वाबद्दलही वाद माजला.

**सेंट कोलंबो स्कॉच मिशन :** इंग्रजांनी, ख्रिस्ती धर्मप्रचारक अशा अनेक मिशन्सना भारताचे दार मोकळे केले होते. त्यात ' स्कॉटिश मिशन ' व ' अमेरिकन मिशन '

प्रसिद्ध होती. त्यापैकी कित्येकांनी येथे दवाखाने खोलले. लोकांना शिक्षण देणाऱ्या शाळाही सुरू करून भारतीय लोकांना सज्ञान केले. सेवा आणि धर्मप्रसारही केला. मुंबई, नगर, मिरज, वाई ह्या ठिकाणची त्यांची कार्ये प्रसिद्ध होत. डॉ. वॉल्नेस्, डॉ.व्हेल व मिस् सदरलँड ही या मिशनमधील, निष्काम भावनेने लोकसेवा करणारी देव माणसे होत.

**मिसेस बिझांट** : डॉ. ॲनी बेझंट यांच्याकडेच थिऑसॉफिकल सोसायटीची सूत्र होती. ह्या पाश्चात्य विदुषीने भारतीय जनतेची निष्काम बुद्धीने सेवा केली. भारतीय माणसातील अस्मिता जागृत केली.

**पुण्यनगरीतील लोक** : पुण्यातील 'स्वराज्यवादी' पक्षाचे ब्राह्मण पुढारी; यांच्याविषयीचा हा उल्लेख आहे. पुण्यातून निघणाऱ्या ' केसरी ' पत्रात त्यावेळी राजर्षी शाहूंच्याविषयी बराच विपर्यस्त मजकूर छापून येई.

**वेठ बेरळा** : बलुतेदारांपैकी महार लोकांना सरकारी कामाबद्दल वतने देण्यात येत. त्या वतनातून तुटपुंजे उत्पन्न येई. अनेक पिढ्यांमध्ये ही वतने विभागल्याने त्यावर पोटही भरणे अशक्य असे. परंतु रूढी आणि काहीसे मोफत वतन याच्या लोभाने लोक त्याला चिटकून राहात. पण त्यामुळे लाचारी येई. आयुष्यातल्या उभारीच्या प्रेरणा आणि प्रवृत्ती नाश पावत. ही एक प्रकारची गुलामगिरीच होती.

पाच

---

## डोळस नेतृत्वाची गरज / ४१.४७

**माणगाव** : ( महाराष्ट्र राज्य ) येथे २२ मार्च, १९२० रोजी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या अध्यक्षतेखाली भरलेल्या महाराष्ट्रातील अस्पृश्यवर्गाच्या परिषदेत राजर्षी शाहूंनी, प्रमुख वक्ते म्हणून भाषण करताना, " शेवटी आंबेडकरांना माझी अशी विनंती आहे की, त्यांनी जाण्याच्या पूर्वी मेहरबानीने माझ्या रजपूतवाडीच्या कँपवर माझ्याबरोबर भोजनाला येण्याची तसदी घ्यावी. " असे डॉ. आंबेडकरांना भोजनाचे, आग्रहाचे निमंत्रण दिले आहे.

**मि. केशवराव** : ' प्रबोधन ' चे संपादक केशवराव ठाकरे. तिखट वाणी–लेखणीचे बहुजनसमाजातील सुधारणावादी विचारवंत. शिक्षणतज्ञ म्हणून राजर्षी त्यांचा सल्ला घेत असत. ' कोदंडाचा टणत्कार, ' ' माझी जीवनगाथा ' इत्यादी ग्रंथांचे कर्ते

**रा. ब. कालिचरण** : करवीर संस्थानातील एक दलित सेवक. मागासलेल्या लोकांबद्दल सहानुभूती बाळगणारे. त्यांना आत्मोन्नतीचा मार्ग दाखविणारे. राजर्षींचे एक सहकारी.

**बाबुराव हैं. यादव** : कोल्हापुरातील सामाजिक चळवळीत भाग घेणारे सद्‌गृहस्थ. त्यांनी राजर्षींच्या विविध विधायक प्रयत्नांना मनोभावे साथ दिली. ' बहुजनसमाजाची मुलूख मैदान.' म्हणून ख्याती. राजर्षींच्या अस्पृश्योद्धाराच्या कार्यावर प्रकाश टाकणारे ' गरिबांचा कैवारी ,' या पुस्तकाचे लेखक

**रजपूतवाडी** : कोल्हापुरजवळील चार–पाच मैलांवरील एक ठिकाण. तेथ राजर्षींचा कॅंप असे. लोकांना भेटण्याची जागा. सोनतळी कॅंप हे दुसरे नाव

सहा

---

## अंतिम राजकीय ध्येय / ४८.५१

दिल्ली (भारत) येथे अ. भा. अस्पृश्यता परिषदेचे तिसरे अधिवेशन दि. १४, १५ व १६ फेब्रुवारी, १९२२ या तीन दिवशी भरले होते. पहिल्या दोन दिवशी श्री गवई यांची अध्यक्षस्थानी योजना होती. दि. १६ फेब्रुवारी रोजी राजर्षी छत्रपती शाहू महाराज यांनी अध्यक्षस्थान भूषविले होते.

**प्रिन्स ऑफ वेल्स** : इंगलंडच्या राजघराण्यातील बादशहा पंचम जॉर्ज यांचे सुपुत्र. दि. १३ ते १६ फेब्रुवारी, १९२२ रोजी दिल्ली येथे त्यांचे वास्तव्य होते. त्याचवेळी तेथे ' अखिल भारतीय अस्पृश्य परिषदे'चे ३ रे अधिवेशन भरले होते.

**राष्ट्रीय परिषद** : पहिले महायुद्ध संपल्यानंतर इंग्लंड, अमेरिका या बड्या राष्ट्रांनी पुढाकार घेऊन जगातील निरनिराळ्या स्वतंत्र देशातील विविध प्रश्नांचा बिचार-विनियम करण्यासाठी, एक आंतरराष्ट्रीय परिषद स्थापन केली. तीच पुढे ' राष्ट्रसंघ ' या नावाने प्रसिद्धी पावली.

३.

# धर्म

सात

## ब्रह्मकर्म कुठे आहे ? / ५४–५७

**डॉ. परांजपे :** ब्राह्मण पक्षाचे एक सुशिक्षित विद्वान. राजोपाध्यांची पूजा राजर्षींनी बंद केली तेव्हा ' राजर्षी शाहूच नव्हेत तर आज भरतखंडात कोणीही क्षत्रिय नाही ' असे डॉ. परांजपे यांनी मत व्यक्त केले होते. राजर्षींनीच ब्राह्मण–ब्राह्मणेतर वाद माजविला, असेही त्यांचे आणखी एक मत होते.

**मी व माझे प्रियमित्र निंबाळकर ... वगैरे :** कोल्हापूर संस्थानातील राजर्षींचे हे सर्व सहकारी होत. राजर्षींसह या सर्वांनी दलित समाजाची आजन्म सेवा करण्याच्या शपथ घेतलेल्या होत्या.

**कीर्तिवानराव निंबाळकर :** मूळ फलटणचे, पोलिसखात्यात नोकर, नोकरीचा राजीनामा देऊन सार्वजनिक कार्यास वाहून घेतले. महाराजांच्या प्रेरणेने ' श्री शिवाजी ' नावाचे एक दैनिक त्यांनी पुण्यामध्ये काढले होते. केशवराव बागडे त्यांचे साहाय्यक होते.

**' ऑलीगार्की ' :** सत्ताधाऱ्यांपैकी छोटा पण प्रभावी गट, कंपू. घालपाड हे या कंपूचे सर्वसाधारणपणे राजकारण, आरोप–प्रत्यारोप वगैरे ओघाने येतेच.

आठ

## आमचा धर्म : आर्य धर्म / ५८.६७

राजर्षी शाहूंनी ' आमचा धर्म : आर्य धर्म ' चा प्रारंभ माझ्या ' आर्य बंधू हो ! ' या संबोधनाने केला आहे.

**महर्षी दयानंद सरस्वती** : भावनगर ( गुजराथ ) जवळील भैरवी या गावी जन्मलेले गुजराथी ब्राह्मण. गुरु विरजानंद यांच्याजवळ अनेक वैदिक ग्रंथांचा अभ्यास. ' वेदविद्येचा अधिकार सर्व मानवजातीस आहे, ' या मताचे आधुनिक भारतातील महर्षी. वैदिक धर्मतत्त्वांचा प्रचार करण्यासाठी 'आर्यसमाजा'ची त्यांनी स्थापना केली. उत्तर भारतातील विविध प्रांतांप्रमाणे महाराष्ट्राचे प्रचार कार्यासाठी प्रयत्न. न्या. रानडे, म. फुले यांच्या प्रयत्नाने त्यांनी पुण्यास काही व्याख्याने दिली. ब्राह्मणी कर्मकांडप्रधान जीवनक्रमातून सामान्य माणसाची मुक्तता करून, दयानंद सरस्वतीनी खऱ्या अर्थाने धर्माचा प्रचार केला. त्यासाठी लोकांना शिक्षण मिळावे म्हणून अनेक शैक्षणिक संस्था सुरू केल्या.

**गरूड पुराण** : मृत माणसाविषयी करावयाच्या विविध यमनियमांचे शास्त्र सांगणारा पुराण ग्रंथ

**बाबू केशवचंद्र सेन** : ( इ. स. १८३८–१८८४ ) थोर बंगाली समाजसुधारक. क्षत्रिय कुलातील गर्भश्रीमंत असूनही एकेश्वरीवादाचा पुरस्कार करून युरोपातील 'युनिटोरियन' पक्षाप्रमाणे त्यांनी सतत समतेचा पुरस्कार केला. दलितवर्गाच्या उद्धारासाठी ' ब्राह्मो समाजा'स आयुष्यभर वाहून घेतले. ' प्रार्थना समाज ' स्थापनेस प्रेरणा दिली. सर्वांना शिक्षण मिळावे म्हणून दयानंद सरस्वतीप्रमाणे अनेक शाळा सुरू केल्या. स्त्रीमुक्ती चळवळीचे पहिले पुढारी

**म. जोतीराव फुले** : ( इ. स. १८२७–१८९० ) पुण्यात म. फुले यांनी ब्राह्मणाविरुद्ध शस्त्र उपसले. अस्पृश्य व स्त्रीवर्गास शिक्षण देऊन त्यांना आत्मोन्नतीचा मार्ग मोकळा करून दिला. सर्व मानवजात एकाच विधात्याने निर्माण केली असून सर्वजण समान आहेत, हा म. फुले यांचा कृतसिद्धांत होता. त्याचा प्रचार करण्यासाठी व ब्राह्मणाच्या जाचातून बहुजनसमाजाची सुटका करून देण्यासाठी ' सत्यशोधक समाज ' ( १८७३ ) स्थापन केला. म. फुले, जीवनभर पददलितांवरील अन्याय दूर करण्यासाठी झगडले. विषमतेविरूद्ध बंड करणारे, आधुनिक महाराष्ट्रातील पहिले सुधारक. स्त्री शिक्षणाचा पुरस्कार.

' ब्राह्मणाचे कसब ', ' गुलामगिरी ', ' शेतकऱ्याचा असूड ', ' इशारा, ' सार्वजनिक सत्यधर्म पुस्तक ' इत्यादी पुस्तकांचे कर्ते

**लॉर्ड किचनेर । जनरल फ्रेंच । मार्शल फ्रॉक** : भारतीय क्षत्रियांप्रमाणे पराक्रम गाजविणारे इंग्रज लोक. म्हणून ते आर्यांचे वंशज होत, असे राजर्षीना वाटते. पूर्व–पश्चिम

जगतात बंधू-भावाचे नाते निर्माण करण्यास ते पुरेसे आहे; असे शाहू छत्रपतींनी म्हटले आहे.

**महाराणा सज्जनसिंह :** राजपूत क्षत्रिय. उदयपूर संस्थानचे अधिपती. सिसोदिया वंशाचे राजघराणे, महाराष्ट्रातील भोसले-मराठ्यांशी त्यांचा संबंध पोचतो. यांनी राजस्थानभर महर्षी दयानंद सरस्वती यांच्या 'आर्यसमाजा'चा प्रचार केला.

**महाराजा प्रतापसिंह :** रजपूत क्षत्रिय जोधपूर संस्थानचे अधिपती. यांनी 'आर्य समाजा'च्या प्रचाराचे कार्यास हातभार लावला.

**ना. भूपेंद्र बसू ।** बंगाली सुधारणावादी गृहस्थ. कायदे कौन्सिलचे सदस्य. यांनी भारतीय हिंदू कोड बिलात सुधारणा सुचविणारे बिल वरिष्ठ कायदे कौन्सिलमध्ये आणले. त्याला पुरोहित वर्गाचा विरोध होता.

नऊ

---

**ऋषींचे मिशन । ६८.७३**

भावनगर : सौराष्ट्र ( गुजरात राज्य ) येथे, अ. भा. आर्यधर्म परिषदेचे अधिवेशन दि. ६, ७ व ८ मार्च, १९२० रोजी झाले. या अधिवेशनास परदेशाहून काही प्रतिनिधी आले होते.

अ. भा. आर्यधर्म परिषदेच्या इतिहासात सदरचे भाषण 'छत्रपतींचा समाजास दिव्य संदेश' म्हणून नोंद करण्यात आल्याचे आढळते.

**आर्यप्रतिनिधी सभा :** संयुक्त प्रांतात, आर्य समाजाने शैक्षणिक कार्य आणि शुद्ध आर्यधर्माचा प्रचार ही कार्ये अंगिकारली. त्यासाठी निरनिराळ्या ठिकाणच्या समाजाच्या सभासदांमध्ये समन्वय साधणे आवश्यक होते. यातून समाजाच्या सभासदांचे एक 'मध्यवर्ती कार्यकारी मंडळ' स्थापन केले. तीच 'आर्य प्रतिनिधी सभा' होय. राजर्षी शाहूंनी, करवीर येथील शैक्षणिक संस्था या प्रतिनिधी सभेकडे सुपूर्द केल्या होत्या.

**जोतीबा क्षेत्र :** कोल्हापूर संस्थानच्या पन्हाळा महालातील एक धार्मिक क्षेत्र, कोल्हापुरापासून १२ मैलावरील तीर्थक्षेत्र. शंकराचे स्थान. मराठ्यांचे कुलदैवत. राजर्षींचेही कुलदैवत.

दहा

---

## समाज सुधारणा कोण करू शकेल ? /७४.८५

नागपूर (महाराष्ट्र राज्य) येथे ३० मे, १९२० रोजी भरलेल्या अ. भा. बहिष्कृत समाज परिषदेच्या अध्यक्षस्थानी छत्रपती शाहू महाराजांची योजना होती. राजर्षींच्या आगमनाच्या वेळी, त्यांची 'धेडोंका राजा' ची भूमिका ध्यानात घेऊन, भीतीने नागपूरकर भोसले व त्या विभागातील काही 'बोलूकाका पुढारी', काही निमित्ताने शहाराबाहेर गेल्याचे आढळले.

हा सगळा संदर्भ ध्यानात घेऊन, 'समाज सुधारणा कोण करू शकेल ?' मध्ये राजर्षींनी बोलूकाका पुढाऱ्यासंबंधीचे विवेचन केले असावे.या विवेचनामागे केवळ बोलक्या पुढाऱ्यांच्या नित्याच्या चालचलणुकीसंबंधीचा भागही आहे, हे ध्यानात घेतले पाहिजे.

**हिंदू कायदा :** इंग्रजी अमदानीत 'हिंदू कोड बिल' या नावाचा एक कायदा सन १८६५ मध्ये करण्यात आला. या कायद्याने अनेक दुष्ट हिंदू रूढींना संरक्षण मिळाले.

**प. वा. डॉ. नायर :** मद्रास इलाख्यातील एक जुने सामाजिक कार्यकर्ते. त्यांनी ब्राह्मणेतर लोकांची एक संघटना निर्माण करून त्यांच्यात स्वहक्कांची जाणीव निर्माण करून दिली.

**पंचम :** मद्रासकडील पददलित व अस्पृश्य म्हणून सामाजिक हक्क नाकारलेली एक जमात. महाराष्ट्रातील अस्पृश्य वगैरे सारखी.

**नामदार पटेल :** वरिष्ठ कायदे कौन्सिलचे एक जागरूक सदस्य. यांनी सन १९२० मध्ये मिश्रविवाहापासून होणाऱ्या संततीला औरस संततीचे सर्व अधिकार देणारे एक

बिल वरिष्ठ कायदे कौन्सिलमध्ये मांडले होते.

**मि. अरुंडेल :** ब्राह्मण युवतीशी आंतरजातीय विवाह करणारे एक सद्‌गृहस्थ. त्यामुळे ब्राह्मणवर्गाने त्यांचा खूपच छळ केला.

**'प्रगति'कार :** १९०८ सालापासून कोल्हापूर येथून हे वृत्तपत्र सुरू झाले. या पत्राने मिश्रविवाहोत्पन्न संततीस वारसा हक्काचे अधिकार देणे बरोबर नाही, असे मत मांडले होते.

**' इन्स् ऑफ कोर्ट ' :** इंग्लंड मधील एक संघटना. ती ' बॅरिस्टर ' ची पदवी देई. त्याची कसोटी म्हणजे जेवणांची संख्या. अशा तऱ्हेने बॅरिस्टर होणाऱ्यास ' टेबल बॅरिस्टर ' किंवा ' डिनर बॅरिस्टर ' असे म्हणत. अचूक उपहास शोधणारा एक शब्दप्रयोग.

**सामुराई जमात :** जपानमधील १९ व्या शतकातील एक वरिष्ठ जमात. ह्या जमातीने राष्ट्रीय ऐक्यासाठी आपले सर्व अधिकार स्वतः होऊनच कनिष्ठांना देऊन टाकले. इथल्या वरिष्ठ वर्णियांनी असा ' अधिकार त्याग ' करून आदर्श पुढे ठेवावा, असे राजर्षींचे सांगण्यामागील सूत्र.

अकरा

---

**कर्तव्यकर्माचा धडा । ८६.९४**

हुबळी (कर्नाटक राज्य) येथे, दि. २६ जुलै, १९२० रोजी भरलेल्या कर्नाटक ब्राह्मणेतर सामाजिक परिषदेच्या अध्यक्षपदावरून केलेल्या ' कर्तव्यकर्माचा धडा ' या भाषणाचा प्रारंभ राजर्षींनी ' सर त्यागराज चेट्टी, माझे प्यारे मर्द, भाई व भगिनींनो ' अशा संबोधनाने केला आहे.

**सर त्यागराज चेट्टी :** ' कर्नाटक ब्राह्मणेतर परिषदे ' चे कार्यकर्ते. जुलै, १९२० मध्ये

हुबळी येथे ' कर्नाटक ब्राह्मणेतर सामाजिक परिषद ' यांच्याच प्रयत्नाने संपन्न झाली.

**मि. चिकोडी, मि. कंबळी, मि. गवई ,,. वगैरे** : कर्नाटक ब्राह्मणेतर सामाजिक परिषदेचे संघटक, त्यागराज चेट्टी यांचे सहकारी. दलित समाजाविषयी सहानुभूती असलेले कार्यकर्ते

**नामदार रानडे-गोखले व आगरकर** : महाराष्ट्रातील सामाजिक चळवळीचे आद्य ब्राह्मण नेते. सामाजिक सुधारणा आधी व्हाव्या, अशा विचारसरणीचे उदारमतवादी, पुरोगामी लोकसेवक

**दाल्भ्यक ऋषी** : पद्मपुराणातील ६९व्या अध्यायात रविवारच्या व्रताची कथा आहे. या कथेतील रविवारच्या व्रताचे निरूपण करणारे ऋषी.

**गृहस्थाश्रम व अलाहाबाद** : पौराणिक कथातील संकेताप्रमाणे सन १९०१ मध्येही एका ब्राह्मण गृहस्थाने पत्नीचे दान केले. ही घटना महाभारतातील अनुशासनपर्वात आलेल्या स्त्रीदान करण्याच्या व्रतासारखीच आहे. यावरून ब्राह्मण्याचा पगडा हिंदूवर किती आहे हे स्पष्ट होते. हे सारे कर्मकांड, स्त्रीशूद्रादिकांना छळणाऱ्या ब्राह्मण्यातून निर्माण झालेले आहे; होते.

**रिक्रूटिंग बोर्ड** : ब्रिटिश सरकारने आपल्या फौजेत हिंदी लोकांना भरती करून घेण्यासाठी निर्माण केलेली संघटना. यात भारतीय प्रतिष्ठित व संस्थानिक, जे सरकार पक्षाचे असत त्यांना घेतले जाई. काही सरकारी अधिकारीही असत.

**' केसरी ' कार** : लो. बाळ गंगाधर टिळक : त्यांच्या संपादकत्वाखाली ' केसरी ' पत्र पुण्यातून निघे. ते दैनिक ' केसरी ' म्हणून सध्या प्रसिद्ध आहे. 'केसरी'कार आणि राजर्षी शाहू यांच्यात तात्त्विक मतभेद होते. ' केसरी ' च्या २२ व २९ ऑक्टोबर, १९०१ च्या अंकात याचे दृश्यरूप पाहावयास मिळते. ' लो. टिळक लेखसंग्रह : ' भाग ४ : पृ. : ३१२–१६ मध्ये असे काही लेख संगृहित झाले आहेत. ' वेदोक्तादी प्रकरणा ' वरून उभयतांमध्ये तात्त्विक वाद माजलेला होता.

बारा

---

## मराठयांची परंपरा । ९८.९५

शाहू छत्रपतींनी कूट एल आमारा येथील मराठा पलटणींना, " रसद तुटल्यामुळे घोडयाचे मांस खाऊन, याप्रसंगी छाती घट्ट करून, संकटसमयी शास्त्राने सांगितलेले कर्तव्य लक्षात आणून, उपलब्ध असलेल्या अन्नावर तुम्ही जिवंत राहावे आणि आपले कर्तव्य बजावून तुमच्या पूर्वजांची कीर्ती निष्कलंक राखावी." अशी मराठा पलटणींना आज्ञा केली.

मराठा पलटणींनी, शाहू छत्रपतींची आज्ञा शिरसावंद्य मानली. पराक्रमाची शर्थ केली पण अन्नपाण्याच्या अभावी पराक्रम कारणी लागला नाही. शरण जावे लागले.

शाहू छत्रपतींनी हे आज्ञापत्र काढण्याचे कारण हे की, कूट एल आमारा मध्ये उद्‌भवलेली परिस्थिती व त्या परिस्थितीत मराठा पलटणींचा, ' घोडयाचे मांसही खाऊ पण आमचे दैवत शाहू, छत्रपती यांची आज्ञा झाली तरच हे शक्य आहे, ' असा पडलेला आग्रह; साहाजिकच मुंबई सरकारने, शाहू महाराजाना तातडीने शिष्टाई करण्यासंबंधी एका खलित्याद्वारे विनंती केली. त्यानुसार शाहू छत्रपतीनी २३ मार्च, १९१६ रोजी मराठा पलटणींना, घोडयाचे मांस खाण्याबद्दल आणि पुढे त्यांच्या समाजजीवनात येणाऱ्या अडीअडचणींच्या निराकरणाबाबत घट्ट आश्वासन देणारा लखोटा धाडला. तेच ' मराठयांची परंपरा ' हे प्रकट आवाहन होय.

मराठा राज्य संस्थापक श्री शिवाजी महाराज यांचे वारस शाहू छत्रपती यांच्यावर सर्वसाधारण सैनिकांची, एका बाजूने ही प्रगाढ श्रद्धा; श्रद्धासाठी जान कुर्बान करण्याची रित तर या सर्वसाधारणासाठी राजर्षी शाहू महाराजांच्या मनात वसत असलेली कृतज्ञबुद्धी, दुसऱ्या अंगाने निथळून जात आहे.

शाहू छत्रपती, लखोटा पाठविल्यानंतर दुसऱ्या दिवशी, २४ मार्च, १९१६ रोजी मुंबई सरकारला लिहिलेल्या पत्रात, मराठा पलटणी करीत असलेल्या संग्रामाच्या ' जागी ' स्वतःला पाठविण्याची विनंती करताना लिहितात : " मी मराठा घराण्यात जन्मलो

आहे. म्हणून या मोठ्या राष्ट्रीय युद्धाशी माझा काही तरी संबंध असावा असे मला वाटते. तेवढ्यातून बाहेर पडल्यानंतर त्यांना उत्तेजन देऊन उदाहरण घालून देणे, त्यांचा स्वयंपाक करणे, त्यांच्या सुखसोयी पाहणे इत्यादी प्रकारचे, मी ज्या कामाला योग्य आहे, असे आपणास वाटेल ते काम करण्यास कृपया मला पाठवावे.'

राजर्षी शाहूंचा सर्वसामान्यांशी समरस होण्याचा मनाचा स्थायीभाव, जनतेचा सहभाग मिळविण्याची संपर्करीती, त्यांनी उभारलेल्या चळवळींनी वेग का घेतला, त्याचे निदान करते. खेरीज राजर्षीच्या आज्ञापत्रामुळे सैनिकांनी अधिक काळ टिकावही धरला; हेही स्पष्ट होते. यावेळी, शाहू छत्रपतीनी, 'वॉर रिलीफ फंडा'ला रु. २०,००० ची वर्गणी व लेडी विलिंग्डन यांनी उभारलेल्या स्त्रियांच्या फंडाला रु, ४,००० देणगीही दिली आहे.

**महायुद्ध :** पहिले महायुद्ध. १९१४ ते १९१८ अखेर हे युद्ध लढले गेले. टर्कीच्या संरक्षणाच्या निमित्ताने इंग्लंडला या युद्धात उतरावे लागले. टर्कीतील जहाल पक्षाने जर्मनीशी संधान बांधले होते. जर्मनी सर्व युरोपखंडात आपले वर्चस्व निर्माण करण्याचे मांडे रचत युद्धास सज्ज झाला होता.

**महाअश्वमेध :** भारतात प्राचीनकाळी अश्वमेध यज्ञ होत असत, त्यावरून घोड्याचे मांस खाण्याची चाल पूर्वी होती हे सिद्ध होते. अन्नाची गरज भासत असता घोड्याचे मांस खायला हरकत नाही, असा संदेश राजर्षींनी मराठा फलटणीस पाठविला.

४.

# अर्थ

तेरा

---

## देशात ऐश्वर्य कसे वाढेल ? / १९.११०

कानपूर ( उत्तर प्रदेश ) येथे, दि. १९, २० व २१ एप्रिल, १९१९ रोजी अ. भा. कुरमी क्षत्रियांची तेरावी सामाजिक परिषद, राजर्षी शाहूंच्या अध्यक्षतेखाली भरली होती.

राजर्षींनी ' देशात ऐश्वर्य कसे वाढेल ? ' या भाषणाचा प्रारंभ, ' प्रिय क्षत्रिय बंधु हो' या संबोधनाने केला आहे.

या परिषदेचे वैशिष्टय हे की, छ. शाहू महाराज यांना ' राजर्षी ' ही सन्मान्य पदवी देण्याचा ठराव परिषदेत एकमताने पास करण्यात आला.

**ताराबाई राणीसाहेब :** शिवपुत्र राजाराम यांची पत्नी, महत्वाकांक्षी क्षत्रिय स्त्री. संभाजीच्या वधानंतर आपलाच मुलगा सातारच्या गादीवर यावा ही ताराबाई राणीसाहेबांची इच्छा होती. राजकारणपटू म्हणून ख्याती, कोल्हापुरच्या गादीचे स्वतंत्र अस्तित्व टिकविणारी धुरंधर स्त्री म्हणून प्रसिद्ध. याच करवीरच्या गादीवर राजर्षी शाहू हे दत्तक पुत्र म्हणून गादीवर आले.

**खासेराव जाधव साहेब :** बडोद्याचे सयाजीराव गायकवाड यांचे व्यक्तिगत अधिकारी. मराठ्यांच्या शिक्षणाविषयी धडपडणारे. त्यांच्या प्रयत्नाने अनेक मराठा मुलांना उच्च शिक्षणाची संधी मिळाली.

**स्वामी परमानंद :** मुंबई ' प्रार्थना समाजा'चे अध्यक्ष. धर्म व समाजसुधारक. ' सुबोधपत्रिके ' चे नामवंत लेखक. म. फुले यांचे निकट स्नेही, नेमस्त राजकीय पक्षाचे पुरस्कर्ते. राजवाडे–भांडारकर यांचे चाहते. ' नेटिव्ह ओपिनियन ' चे संपादक. दलित व कामगार वर्गाचे हितचिंतक

**विष्णु पुराण :** एक पुराण ग्रंथ : त्रिशंकूच्या वंशातील बाहू राजाच्या पोटी जन्म घेतलेल्या ' सगरा ' ने क्षत्रियांना जर्जर केले. वशिष्ठ ऋषीनी मध्यस्थी करून त्या सर्व क्षत्रियांना द्विजव्रत व धर्म यापासून वेगळे केले. अशी कथा अंतर्भूत असणारे पण क्षत्रियांचा कुलक्षय झाला आहे हे सांगणारे पुराण

**परशुराम पुराण :** जमदग्नी ऋषींचे पुत्र. शंकराच्या भक्तीने त्याने अग्नीसारखा सामर्थ्यशाली परशू मिळविला. त्यामुळे त्याच्या 'राम' मध्ये 'परशु' येऊन ' परशुराम' असे नामकरण झाले. त्याने सर्व पृथ्वी निःक्षत्रिय केली, अशी कथा सांगणारे पुराण.

**कुरमी क्षत्रिय :** बिहार प्रांतातील क्षत्रियांचे एक कूल. यांच्यात विधवाविवाहाची प्रथा आहे. सन १९१९ मध्ये राजर्षी शाहू कुरमी क्षत्रियांच्या अधिवेशनासाठी कानपूरला गेले होते.

टिपा आणि टिप्पणी : १७५

**राजकर्त्या क्षत्रिय स्त्रिया :**

१. महाराणी ताराबाई : कोल्हापूर २. महाराणी सती अहिल्याबाई : इंदूर : ग्वाल्हेर
३. राणी लक्ष्मीबाई : झाशी ४. राणी कमलाबाई : कोल्हापूर ( ? )

**पडदा पद्धती :** महाराष्ट्रातील खानदानी क्षत्रियांच्या कुलातील एक आचार पद्धती. स्त्रियांनी आपले तोंड व शरीर यावर कपड्याचे आवरण घेऊन बाहेर पडावयाचे. त्या वस्त्राला ' पडदा ' म्हणतात. मुसलमानांच्यातही ही पद्धती आहे.

चौदा

---

## योग्य काम, योग्य दाम / ११०-११६

कोल्हापूर ( महाराष्ट्र राज्य ) येथे, दि. १५ ऑगस्ट, १९२० रोजी आर्य क्षत्रिय परिषदेचे पाचवे अधिवेशन, राजर्षी शाहूंच्या अध्यक्षतेखाली भरले होते. या अधिवेशनास जोडून श्री राजाराम इंडस्ट्रियल स्कूल, बोर्डिंग हाऊस व शो रूम्सचा उद्घाटन समारंभ असा जोड कार्यक्रमही आयोजित करण्यात आला होता.

या समारंभाचे स्वागताध्यक्ष रावसाहेब काशिनाथ नानाजी यादव, जिल्हा न्यायाधीश ग्वाल्हेर हे होते.

याप्रसंगी केलेल्या, स्वागतपर भाषणात रावसाहेब यादव यांनी, आर्य क्षत्रिय ज्ञानवर्धक समाजाच्या स्थापनेमागील हेतू व समाजाच्या सद्य:परिस्थितीची माहिती निवेदन करताना म्हटले होते.

"... आर्यक्षत्रिय जातींमधील उत्तम कारागिर लोक बनविणे, शेतकीची व इतर लहान लहान अवश्य लागणाऱ्या वस्तू बनविण्याची यंत्रे करणे, व्यवहारांमध्ये नित्य लागणाऱ्या वस्तूंची निर्मिती करणे ...

...केवळ आर्य क्षत्रिय जातींच्याच नव्हे तर इतर कोणत्याही जातीच्या मुलांना; किंबहुना जन्मापासून ज्या कलाकौशल्याचा संस्कार नसलेल्या महार-मांग वगैरे जातीपातींच्या

मुलांना या संस्थेत मुक्त प्रवेश देण्यात येईल. त्यांना इतर गोष्टींची माहिती देऊन किमान एकातरी धंद्यात प्रवीण करण्याचा प्रयत्न राहील.

स्वागताध्यक्ष यादव यांनी समाजाच्या सद्य:स्थितीची माहिती देऊन पुढे नमूद केले आहे:

......राजर्षी शाहू महाराजांनी, समाजासाठी तीस हजार रुपयांपेक्षा जास्त किंमतीची पद्माळ्यानजीकची जागा दिली आहे...

शाहू छत्रपती 'मागासलेल्या लोकांना पुढे आणण्यासाठी' किती आटोकाट प्रयत्न करतात; त्याचा यादव यांनी या भाषणात प्रारंभीच निर्देश केला आहे.

त्यानंतर राजर्षींच्या भाषणात, रावसाहेब यादव यांच्या बहुतांशी सगळ्या मुद्द्यांचा मुद्देसूद परामर्श घेण्यात आला असून, त्यामध्ये 'देशाची उन्नती उद्योगधंद्यांच्या वाढीवर अवलंबून आहे,' हे मध्यवर्ती सूत्र आहे.

**प्रदर्शन** : आर्य क्षत्रियांच्या ५ व्या परिषदेत मांडलेले प्रदर्शन. मराठा योद्धयांच्या सहवासाने क्षत्रिय मराठयांना अनेक हस्तकला व्यवसाय उपलब्ध झाले होते. घोडयांची 'जिन' (खोगीर) तयार करणे हा एक त्यापैकीच व्यवसाय होय. राजर्षींनी जिनगर समाजासाठी प्रिन्स राजाराम औद्योगिक शाळा काढली होती. स्वतंत्र बोर्डिंग हाऊसही उघडले होते.

राजर्षी नेहमी नवनव्या उद्योगांच्या शोधात असलेले दिसतात. साधारणपणे सर्व व्यवसाय शेतीला पूरक व्हावेत अशी त्यांची दृष्टी दिसते. या दृष्टीने त्यांचा शेती संशोधनावर भर होता; तर सैद्धांतिक आणि प्रायोगिक दोन्ही दृष्टीनी कार्यवाही सुरू होती.

राजर्षींनी कॉफी–चहा, वेलदोडा वगैरेंची लागवड केली. दक्षिण भारतात कॉफी चहाचे पीक अधिक म्हणून जमीन, तिचे आकार, हवामान यांची पाहणी केली. तज्ञाशी सल्लामसलत केली. कोल्हापूर भागात वर्षभर सतत पाऊस नसल्याने कॉफी–चहाच्या लागवडीचा प्रयोग अंशत: यशस्वी झाला. पन्हाळा बावडा भागातील पेडखळे व भुदरगड तालुक्यात कॉफीचा लागवड करण्यात आली. प्रारंभी २,००० रोपे लावली होती. १८९३–९४ मध्ये, या प्रयोगाला प्रारंभ झाला असून त्यासाली १४ एकरात कॉफीची लागवड केली गेली आहे. जास्तीत जास्त १६ आणि कमीत कमी ४

एकर १८ गुंठ्यातही लागवड आहे. उत्पादन जास्तीत जास्त ९१८ पौंड (१९१७-१९१८) व कमीत कमी ५० पौंड ( १९२१-१९२२ ) झाल्याचे आढळते.

कॉफीप्रमाणेच चहाची लागवड जास्तीत जास्त ११.२, गुंठे ( १९१८.१९१९ ) व कमीत कमी १ एकर २० गुंठ्यामध्ये ( १९०७.०८ ) आहे. उत्पन्न जास्तीत जास्त ७६८ पौंड ( १९१८-१९१९ ) व कमीतकमी २३ पौंड ( १९०५-१९०६ ) दिसते.

बुंदांच्या झाडांच्या लागवडीचा प्रयोग तुरकवाडी येथे करण्यात आला असून कुंपणे, जंगल खात्याची हद्द निश्चित करण्याच्या दृष्टीने उपयोगी पडणाऱ्या कोरफडीची लागवडही झाली आहे. राळ तयार करण्यासाठी लागणाऱ्या ‘गंजन’ गवताची उपलब्धता पाहून, खानदेशाहून तंत्रज्ञ आणवून आपल्याकडील लोकांना प्रशिक्षण देऊन राळ करण्याचा प्रयोगही करण्यात आला आहे. शाहू छत्रपतींनी भुदरगड विभागात रेशिम, पन्हाळा व भुदरगड येथे वेलदोडे, ताग, रबर, अंबाडी, शिगोड, टॅपिओका, लाख, शिरोळ तालुक्यात कंबोडियन कापूस अशा लागवडींचे प्रयोग केले आहेत. अलिकडे टॅपिओका या पिष्टमय पदार्थाला खूपच महत्त्व आले असून त्यापासून साबुदाणा किंवा उच्चभ्रू मंडळींसाठी लागणारे अन्य पदार्थ करण्याकडे केला जातो. सोनतळी कॅंप येथे राजर्षींनी मध उत्पादनाचा दीडदोन वर्षे प्रयोगही करून पाहिला आहे; तर जिनिंग/विव्हिंग धंद्याबरोबरच रंगकामाकडेही लक्ष पुरविले आहे. त्यादृष्टीने रंगकामाचा कारखाना सुरु करता येईल की काय, याचा अदमास शाहू छत्रपती घेताना दिसतात. इचलकरंजीचा श्री व्यंकटेश रंगतंतू कारखाना ही त्याचीच सुरुवात होती. राधानगरी येथे लाकूड शुद्धीकरण कारखाना काढण्याचा प्रयोग हा आणखी एक प्रयोग होय. जवळजवळ दोन महिने हा प्रयोग सुरु होता. त्यामधील म्हैसूरच्या प्रदर्शनात पाठविलेल्या पदार्थांना चांदीचे पदकही मिळाले होते. अशा विविध उद्योगव्यवसायांना प्रोत्साहन देण्यामागे कलागुणांना वाव मिळावा, पूरक धंदे उपलब्ध व्हावेत व डोंगरपठारात असलेल्या साधारण जनतेला रोजगारही उपलब्ध व्हावा अशी शाहू छत्रपतींची दृष्टी होती. प्रदर्शनामागे एवढा आवाका होता.

५.

# मजूर

पंधरा

---

## हक्कांसाठी झगडा ! । ११७-१२४

**नारायणराव चंदावरकर :** ( इ. स. १८५५-१९२३ ) मुंबई विद्यापीठाचे कुलगुरु. मुंबई कायदे कौन्सिलचे अध्यक्ष. रानडे–भांडारकर यांची परंपरा चालविणारे मुंबई प्रार्थना समाजाचे अध्यक्ष. उत्कृष्ट उपासक व प्रचारक, नेमस्तांचे पुढारी. कर्मवीर वि. रा. शिंदे यांना ' भारतीय निराश्रित साह्यकारी मंडळी ' स्थापण्याच्या कामी सहकार्य, राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष. ' इंदुप्रकाश ' मधून अनेक लेख लिहून लोकजागृती केली. राजर्षी शाहूंचे हितचिंतक

**लॉर्ड विलिंग्डन** : मुंबई इलाख्याचे गव्हर्नर ( १९१६-१९२० ) पुढे मद्रासला बदली. गोरगरीब लोकांबद्दल सहानुभूती, सामान्य समाजात मिसळणारे अधिकारी, मुंबईचे ' हार्टिंग हॉस्पिटल ' यांच्याच श्रमाचे फळ होय. निर्भिड व स्पष्टवक्ते म्हणून प्रसिद्ध

**लेडी विलिंग्डन :** लॉर्ड विलिंग्डन यांच्या सुविद्य पत्नी. लॉर्ड ' ब्रेव्हिस ' या घराण्याचा परोपकाराचा वारसा लाभलेल्या विदुषी. त्यामुळे दया, परोपकार, दाक्षिण्य इ. गुणांचा ठेवा लाभलेला. सामाजिक सेवेत रस

**ना. सर शंकरन् नायर :** मद्रासचे पुढारी. मद्रासमधील 'जस्टिस पार्टी ' चे नेते. भारतीय राजकारणात महत्त्वपूर्ण स्थान

**ना सर इब्राहिम रहिमतुल्ला** : मुंबईच्या कायदे कौन्सिलचे अनेक वर्षे सदस्य,

**वा. रा. कोठारी :** प्रारंभी 'जागरूक' नावाचे पत्रक चालविले. नंतर 'प्रभात' दैनिकाचे संपादक. सत्यशोधक समाजाचे एक जुने कार्यकर्ते. शाहू महाराजांच्या कार्याला आवर्जून प्रसिद्धी देत. विरोधकांची अंतःकरणे कुरतडीत जाणारे झटपट व मार्मिक लेखन, संयुक्त महाराष्ट्राचा लढा, कोठारीनी 'प्रभात मधून जागा ठेवला, जिंकला. मुळचे मोडनिंब ( सोलापूर ) येथील. पुढे पुण्यास स्थायिक.

**आ. बा. लठ्ठे :** अनेक पुस्तकांचे कर्ते. जैन समाजातील करवीर नगरीतील सद्‌गृहस्थ; जैन बोर्डिंगचे व्यवस्थापक. शिक्षक म्हणून कार्य करीत असताना सामाजिक कार्याकडे वळले. सत्यशोधक समाजाचे कार्यकर्ते. यांनी राजर्षी शाहू यांचे इंग्रजी चरित्र लिहिले असून त्याचा मराठी अनुवादही प्रसिद्ध आहे. या चरित्रग्रंथास अनन्यसाधारण महत्त्व लाभण्याचे भाग्य. राजकारणात सक्रीय भाग. 'डांबर प्रकरणा'तील महत्त्वपूर्ण व्यक्ती

**मुकुंदराव ग. पाटील :** 'सत्यशोधक चळवळी'तील थोर सेनानी व तिखट प्रचारक. तरवडी : जिल्हा अहमदनगर येथे वास्तव्य. म. फुले यांच्या कार्याला साहाय्य, कृ. पां. भालेकर यांचे पुत्र. गणपत पाटील यांना दत्तक, भालेकर त्यांचे 'दीनमित्र' पुढे मुकुंदराव यांनी ५० वर्षे चालविले. कोल्हापूर येथील अखिल भारतीय सत्यशोधक परिषदेचे अध्यक्ष. राजर्षी शाहूंच्यावर टीका करणाऱ्या 'केसरी'ला 'दीनमित्र' मधून उत्तरे देत. खंदे पत्रकार, समाजसेवक म्हणून प्रसिद्ध. 'कुलकर्णी लीलामृत' वगैरे झोंबणाऱ्या पुस्तकांचे कर्ते, मुकुंदराव पाटील यांच्या मृत्यूपूर्वी वर्षभर अगोदर प्रस्तुत संपादक, त्यांना 'सत्यशोधक चळवळ : उद्‌गम, स्वरूप आणि विकास' या संशोधन प्रकल्पाच्या कामी भेटले होते. 'दीनमित्र' कार कॅन्सरने आजारी होते. दोन दिवसांच्या जमेल तशा चर्चेत मुकुंदराव पाटील एकदा म्हणाले होते, "चळवळ झाली, लोक मोठे झाले. उरला, मेला कोण ? कोण पाहतो ? फुकाचा कळवळा येतो. शालूभूषणांना 'पद्मभूषण' मिळते. आम्ही तरसतो." सत्यशोधकांच्या वाट्याला काय आले हा खरेच प्रश्न आहे.

**सर विल्यम वेडरबर्न :** 'हिंदुस्थानचे ब्रिटिश मित्र' म्हणून प्रसिद्ध. सन १८८९ च्या मुंबई व १९३० च्या अलाहाबाद काँग्रेसचे अध्यक्ष, काँग्रेसला द्रव्यसहाय्य व परिश्रम देणारा युरोपियन मित्र. उदारमतवादी, प्रगतिप्रिय म्हणून नाव कमावले. आले मुंबई हायकोर्टाचे रजिस्ट्रार म्हणून पण बनून मात्र गेले राजकारणी.

**सर अ. ऑ ह्यूम : ( १८२९–१९१२ )** : भारतीय राष्ट्रसभेचे जनक, सनदी नोकर, लोककल्याणेच्छू, स्वातंत्र्याचे उद्‌गाते. थिऑसॉफिस्ट

**सर व्हॅलेंटाईन चिरोल** : टिळक खटल्याने गाजलेले युरोपियन गृहस्थ. त्यांनी हिंदुस्थानविषयक ऐतिहासिक माहिती लिहिताना लो. टिळकांची बदनामी केली. त्यांच्यावर लो. टिळकांनी खटला भरला. तो इंग्लंडमध्ये चालला. टिळकांच्या विरुद्ध निकाल लागला.

**बेल्जम / सर्व्हिया** : बाल्कन द्विपकल्पातील युरोपियन राष्ट्र. पहिल्या महायुद्धास ही राष्ट्रे जर्मनी व ऑस्ट्रेलिया यांच्याशी लढली.

**रावसाहेब सरनोबत** : राजर्षी शाहू यांचे निकटवर्ती व नातेवाईक

सोळा

---

## पहिला लोकसंघ । १२५.१३४

परळ ( मुंबई : महाराष्ट्र राज्य ) येथे भरलेल्या कामगारांच्या जाहीरसभेचे अध्यक्ष या नात्याने कामगारांच्या पहिल्या लोकसंघाचे, २४ नोव्हें, १९१८ रोजी राजर्षी शाहूंनी उद्‌घाटन केले.

**लोकसंघ** : ( People's Union ') युरोपातील कामगार युनियनच्या धर्तीवर, भारतातील कामगार आणि शेतकऱ्यांच्या संघटना व्हाव्या असे आवाहन राजर्षी शाहू यांनी मुंबईतील कामगारांना केले होते. त्याप्रमाणे मुंबईतील कामगारांनी स्थापन केलेली ही एक संघटना होय.

**पंडित आत्माराम** : आर्य समाजाचे कार्यकर्ते. त्यांच्याकडून महाराष्ट्रात आर्य समाजाचे प्रचार कार्य. राजर्षी शाहू यांनी पंडित आत्माराम यांच्या साहाय्यामुळेच आर्य समाजाचे कार्य स्वतःच्या शिरावर घेतले,

Forty seven

# A Front for Democratic Wave



We Princess of the S. M. C. and Satara Jahagirdars are geogrphically cut off from the rest of the Bombay presidency State. The Government of India is a long way off from our part of it. They are not likely to know much about us. They hardly know what seditious papers we have or what movements are started here against Government. They do not know who our leaders are, who is Kelkar or Parnjape and in what points they agree or differ and how their views influence people or the masses and whether they have greater sway over the masses or the classes; nor is the Government of India familiar with the problems peculiar to the Maratha States. But why we want to go under the Government of India is that thereby. We have reason to believe our status is raised. This will appear from the difference in treatment given to the states on our side and those directly under the Government of India. In the present Chamber of Princess I see chiefs having a small Jahagirs included among the members. Some of them cannot be compared in area, population or revenue to States on our sides, that have been excluded from membership. In the same way in the conferring of honours, we feel, we are not properly treated. The States even of much smaller importance under



*The views of H. H. the Shahu, on the Changing Political Situation in India of his time, reveal his ideals of the movement for free united India. He had also felt the wave of Democracy.*

Govt. of India enjoy hounours and titles which are denied to us. We have no opportunities of meeting together and making our grievance heard. In short when we are cut off from direct relationship with Government of India. we feel we are neglected.

Of course, I do not make a complaint but they are quoted just to invite the attention of Government to the appearent distinction the y involve. This, we are inclined to think will not be the case if we also like the Princess in Central India or in United Provinces are in direct relations with the Government of India, In my humble opinion, this is a time when, if possible all Princess must unite and present a solid front to the democratic wave that is passing over the land or it may engulf them. So, at least groups that are geogrophically one should be allowed the privilege of meeting together or going in a deputation and making themeslves heard. If some princess and Chiefs from among the Maratha States are taken over by the Government of India to the exclusion of the rest it would be like cutting a body into two; it will then have no life either in one place or the other. Such a partition of the Maratha States would be like the partition of Bengal. I think that Satara and S. M. C. Jahagirs are in no way of lower status then some of the Chiefs admitted to the membership of the Chamber. I hear some chiefs complaning of the admission of Jahagir among its members to their exclusion, They feel that they have done a great service to the Empire than the little State, and are in every way superior to them. And yet they are excluded from the honours which the smaller states are enjoying. They cannot understand why this is so.

डॉ. एस्. एस्. भोसले

# राजर्षी शाहू :
# श्री शाय जनतात्मने



शाहू छत्रपतींच्या भाषणांमधून त्याकाळचे संस्थान, देश आणि परदेश यांमधील विविध प्रश्नांची कल्पना येते. राजर्षींचा, त्या प्रश्नांकडे पाहण्याचा दृष्टीकोण ध्यानी येतो. अर्थात त्यात प्राधान्य संस्थानी प्रश्नांना असणार हे उघडच आहे. या सर्वांमधून, राजर्षींचे अष्टावधानी सावधपण जाणवते. आपल्या देशात काय चालले आहे, त्याकडे राजर्षींचे लक्ष आहेच, खेरीज पाश्चात्य देशात काय डहुळले जाते आहे, त्याकडेही त्यांनी विशेषत्वाने लक्ष पुरविले आहे.

शाहू छत्रपती कृतिशूर असल्याने त्यांचा सर्वस्पर्शी विचार, एकूण बदलत्या जगाच्या संदर्भात त्यांनी आपल्या संस्थानामध्ये केलेल्या सर्वांगीण सुधारणांच्या पार्श्वभूमीवरच समजून घेतला पाहिजे. हा दूरवरचा भाग थोडा बाजूला राखला तरी त्यांच्या कृतीचे मर्म ओळखण्यासाठी इतर गोष्टींसह त्यांची प्रासंगिक भाषणेसुद्धा मोलाची आहेत. मात्र शाहू छत्रपतींची उपलब्ध भाषणे फार थोडी आहेत. १८८८ पासून १९२२ अखेर राजर्षींच्या भाषणांच्या नोंदी आढळतात. त्यामध्ये १९१६ ते १९२२ अखेरचा सात वर्षांचा कालखंड अधिक महत्त्वाचा आहे. या काळामध्ये भाषणेही अधिक आढळतात; खेरीज ती ज्या सभासंमेलनांतून केली आहेत, ती ठिकाणेही विशेष लक्ष्यवेधी आहेत. सर्वसाधारणपणे या काळातील भाषणे अ. भा. मराठा परिषद, अस्पृश्य वर्गाची परिषद, अ. भा. आर्यधर्म परिषद, ब्राह्मणेतर सामाजिक परिषद इत्यादी महत्त्वाच्या परिषदांमधून झालेली आहेत. स्थूलपणे सगळीच भाषणे त्रोटक, मध्येच कुठेतरी तुटल्यासारखी वाटत असली तरी मूलतः ती परिपक्व विचारांची निदर्शक आहेत;

आणि नेमके विचार, आल्हाळ–पाल्हाळ न लावता, नेमक्या शब्दसंहतीने सांगण्याची हातोटी हा त्यामधला विशेष आहे. कुठेही उगीच लांबड नाही. फाफटपसारा नाही. शब्दजंजाळ नाही की आडूनआडून मारणे नाही. ' रिलिजस ब्युरॉक्रसी,' ' आमचा धर्मः आर्यधर्म,' ' समाज सुधारणा कोण करू शकेल ?, ' ' देशात ऐश्वर्य कसे वाढेल ?,' ' हक्कांसाठी झगडा ' अशा काही राजर्षींच्या इतर भाषणांच्या मानाने दीर्घ भाषणांचा अपवाद करता; मारूतीच्या शेपटासारखी जड होणारी लांबणूक आणि दमणूक दोन्हीही नाहीत. मात्र परिपक्व विचारांबरोबर सखोल चिंतन, सामाजिक जीर्णशीर्णतेविरुद्ध प्रखर चीड, विकृती–विसंगतींच्या नष्टांशाच्या भावनेबरोबरच सामाजिक दैन्य–विषमता–दारिद्र्य याविरूद्ध हिरीरीची बंडखोरी आणि मानवाच्या संवर्धनाबरोबरच माणुसकीच्या गहिवराने प्रेरित झालेल्या अंतःकरणाचे नितळ दर्शन असे अनेक गुणपैलू या भाषणांतून नजरेस पडतात. त्यातून विचारशीलता आणि सृजनात्म्याची ओढ लक्षात येते. सृजनात्म्याची ओढ प्रत्यक्ष कार्यांत प्रतिबिंबित झाल्याचेही आढळते.

एकूण भाषणांची बैठक :

शाहू छत्रपतींची मराठी । इंग्रजी मिळून एकूण पन्नास भाषणे उपलब्ध आहेत. त्यामध्ये तेरा भाषणे समान आहेत; दोहोंकडे सारखी आहेत. म्हणजे ती मराठीत असूनही इंग्रजीत आहेत किंवा इंग्रजीमधील मराठीत आहेत. याचा मतलब हा की, एकूण पन्नास भाषणांमधून तेरा वजा जाता, सदतीस भाषणे समोर येतात. संख्येच्या दृष्टीने राजर्षींची ही निखळ भाषणे होत.

राजर्षींनी पहिले भाषण ३ मे, १८८८ रोजी, कोल्हापूर राज्य रेल्वे बांधणीच्या शुभारंभ प्रसंगी उद्घाटनाच्या निमित्ताने केलेले असून शेवटचे १६ फेब्रुवारी, १९२२ चे अ. भा. अस्पृश्यता परिषदेच्या दिल्ली येथील तिसऱ्या अधिवेशनप्रसंगी अध्यक्षपदावरून केलेले भाषण आहे. म्हणजे शाहू छत्रपतींचे पहिले भाषण, राज्याधिकार स्वीकारण्यापूर्वी, वयाच्या चौदाव्या वर्षी केलेले आहे; तर अखेरचे मृत्यूपूर्वी एकदोन महिन्यांपूर्वीचे आहे. त्यानंतरची मराठी व इंग्रजी भाषणे अनुक्रमे अशी आहेत :

१८८८ : १ । १, १८९३ : – । १, १८९४ : १ । १, १८९५ : – १,
१९०२ : ३ । १, १९०५ : १ । १, १९०६ : – । १, १९०८ : १।–,
१९१२ : – । १, १९१३ : – । १, १९१४ : – । १, १९१६ : १।–,
१९१७ : १ । २, १९१८ : ३ । ३, १९१९ : १ । –, १९२० : ९।४,
१९२१ : – । १, १९२२ : १ । १,

या सर्वांचा विचार करता, शाहू छत्रपतींचा बराच कालखंड, जवळजवळ सतरा वर्षांचा (१८८९, १८९०, १८९१, १८९२, १८९६, १८९७, १८९८, १८९९, १९००, १९०१, १९०३, १९०४, १९०५, १९०९, १९१०, १९११ व १९१५) व्याख्यानांविना दिसतो. व्याख्यानाशिवाय याचा अर्थ, राजर्षींनी व्याख्याने दिली असण्याची शक्यता आहे पण ती आढळात येत नाहीत असा आहे. त्याच शक्यतेची संभाव्यता मोठी आहे.

राजर्षी शाहू सतत लोकसंपर्क ठेवणारे, ' मोठ्या दिलाचे लोकांचे राजे ' होते. ब्रिटिशांचे मांडलिक संस्थानिक असले तरी स्वतःच्या गढीत बसून त्यांनी कारभार हाकला नाही. याचा अर्थ, अनेक समारंभात त्यांची उपस्थिती, त्यांची भाषणे झाली असणार, हे उघड आहे. पण उपलब्ध साधनांवरून १८८४ पासून १९२२ अखेरच्या अडुतीस वर्षांच्या काळातील, काटेकोरपणाने राज्यसूत्रे हाती घेतल्यापासून म्हणजे १८९४ पासून १९२२ अखेरपर्यंत २८ वर्षांच्या काळातील; इंग्रजी–मराठी सदतीस भाषणे उपलब्ध होतात. मधली कित्येक वर्षे कोरी दिसतात. या काळात समारंभ झाल्याच्या, शाहू छत्रपती उपस्थित असल्याच्या नोंदी आढळतात. पण भाषणे मात्र आढळत नाहीत. म्हणजे या कोऱ्या वर्षी, राजर्षी शाहू समारंभांना जाऊनही भाषणे उपलब्ध नाहीत असा त्याचा अर्थ आहे. अशा या भाषणांचे लेखन यथास्थित का झालेले नसावे? त्याचीही काही कारणे संभवतात :

एकतर शाहू महाराजांची बहुतांश भाषणे उत्स्फूर्त आहेत. सर्वसाधारण लोकांच्या समारंभात केलेली भाषणे तर निखालसपणे उत्स्फूर्त आहेत. साहजिकच ती टिपून टाचून ठेवण्याकडे लक्ष कमी गेलेले दिसते. दुसरे, शाहू राजाबद्दलची लोकांची आसक्ती इतकी मोठी आहे की आमच्या समारंभाला राजा आला; याचेच लोकांना अपरंपार कवतिक आहे. त्यामुळे आपल्याबरोबर आपल्या भावी पिढ्यांसाठीही काही करीत असलेल्या राजाचे विचार, किमानपक्षी ' त्यांच्या ' साठी राखून ठेवण्याची जबाबदारी आपली आहे; याचे समारंभाच्या संयोजकांना थोडेही भान नाही. त्यामुळे ऐकले, कानात साठवले, स्मरणात राहिले ते खरे; ही दृष्टी प्रभावी ठरली. तिसरे, समारंभाचा डामडौलही या शाश्वत बाजूकडे दुर्लक्ष करावयास कारण ठरला आहे. सर्वसामान्य मानवी स्वभावच तिथे प्रभावी बनला आहे. चौथे असे की, एकूण बहुजन समाजाची शैक्षणिक महत्ता इतकी थिटी की, राजा सांगतो आहे ते नोंद करून ठेवण्याची अनास्था अधिक राहिली आहे. पाचवेही एक कारण संभवते ते हे की, प्रसिद्धीची बहुतांश साधने विरोधकांच्या हातात. राजर्षींच्या ध्येयधोरणांमुळे त्यात कडवटपणा आलेला. जी थोडी पाठिंबा देणारी साधने हातात ती प्रायः चळवळीच्या गदारोळात गढलेली. त्याचा परिणाम हे विचारधन दुर्लक्षित होण्यात झाले असावे असे दिसते.

त्यामुळे दिल्ली, कानपूर, नवसारी, नागपूर, भावनगर, हुबळी, मुंबई यांसारख्या मोठ्या शहरांतील परिषद / अधिवेशनांतून शाहू महाराजांनी केलेली भाषणे उपलब्ध आहेत. पण त्यापैकी काही ज्या स्वरूपात आहेत त्या स्वरूपात ती पूर्ण आहेत, शाहू महाराजांना सर्वांगानी प्रकट करणारी आहेत असे मात्र वाटत नाही. अन्य अनेक भाषणे तर तुकड्यातुकड्यांचीच वाटतात. त्यादृष्टीने, एकूण समाजाचेच हे एक मोठे नुकसान आहे; ते मानले पाहिजे.

शाहू छत्रपतींच्या दूरवर झालेल्या काही भाषणांची माहिती व पार्श्वभूमी पुढेमागे अधिक मिळण्याची शक्यता नाकारता येत नाही. कानपूर, नवसारी, दिल्ली, भावनगर यांसारख्या शहरांतून झालेल्या सभा-परिषदांतून राजर्षींनी केलेल्या भाषणांचे वृत्तांत, काही अधिक मुद्दे देऊन जाण्याची शक्यताही आहे. पण असे अधिक काही, पुढे अधिक देऊन जाणारे असले तरी सध्या हाती आहे त्याचेच साहाय्य घेणे एवढेच तूर्त शक्य आहे.

## बहुढंगी रगेल व्यक्तिमत्त्व :

जे हाती आहे त्यामधून शाहू छत्रपतींच्या व्यक्तिमत्त्वासंबंधी काही गोष्टी समजून येतात :

त्यामध्ये अरबूज समजल्या जाणाऱ्या शाहू छत्रपतींच्या व्यक्तिमत्त्वाला व्यासंगाची जोड होती, हा अग्रक्रमाचा पैलू होय. त्यामध्ये अरबूजपणाला, रांगडेपणाला धक्का आहे. वस्तुस्थिती अशी आढळते की, विद्वानांची कदर आणि उत्तमोत्तम ग्रंथकारांच्या ग्रंथांच्या परिशीलनाची राजर्षींना आस्था होती. इंग्रजी व संस्कृत भाषांवर त्यांचे प्रभुत्व होते. मराठी त्यांची मातृभाषाच होती. राजर्षींनी ब्रिटिश अधिकाऱ्यांशी केलेल्या इंग्रजी पत्रव्यवहारांवरून ओझरती नजर टाकली की, त्यांच्या इंग्रजीवरील प्रभुत्वाचे-त्यामधील खाचाखोचांसह असलेल्या प्राविण्याचे-सहज दर्शन होते. शाहू छत्रपतींनी 'देशी' शिक्षणाव्यतिरिक्त उच्च शिक्षण घेण्यासाठी इंग्लंडला जावे, असा ब्रिटिश शासनाकडून दबाव येतो. ज्या चार मुद्यांवर आग्रही राहून ब्रिटिश शासन शाहू छत्रपतीनी इंग्लंडला जावे असे म्हणते त्या संबंधात त्यांनी गव्हर्नर लॉर्ड हॅरिसला, धारवाडहून ७ जुलै, १८९२ रोजी पत्र लिहून खुलासा केला आहे. शाहू छत्रपतीनी अत्यंत प्रभावीपणे, कुठेही मन दुखावणार नाही किंवा इंग्लंडला जाण्याचे आपण मुद्दाम टाळत आहोत असा ग्रह होणार नाही अशा खुबीने, सध्या इंग्लंडला जाणे का इष्ट नाही हे त्यात पटवून दिले आहे. त्यामधील चातुर्य, इंग्रजी भाषेच्या लालित्यासह वेधक आहे. ज्या तलमरीतीने आणि सावधपणे हे होत

त्यामधील युक्तिवाद, सहजता आणि नाखुषीही खुबीने दाखविण्यामागची प्रगल्भता लक्षणीय आहे. संस्कृतबद्दलची आठवण तर प्रसिद्धच आहे. १९०२ मध्ये केंब्रिज विद्यापीठाने राजर्षींना एल् एल् डी ची पदवी दिली. पदवी प्रदानाच्या वेळी विद्यापीठाच्या कुलगुरुंनी लॅटिनमध्ये भाषण केले. राजर्षींनी उत्स्फूर्तपणे त्यास संस्कृतमधून उत्तर दिले. मराठीबद्दल प्रश्नच नव्हता. शाहू छत्रपती नागर मराठी बोलू शकत होतेच पण अस्सल गावरान मऱ्हाटमोळया मऱ्हाठी शैलीचा ऐटबाज थाटही उडवित असल्याने 'रांगडा राजा,' 'धेडगुजरी,' 'संस्कृतीचा गंध नसलेला गावढळ माणूस' वगैरे वगैरे किताबही असंतुष्टांकडून बहाल केले जात होते. शाहू छत्रपतींची, यामागची भूमिका तद्‌विषयीच्या लोकशाही मनोवृत्तीमधून स्वच्छ होते. ती गोष्ट ही की, हा राजा प्रजेचा होता आणि जे जे प्रजेचे ते ते या राजाचे होते. राजा प्रजेविना वेगळा नव्हता आणि प्रजा ' राजा 'च होती. गोष्ट एवढीच आहे; मात्र त्यामध्ये मोठा अर्थ आहे. तो परिवर्तनाकडे दृष्टी लावून आहे. रांगडया भाषेचा व्यवहार जनतेशी केल्या जाणाऱ्या व्यवहाराच्या बाबतीत आहे, अधिकतर ' राजवाडया ' तील खासगत व्यवहारांशी निगडित आहे. अन्यत्र पाहून घ्यावा असा प्रगल्भ शैलीचा सुसंस्कृत व्यवहार आहे. त्याचे पुरावे शाहू छत्रपतींच्या भाषणांतून । पत्रव्यवहारांमधून सहज दृष्टीस पडतात.

शाहू छत्रपती सामान्यांचे प्रतिनिधीत्व करीत होते; साहजिकच जवळ त्याव्यतिरिक्त काही असूनही, सामान्यांच्या शैलीत वर्तन करावे ही राजर्षींची दृष्टी होती. कारण त्यामुळे सामान्यांशी अधिक जवळिक होणे शक्य होते; आणि हाती घेतलेल्या कार्याला उभारी मिळण्याची शक्यता होती. शाहू छत्रपतीनी ते साधले. मर्मस्थळे शोधून त्यावर स्वार होण्याची राजर्षींची हातोटी विलक्षण होती. त्यात सच्च्या नेतृत्वाचे उत्तम भान होते.

शाहू छत्रपती ' रांगडे ' खरे, राकटही तसेच; पण कला, कलावंत, विद्वत्ता इत्यादी बाबतीतली त्यांची चहा ही, रांगडया राकटपणाला छेदून पलिकडे जाणारी आहे. मॅक्स–मुलरपासून व्हीस डेव्हिसपर्यन्तच्या कित्येक पाश्चात्य संस्कृत पंडितांनी वैदिक वाङ्‌मयावर लिहिलेल्या संशोधनात्मक ग्रंथांचे त्यांनी गाढ अवलोकन केल्याचे दिसते. समाजशास्त्रावरील तत्कालीन उत्तमोत्तम ग्रंथांचे त्यांचे परिशिलन चिकित्सक होतेच, पण फरेजर यांनी ' मंदबुद्धी ' म्हणून ' गौरव ' केलेल्या राजर्षींचे—आपल्या या विद्यार्थ्याचे—पाठांतरही दांडगे होते. समाजशास्त्र किंवा अन्य ग्रंथ यामधील महत्त्वाच्या इंग्रजी ग्रंथांमधील पॅरेग्राफच्या पॅरेग्राफ राजर्षी उद्‌धृत करू शकत. साहित्यसम्राट न. चिं. केळकर यांनी त्याबद्दल राजर्षींचा गौरवही केला आहे. राजर्षींच्या या व्यासंगशीलतेबद्दल ' प्रबोधन ' कार के. सी. ठाकरे यांनी ' भिक्षुकशाहीचे बंड ' च्या लेखनाच्या वेळी आलेला अनुभव

' माझी जीवनकथा ' ( पृ. २५० ) मध्ये तपशिलाने नमूद केला आहे. प्रबोधनकारांनी सांगितलेले हे एक उदाहरण झाले. अशी अनेक सापडतात. या साऱ्यांचा अर्थ हा आहे की, स्वतःला सुसंस्कृत म्हणविणाऱ्या उच्चभ्रू मंडळींच्या दृष्टीतून शाहू छत्रपती ' रांगडे ' होते. तसे मानले जात होते; पसरविले जात होते. त्यामुळे जनमतानुसारही ते ' दाणगट ' च होते. पण अंतर्यामीची गोष्ट अशी आहे की, शाहू छत्रपती सुसंस्कृत,, अभिजात आणि परिवर्तनशील होते. व्यक्तिमत्त्व दुभंगलेले नव्हते पण एकाच गुणसमृद्ध व्यक्तिमत्वात अनेक परीची कित्येक व्यक्तिमत्वे सामावलेली होती. म्हणून केवळ वरच्यावर ' रांगडेपणा ' तून काढले जाणारे व्यापक निष्कर्ष अयथार्थ ठरतात; गोत्र जुळत नाही.

त्याचा उलगडा असा की, शाहू छत्रपतींचा व्यासंग मोठा होता. निरीक्षण सूक्ष्म होते. अवलोकन दाट होते, कार्यशक्ती जबर होती, आकर्षणशक्ती दांडगी होती, ध्येयदृष्टी निश्चित होती. मुत्सद्दीपण अजोड होते. फक्त बहाणा वेगळा होता. राजा या नात्याने, लोकनेता या नात्याने, सारे आकाशासारखे उघडेवाघडे होते. राजर्षीजवळ कौशल्य होते. ' टॅक्ट ' होती; पण छपाछपी, आडपडदा कुठेही नव्हता. पाटी कोरी होती. जीवनग्रंथाचे कुठलेही पान उघडावे, आणि न्याहाळावे, ' महाकाय ' शाहू छत्रपती इतक्याच महाकाय कर्तृत्वाच्या, उरीपोटी भेटीने समाधान लाभावे; अशीच मुळी राजर्षींची प्रचंडता आहे. खरे तर, परिस्थितीच्या प्रचंड गुंतागुंतीने, मानवी हिशेबच पार खावून टाकावेत; धुळीला मिळवावेत; अशा कालौघात उभे राहून, शाहू छत्रपतींनी, मानवी संस्कृतीवर उगवलेली बांडगुळे तळामुळापासून कापून काढली. त्यामध्ये, लोककल्याणाच्या निखळ भावनेखेरीज वैयक्तिक काहीही नव्हते. सार्वत्रिक समाजक्रांतीखेरीज नव्हता द्वेष, नव्हता मत्सर, नव्हता राग; काहीच नव्हते. विषादपूर्ण काही असेलच तर ओघात घडून गेलेले, हेतुपूर्वक काहीच नाही. त्यामधील बरवेपण शाश्वत तर वाईटपण तात्कालिक आहे, असतेही. आनुषंगिक बाबींना मंत्रसामर्थ्याचे केंद्र मानून न्याय करण्याने न्याय होत नाही, अन्याय होतो. सर्वांगांनी समाधान लाभण्यासाठी लक्ष्यबिंदू नेमकेपणाने टिपावा लागतो. सोडून चालत नाही. राजर्षींबद्दलचे नव्हे तर सर्वच थोरांबद्दल ते व्हावे लागते. ही नोंद म्हणून विशेष महत्त्वाची.

शाहू छत्रपती ' मांडलिक संस्थानिक ' असले तरी मुरब्बी मुत्सद्दी होते. सत्ता माणसाला उन्मत्त बनविते, भरड करते. सत्तेला चिकटलेले हे गुण असतात. राजर्षींनी त्याचा पिळा करून ते बाजूला ठेवले. जवळ बाळगते तर ' लोकांचे राजे' बनले नसते ! कसे शक्य होते ? मागच्या पुढच्या इतिहासाची पर्वे, विराट लाटांप्रमाणे हेलावत होती. सर्वसाधारण

समाजाच्या दुर्दशेच्या दरीची प्रखर जाणीव मन कुरतडत होते.सर्वरीतीच्या गुलामगिरीला चूड लावून आर्यत्वपोषक आधुनिकतेचा पदर पकडण्याची ओढ होती. डोळ्याला कसलीच आंधूळणी झालेली नव्हती, पण ब्रिटिशांचे मांडलिक संस्थानिकत्व चिकटलेले असल्याने कार्य–कर्तृत्वास कित्येक मर्यादा होत्या.

शाहू छत्रपतींच्या कर्तृत्वाला मर्यादा नव्हत्या तरीही कर्तृत्व गाजविण्यासाठी जे अधिकार वापरावयाचे होते त्यांना जरूर मर्यादा होत्या. ब्रिटिशांशी सरळ सरळ संघर्ष वर्ज्य होता. सरळ संघर्षाने राज्यच लयाला जाण्याची भीती होती. आणि राज्यसत्तेचे अधिष्ठान वगळून लोकसेवेला बळ प्राप्त होणे कठीण होते. राजेपद स्वतःच्या ख्यालीखुशालीसाठी नव्हे तर लोकांच्या हितासाठी वापरावयाचे होते. हिंदुस्थानात, त्या काळी ख्यालीखुशाली अनेकजण करीतच होते. शाहू छत्रपतीनी तेच केले असते तर त्यामध्ये अधिक रंग आली असती आणि असलेल्या व नसलेल्या दंतकथांना खऱ्याखुऱ्या कथांचे मखर चढविले गेले असते. त्याहून अधिक काहीच घडले नसते. पण राजर्षींना ते करावयाचे नव्हते. त्यांची ती दृष्टी नव्हती.त्यांना लोकांचे अंग आणि मन वाढविणारी ख्यालीखुशाली सांभाळावयाची होती, त्यांनी ती जोपासली. सामना ब्रिटिशांशी असल्याने मामला धीराचा आणि धीम्या वृत्तीचा होता. कसलीही आणि कुठलीही कुरापत काढून संस्थान गुंडाळणे ब्रिटिशांना अवघड नव्हते. राजेपद : लोकसेवेचे एक साधन; ते भोगावे, जनतेच्या नावावर भोगावे अशी वांछा नव्हती. राजर्षींच्या दृष्टीने राजेपद महत्त्वाचे नव्हतेच, नगण्यच होते; पण लोकसेवेसाठी ते टिकविणे जरूर होते. ते मुत्सद्दीपणाने टिकवून शाहू छत्रपतीनी लोकसेवेचा आदर्श निर्माण केला. त्याकामी 'ठंडा करके खाओ' आणि 'पडते घेऊन राखाओ' ही सूत्रे होती. येणाऱ्या आक्रमक हल्ल्यासाठी ते जरूर होते, राजर्षींनी ते हेतुपूर्वक राखले, जोपासले. त्यामध्ये ब्रिटिशांचा हालातोला बघून वागण्याचे धूर्तपण होते; मैत्रीही होती पण ब्रिटिश-निष्ठा नव्हती. शाहू छत्रपती सारखा अव्वल दर्जाचा राज्यकर्ता कोणत्या उच्च प्रतीचे मुत्सद्दीपण राखून असत', त्याचे राजर्षींची ब्रिटिश-निष्ठा हे अव्वल प्रमाण होते निष्ठेचे हे बाहुले रानातील बुजगावण्यासारखे होते, खोटे होते; साहजिकच त्यावर आधारलेले शाहू छत्रपतींचे 'स्वराज्यद्रोही' पण तकलादू ठरते. आरोप-प्रत्यारोपांची बांधणी करताना पुराव्यांची पक्की बैठक गच्चपणे चिरेबंदी करावी लागते. राजर्षींच्या बाबतीत हे अभावाने घडले. मात्र काळाने राजर्षी नेमक्या वाटेवर होते हे सिद्ध केले आहे. अधिशहा ब्रिटिशांना सांभाळून शाहू छत्रपतीनी राजेपदाला ढळ लागू दिला नाही, त्यामुळे लोकसेवेची गती रोधली गेली नाही. शाहू छत्रपतींची लोकसेवेची आकांक्षा आणि रग ध्यानात घेता राजेपद नसताही कदाचित् ती घडू शकली असती पण राजेपदामुळे तिला जो जोश आणि गती आली ती त्या सिंहासनाविना मिळू शकली असती की नाही, याची

शंका वाटते. जरतारीचा पदर कल्पनारम्य असतो, पण कधी कधी तो चित्र स्पष्टही करतो. आणखी एक असे आहे : शाहू छत्रपती राजेपदासंबंधी सामान्य माणसांच्या मनात असलेल्या सर्वसाधारण आपुलकीच्या भावना मनात राखून सेवाकार्य करीत होते.

त्यामध्ये भावनांचा आदरेखून आदर होता, त्यातून प्रयत्नेकरून कार्य साधण्याची दृष्टी होती, आणि त्या भावनांना धक्का देऊन कार्याकडेच कसे पाहावे याचा प्रयत्नही होता; दोन्हीही होते. ' अगा जे नवलचि घडत आहे ' अशा कुतूहलमिश्रित कौतुकात असलेल्या, काहीशा भांबावलेल्या, सर्वसामान्याला 'सह' नेण्याची क्रिया, राजेपदासकट राजर्षी अंगिकारीत होते. राजेपद असण्याने फायदाच होता. नसण्याने हातातील साधनसामग्रीचे दोर सैल पडणार होते. त्यामुळे, कदाचित् शाहू छत्रपतींच्या विरोधकांची भूते फेर धरून नाचली असती आणि रगदार राजर्षी शाहूंना विरक्तीचा झटका येऊन गेला असता ! असे घडले नसतेच असे नाही. काय घडले असते ते काळाच्या उदरातच गुडूप होऊन राहिलेले असले तरी त्याची कल्पना करता येते. आधार आणि सामग्री सारीच संपल्यावर वितराग बनणे अस्वाभाविक नसते. शाहू छत्रपतींच्या बाबतीतही हे घडू शकले असते. पण राजर्षींची मुत्सद्देगिरी आणि ब्रिटिशांचा सरंजामशाहीतील उदारमतवाद यामुळे ते कठीण बनले. शाहू छत्रपती ब्रिटिशाहून मुत्सद्देगिरीत श्रेष्ठ ठरले. आणि त्यांच्याच आश्रयाने, त्यांनी लोकजागृतीचा जो आगडोंब उसळविला; त्यातून लोकांनी आपल्या उद्धारासकट स्वराज्याची चळवळ जवळ आणली. पारतंत्र्याला चूड लावली. शाहू छत्रपतींनी, कोल्हापूर संस्थानातील जनतेला स्वतःच्या उद्धाराचा शिकविलेला मंत्र हा ' पारतंत्र्य ' फेकून देण्याचाच एक प्रकार होता. अमूक एक चांगले आणि अमूक एक बरे किंवा वाईट असे पारतंत्र्याबाबत काहीच नसते. पारतंत्र्य हे पारतंत्र्यच असते आणि दर एक ठिकाणी ते नडतच असते. राजर्षींनी, लोकांना बरोबर घेऊन, त्यांच्या 'सहभागा'ने स्वतःच्या संस्थानातील प्रजेच्या पारतंत्र्याला लावलेली चूड व्यापक अर्थाने देशाच्या पारतंत्र्यालाही लावलेली होती. पारतंत्र्य नावडणाऱ्याला इथून तिथून कुठलेच पारतंत्र्य आवडत नसते. राजर्षींच्या भाषणांतून/पत्रव्यवहारांतून हा अन्वयार्थ वाचता आला पाहिजे. केवळ झोडपण्याने, काणाडोळा करण्याने किंवा विकृत रचनेने हे वाचन करता येत नाही.

शाहू छत्रपतींचे सर्वंकष व्यक्तिमत्व, सर्वस्पर्शी विचार आणि दूरपरिणामी लोककार्य हे त्यांच्या राजेपदाच्या बैठकीतून, मुत्सद्देगिरीने उपजलेले देवदत्त कार्य आहे. इतिहासदत्त देणे आहे. जीवीच्या जिव्हाळ्याने फुललेला तो मार्गदर्शक इतिहास आहे. तो घडला, तो काळ एकोणिसाव्या शतकाचा उत्तरार्ध आणि विसाव्या शतकाचा पूर्वार्ध होता. राजर्षी

शाहूंचा जन्म २६ जुलै, १८७४ मधला. १७ मार्च, १८८४ मध्ये त्यांचे दत्तकविधान झाले आणि २ एप्रिल, १८९४ मध्ये त्यांनी राज्यसूत्रे हाती घेतली' हचा सगळ्या घटना एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धातील आहेत. ६ मे, १९२२ साली मुंबईच्या ' पन्हाळा लॉज ' मध्ये राजर्षींचे देहावसान झाले. ही अखेर, विसाव्या शतकाच्या पूर्वार्धातील आहे. शाहू छत्रपतींचा हा कालखंड स्थूलमानाने एकोणिसाव्या – विसाव्या शतकाच्या उत्तरार्ध–पूर्वार्धातील आहे. म्हणजे त्यापूर्वीच्या कालखंडात राजर्षींच्या कार्याचे बीज तर त्यानंतरच्या कालखंडावर राजर्षींच्या कार्यांचे दीर्घसूत्री परिणाम आहेत. त्यासाठी थोडे मागे वळून पहावे लागते.

## शाहूपूर्व काळाचे परिशिलन :

सन १८१८ मध्ये पेशवाई बुडाली, मराठी साम्राज्याची अखेर झाली. ब्रिटिश अधिसत्ता अप्रतिहतपणे राज्य करू लागली. मात्र पेशवाईचे परिणाम महाराष्ट्राला ग्रासून राहिलेले होते व आठवतही होते. " पेशवाईचे वर्णन करावयाचे झाले तर ते दंगेधोपे, लढाया, युद्धे, दानधर्म, हव्यकव्य हयांच्या दंगलीचा काळ असे थोडक्यात करता येईल. भिक्षुक, शास्त्रीपंडित, हरिदास, पुराणिक हया सर्वांचे उच्च ग्रह एकादशस्थानी हया काळात आले होते असे वाटते. अन्नसंतर्पण, दाने, व्रतवैकल्ये, प्रायश्चित वगैरे प्रकार सारखे चालू होते. द्रव्याला स्पर्श न करणाऱ्या संन्याशांच्या समोरही द्रव्याच्या राशि पडत. आजार घालविण्याकरिता अनेक तोडगे करीत. दानधर्मापेक्षा तोडग्याचा उपाय हीन संस्कृतिदर्शक आहे. (तरीही) शिशाची यंत्रे आजारी मुलाच्या गळयात बांधली म्हणजे रोगपरिहार होतो अशी समजूत होती. ह्याखेरीज दारू व मांस अंगावरून ओवाळून टाकीत ...... महामारीचे अनुष्ठान, प्रदक्षिणेचे अनुष्ठान, पर्जन्यासाठी अनुष्ठान अशी नाना प्रकारची अनुष्ठाने मोठया कष्टाने करण्यात येत ... गाईच्या गळयात दावे असताना तिचा प्राण जाऊ देणे ... नालबंद घोडा मरण पावणे ... हे पापदायक समजत ... (ते) पाप समजून पायश्चित घ्यावे लागे . . . ज्योतिषावर विश्वास बराच होता. . . . प्रत्येक कृत्य मुहूर्त पाहून होत असे . . . सहस्त्रभोजने वारंवार होत. पण लक्षभोजनेही घालण्यात येत . . . पेशव्यांची श्रावणमास दक्षणा सर्व हिंदुस्थानभर गाजत होती. (तर) मनुष्याची खरेदीविक्री पेशवाई अखेरपर्यंत चालू होती..." असे श्री. ना. चाफेकर यानी 'पेशवाईच्या सावलीत ' (पृ. ४६, ४९ व ५२ ) मध्ये नमूद करून ठेवले आहे; यावरून पेशवाईमध्ये सर्वसाधारण बाबींबाबत मोठी अंदाधुंदी होती आणि त्या अंदाधुंदीला धार्मिक कडा होती. त्यामुळे तीव्रताही वाढत होती. लो. टिळकांनीच निर्देश केलेल्याप्रमाणे असे हे, ' ब्राह्मणी राज्य ' नष्ट झाले तरी त्याचे

परिणाम मात्र राहिलेच. क्रिया झटपट होऊन जाते, पण दृश्य–अदृश्य परिणाम वातावरण धरून असतात. ते, तेवढीच प्रभावी क्रिया घडल्याखेरीज 'झाड' सोडत नाहीत. 'झाड' धरलेले आहे, उपाय थांबलेले नाहीत, धरणे सुटण्याची चिन्हे नाहीत; या पार्श्वभूमीवर शाहू छत्रपतींचा उदय झाला आहे.

पेशवाई संपुष्टात आल्यानंतरच्या पाऊणशे वर्षांच्या काळात हिंदुस्थान आणि महाराष्ट्र यामध्ये राजकीय संक्रमणाबरोबर सामाजिक संक्रमणही होऊ लागले होते. इंग्रजी भाषा, पाश्चात्य रीतिरिवाज आणि जीवनपद्धती, कायद्याचे अधिराज्य, एकसूत्री आणि एकतंत्री राज्यकारभार, दळणवळण व वाहतूक यांचा सर्वदूर वाढता प्रसार, त्यामुळे लाभलेली शांतता, मिळालेले स्वास्थ्य आणि विचारप्रक्रियेला व जीवनरीतीला मिळालेली गती इत्यादी गोष्टींमुळे भारतीय समाज ढवळून निघाला. ब्रिटिशामुळेच व्यक्तिस्वातंत्र्य, विचार स्वातंत्र्य, बुद्धीप्रामाण्य, ऐहिकतेचे सुखसंवर्धन इत्यादी कल्पना, तत्त्वज्ञानाच्या स्वरूपात भारतीय समाजाला पहिल्यांदाच परिचित झाल्या. त्यातूनच स्त्रीदास्य, त्याचे घटक: बालविवाह, जरठ कुमारी विवाह, विधवाविवाह, प्रेमविवाह, केशवपन वगैरे समस्यांविषयी विचारमंथन होऊ लागले. परिणामी शब्दप्रामाण्य, अंधश्रद्धा, अज्ञान, जीर्णशीर्ण रूढी यांना तडे जाऊ लागले. सामाजिक अभिसरणाच्या प्रक्रियेला आस्ते कदम प्रारंभ झाला.

त्या दृष्टीने महाराष्ट्रातील तत्कालीन समाजसुधारणा, राजकीय मतप्रवाह आणि धार्मिक गुलामगिरी यासंबंधात विचार करता, ब्रिटिश सत्तेच्या अधिपत्यानंतर नव्या विचारांचा प्रादुर्भाव, त्यानंतर साधारणपणे चाळीस वर्षांनी झाल्याचे आढळते. बाळशास्त्री जांभेकरांच्या 'दर्पण' पाक्षिकाने नव्या विचारांच्या प्रभातकाळास प्रारंभ केला. जाने, १८३२ मध्ये 'दर्पण' हे इंग्रजी व मराठी अशा दोन्ही भाषांत मराठी वृत्तपत्र निघाले; 'दर्पण' आणि त्यानंतर १८४० मध्ये निघालेल्या 'दिग्दर्शन' नावाच्या मासिकाने मराठी वृत्तपत्र व्यवसायाचा पाया घातला असे नव्हे तर स्वतंत्र विचारप्रक्रियेची मुहूर्तमेढही रोवली. 'दर्पण' चा हेतू, मत किंवा वृत्त देणे एवढाच नव्हता तर अनेक विद्यांचा अभ्यास, प्रसार आणि व्यासंग करणे हा होता. त्याचे परिणाम महाराष्ट्राच्या जीवनावर झाले. बाळशास्त्र्यांनी फक्त मराठी नियतकालिकांचाच पाया घातला नाही तर शेषाद्री नारायण या ख्रिस्ताळलेल्या विद्यार्थ्याचे शुद्धीकरण करून पुन: त्याला स्वधर्मात आणले. स्त्रीदास्याचा निषेध केला. विधवाविवाहाचा पुरस्कार केला. नियतकालिके, पतितपरावर्तन आणि विधवाविवाह या, तीन शाखांत महाराष्ट्राने केलेल्या प्रगतीचे श्रेय, आद्यप्रवर्तक म्हणून जांभेकरांच्याकडे जाते; हे लक्षात घ्यायला हवे. पण जांभेकरांच्या

संदर्भात विचार करताना वृत्तपत्राच्या अनुषंगानेच, विचार करण्याची प्रथा राखली गेल्याने, त्यांचे आद्य प्रवर्तन करणारे इतर कार्य दुर्लक्षिले जाते. २२ जून, १८४४ मध्ये दादोबा पांडुरंग तर्खडकर यांनी सुरत येथे ' मानवधर्म सभा ' स्थापन केली. मुंबईला, १८४९ मध्ये, याच ' मानवधर्म सभे ' ची ' परमहंस सभा ' ही सुधारित आवृत्ती निघाली. दादोबा पांडुरंग हेच त्याचे निर्माते होते. साऱ्या सृष्टीचा निर्माता आणि नियंता एक ईश्वर आहे, मनुष्यमात्राची जाती व धर्म एकच आहे, विवेकाला अनुसरून कर्म करावे इत्यादी तत्त्वे, ' परमहंस सभे'ने स्वीकारली होती. बारीक सारीक असे प्रयत्न सुरू असताना जांभेकरांची ' दर्पण ' ची परंपरा गोपाळ हरी देशमुख उर्फ लोकहितवादी यांनी पुढे चालविली. भाऊ महाजन यांच्या 'प्रभाकर' पत्रामधून लोकहितवादींनी ' शतपत्रे ' लिहिली. १८४८ मध्ये. रूढ अर्थानें, 'शतपत्रे' शंभर असल्याचे मानले गेले असले तरी मुळात ती एकशेआठ आहेत. पैकी १०१ व्या पत्रामध्ये ' शतपत्रांचा इत्यर्थ ' लोकहितवादींनी समजाऊन सांगितला आहे. सामाजिक जाणिवेने प्रेरित होऊन, लोकहितवादींनी आपल्या चौफेर लेखनातून, समाजातील जातिभेद, बालविवाह, जरठकुमारी विवाह, नेटिव्ह अंमलदारांचा उद्दामपणा, अस्थानी व अपात्री दानधर्म, व्रतवैकल्यांचा धुमाकूळ, हिंदुस्थानच्या पराधीनतेची कारणे इंग्रजी राज्याच्या ' दैवी देणगी ' मागची कल्पना, देव, दैव आणि दैववाद यामुळे भौतिक जीवन व धर्म यामध्ये झालेली गल्लत व आलेले गतानुगतिकत्व, यांत्रिक युग आणि नवविचारांचा अभाव यामुळे सर्जनाची मंदावलेली दृष्टी, हिंदु लोकांची द्रव्योपयोगाविषयीची समजूत, हिंदू लोकांचा व्यापार, विधिनिषेधरूपधर्माचे मूळ अशा अनेक विषयांवर त्यांनी प्रखरतेने लिहिले. त्याचबरोबर त्यांनी जातिनिरपेक्ष आणि वर्गनिरपेक्ष संसदीय लोकशाहीचा, तसेच स्त्रीशिक्षण व विधवाविवाह यांचा पुरस्कारही केला. आत्यंतिक तळमळीच्या उत्कट भावनेने लोकहितवादींनी हे केले. पण विष्णुशास्त्री चिपळूणकरांचा देशाभिमान जसा प्राय: ' भाषामय ' होता त्याचप्रमाणे लोकहितवादींची वाणी आणि लेखणी जितकी तिखट आणि जहाल होती तितकीच वृत्ती आणि कृती पोचट आणि मवाळ होती. आचार–विचारात संगती असली की सांगण्याला कवचकुंडले प्राप्त होतात. विसंगती आली की कवचकुंडले हरवून बसलेल्या कर्णासारखी दीन अवस्था होते. लोकहितवादींच्या समाजजीवनविषयक लेखनाचे तसेच झाले. दरम्यान स्वदेश, स्वधर्म आणि स्वभाषा तसेच शील, स्वातंत्र्य आणि स्वाभिमान या मूलतत्त्वांबाबत, कुठेही तडजोड न करणाऱ्या, पूर्वपरंपरेची अनिवार हौस बाळगणाऱ्या रसलोलुप वृत्तीच्या विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्या विजीगीषु लेखनाच्या गौरवात आणि त्यांच्या विध्वंसकवृत्तीच्या टीकापद्धतीत विचारवंत इतके गुंतून पडले की, लोकहितवादींचे त्यांना भानच राहिले नाही. आधुनिक मराठीमधील सुडौल,पक्व,प्रौढ व प्रतिष्ठित निबंधाचे जनक विष्णुशास्त्री ठरविले

जात असताना लोकहितवादी 'मराठी निबंधाचे आद्य जनक' ठरतात, हे टाळले गेले. पण उत्तम रसिक प्रचारक असलेल्या विष्णुशास्त्र्यांच्या सत्यप्रियवृत्तीला निर्भयतेची जोड मिळाल्याने त्यांच्या प्रतिपादनाला उर्जस्वलता आणि शैलीला आक्रमकता लाभलेली असली, बुद्धिप्रागल्भ्य, सद्वर्तनासंबंधीची आस्था आणि आपला देश व आपले लोक यांच्या हितबुद्धीची अनिवार कळकळ त्यांच्या स्वातंत्र्यवादी लेखनातून प्रकट होत असली तरी प्रगतिपर सुधारणांच्या सक्रियतेच्या दृष्टीने सोडाच पण केवळ प्रतिपादनाच्या दृष्टीनेही त्यांच्या विचारातील कोतेपणा किंवा व्यापक दृष्टीचा अभाव, हे प्रगतिपर समाजाला जीवनवर्धक ठरले नाहीत. चिंतनशील अभ्यासकापेक्षा हमेशा शूर लढवय्याच्या पवित्र्यात असलेल्या चिपळूणकरांच्या लेखनात विकारवशतेबरोबर उज्ज्वल आशावादाचे प्रोत्साहक दर्शन असले तरी सनातन, पारंपारिक मूल्यरक्षणाचे काम ते प्राणपणाने करतात हे विसरून चालत नाही.

म. जोतिबा फुले यांनी, हिंदुस्थानच्या इतिहासामध्ये पहिल्यांदाच ठणकावून आणि दणकावून 'सार्वजनिक सत्यधर्म' सांगितला. सांगितला आणि आचरिला. म्हणून फुल्यांचे महत्त्व दुहेरी आहे. फुले एकांगी नाहीत, अनेकांगी आहेत; जोतिबांनी १८५४ मध्ये पहिली मुलींची शाळा उघडली. १८५५ मध्ये महार–मांगांच्या मुलांसाठी व कामगारांसाठी रात्रीची शाळा खोलली. १८६० मध्ये 'बालहत्या प्रतिबंधक गृह' स्थापन केले. आणि काशीबाई ह्या ब्राह्मण विधवेला झालेला मुलगा 'यशवंत' ह्यास दत्तक घेतला. जोतिबांनी १८६८ मध्ये स्वतःच्या घरातील हौद अस्पृश्यांना खुला केला. २४ सप्टेंबर, १८७३ मध्ये 'सत्यशोधक समाजा' ची स्थापना करून १. ईश्वर एक आहे. २. त्याच्या भेटीसाठी 'दलाला' ची गरज नाही. आणि ३. जातीवरून नव्हे तर गुणांवरून माणसाची श्रेष्ठता मापली पाहिजे; अशी तीन सूत्रे सांगितली. उपनिषद्‌काळानंतर प्रचलित हिंदू ग्रंथाविरुद्ध एवढा लखलखित असा हा आविष्कार एकमेव होय. त्याआधारे फुल्यांनी सामाजिक विषमता अज्ञान, रूढी, अंधश्रद्धा याविरूद्ध बंड उभारले. 'सार्वजनिक सत्यधर्म', 'गुलामगिरी' 'शेतकऱ्याचा असूड' यासारख्या छोटयाखानी पण बहुगुणी ग्रंथांमध्ये फुल्यांच्या विचारांचे 'सार' समाविष्ट झाले आहे.

म. फुल्यांनी, शिक्षणविषयक 'झिरपणी सिद्धांता' ला विरोध केला. 'वरून खाली शिक्षण कसले देता ? ते खालून वर गेले पाहिजे. सरकारने कनिष्ठ वर्गातील लोकांच्या शिक्षणाची आबाळ केली आहे,' असे ब्रिटिश शासनाला ठणकावून सांगणारे फुले यांच्याखेरीज, त्याकाळी अन्य कुणी प्रवक्ते नव्हते ! समाजातल्या साऱ्या थरांतील

हीनदीनांच्या उद्धाराची उत्कट तळमळ, समाजातल्या अवघड सुधारणांना निर्भयपणे हात घालण्याचे विलक्षण मनोधैर्य, त्यासाठी कोणताही धोका पत्करण्याची आणि त्याग करण्याची कडोविकडीची जिद्द, ' बोले तैसा चाले ' ची निर्भयवृत्ती; निर्लोभ, निरहंकारी, अनृण बाळगण्याची प्रवृत्ती इत्यादी असामान्य गुणांमुळे, समाजक्रांतीचा अग्रणी आणि संघटक म्हणून महाराष्ट्राच्या आधुनिक इतिहासातील म. फुल्यांचे स्थान अढळ आहे. संतांच्या कळवळयाने सामाजिक प्रगतीची सूत्रे मांडून, समाजाला आत्मबळ देणारे म. फुले सामाजिक शास्त्रज्ञ होते.

याच सुमारास पुण्यामध्ये न्या. महादेव गोविंद रानडे यांनी आपल्या सामाजिक कार्याला प्रारंभ केला. रानडे यांनी सुधारणेच्या क्षेत्रात महाराष्ट्राला पहिला मोठा विचार शिकविला तो हा की राजकारण, अर्थकारण, धर्मकारण व समाजकारण ही समाजाची भिन्न अंगे परस्परांशी अगदी संबद्ध अशी आहेत. समाजकारणात प्रतिगामी असलेला समाज राजकारणात पुरोगामी असेल हे असंभवनीय आहे. मानवनिष्ठा हीच न्यायमूर्तींची जीवननिष्ठा होती. त्यासाठी त्यांनी सर्वांगीण सुधारणेचा आणि प्रगतीचा पुरस्कार करून राष्ट्रीय सभा; सामाजिक परिषद, औद्योगिक परिषद ह्यांच्या स्थापनेमध्ये पुढाकार घेतला. परंतु समाजकारणात काय किंवा राजकारणात काय न्यायमूर्तींचा पिंड क्रांतिकारकाचा नव्हता. ते त्यांच्या उदारमतवादास व नेमस्तपणास अनुसरूनच होते. यानंतरची महाराष्ट्रातील सामाजिक चळवळीची धार 'आधी सामाजिक सुधारणा की राजकीय सुधारणा या वादाने बोथट झाल्याचे दिसते. सामाजिक सुधारणा वादाची कास, ' देव न मानणारे देवमाणूस ' गोपाळ गणेश आगरकर यांनी धरली तर लोकमान्य टिळकांनी राजकीय सुधारणावादाची पताका खांद्यावर घेतली. आगरकरांनी १८८८ मध्ये ' सुधारका ' ची स्थापना करून स्त्रीशिक्षण, बालविवाह, प्रौढविवाह, प्रेमविवाह मिश्रविवाह, जातीय विषमता, चातुर्वर्ण्य इत्यादी सर्व विषयांवर इरेसरीने लिखाण केले. आगरकर बुद्धिवादी व अज्ञयेवादी होते. भौतिक व शारीरिक व्याधींनी विकल् होऊनही दमा, दारिद्र्य आणि समाजाचा ससेमिरा हात धुवून पाठीशी लागला असताही त्यांनी कडोविकडीच्या भावनेने विचारस्वातंत्र्याचा, व्यक्तिस्वातंत्र्याचा, ऐहिकतेच्या सुखसंवर्धनाचा आग्रहाने पुरस्कार केला. लोकमान्य टिळकांचा सामाजिक सुधारणेला विरोध नसला तरी राजकीय चळवळीच्या उत्साहामध्ये त्यांनी अनेकप्रसंगी प्रतिगामी भूमिका स्वीकारली. एवढेच नव्हे तर नसता वितंडवाद घालून सामाजिक सुधारणेच्या मार्गामध्ये प्रत्यक्ष–अप्रत्यक्ष रीतीने अडथळे निर्माण केले. वेदोक्त प्रकरणामधील लोकमान्यांची भूमिका अशीच, परिस्थितीच्या आकलनात न्यून राखणारी आहे,

जोतिबा फुल्यांच्या अगोदर आणि नंतर कार्य करणाऱ्या बाळशास्त्री जांभेकर, रा. ब दादोबा पांडुरंग तर्खडकर, जगन्नाथ शंकरशेठ, लोकहितवादी, विष्णुबुवा ब्रह्मचारी, न्यायमूर्ती रानडे, आगरकर प्रभृती सुधारकाग्रणींमध्ये तर्खडकर व जगन्नाथ शंकरशेठ हेच काय ते ब्राह्मणेतर होते. दादोबा हे मूलतः तत्त्वचिंतक होते. समाजसुधारणेचे कार्य प्रत्यक्ष हाती घेण्याइतपत मानसिक धैर्य त्यांच्याकडे नव्हते. त्यांच्या सुधारणेची हालचाल परिचितांपुरतीच मर्यादित राहिली. दुसरे नेते जगन्नाथ शंकरशेठ. त्यांचे लक्ष्य मुख्यतः राजकीय सुधारणांकडेच होते. सुधारणा सर्वंकष होत्या हे वादातीत पण जगन्नाथ शंकरशेठ यांच्याबाबत एक असे घडले आहे की, ते मुख्यतः मुंबईचे शिल्पकार म्हणून ओळखले जातात. मुंबईसाठी काम करणारा माणूस महाराष्ट्राचा असतो पण महाराष्ट्र त्याचा नसतो. कारणे कोणतीही असली तरी जगन्नाथ शंकरशेठ महाराष्ट्राला पूर्णतः परिचित होऊ शकले नाहीत, हे नाकारता येत नाही. खेरीज जगन्नाथ शंकरशेठ ज्या राजकीय सुधारणा करू पाहत होते, त्यातून कुणी बाहेर राहू शकत नव्हता तरी त्याचे क्षेत्र प्रामुख्याने शहरी भागाशीच अधिकतर निगडित होते. त्यामुळे जगन्नाथ शंकरशेठ मुंबईचे झाले; मुंबईचेच राहिले. सुधारणांचे परिणाम मात्र विस्तृत पटावर दिसले.

एकूण दृष्टीक्षेप टाकता, महाराष्ट्रात नेतृत्वाची, विचारवंतांची आणि प्रतिभासंपन्न समाजसुधारकांची परंपरा अखंडपणे चालत आली आहे. आपापल्या परीने ती कार्य करीत राहिली आहे. प्रत्येक देशात सुधारक विचारवंत निर्माण होत असतातच पण त्यांची परंपरा असण्याचे भाग्य महाराष्ट्रासारख्या एखाद्या प्रांतालाच लाभते. हिंदुस्थान देशातील ब्रिटिशांच्या आगमनानंतर इतर अनेक गोष्टींबरोबर, सामाजिक प्रबोधनाची गतीही वाढली, हे सत्य आहे. सामाजिक प्रबोधनाचा गोवर्धन उचलण्यास अनेकांचा हातभार लागला. काम कठीण असूनही, लोकप्रियतेचे नसूनही अनेकांनी आपला हविर्भाग समर्पित केला. ती परंपरा आजअखेर अखंडितपणे चालू आहे.

भारतीय पार्श्वभूमीवर विचार :

ह्या पार्श्वभूमीवर शाहू छत्रपतींच्या काळाचा, त्यांच्या संस्थानाचा, त्यांच्या कार्यकर्तृत्वाचा विचार केव्हाही युक्तच ठरेल.

शाहू छत्रपती कागलकर घाटगे 'जहागिरदार' घराण्यातून करवीर छत्रपतींच्या घराण्यात दत्तक आले. दैवयोगाने राज्यपदी आरूढ होऊन शाहू छत्रपती झाले. एका बाजूने एका

जहागिरदार घराण्यात जन्म घेतलेले उदार मनाचे यशवंतराव-शाहू - आबासाहेब घाटगे यांच्या सारख्या लोकहितदक्ष चाणाक्ष जहागिरदाराचे चिरंजीव 'छत्रपती' होतात आणि शिव-शाहीचे अविस्मरणीय अवशेष वंशज ठरतात. तर दुसऱ्या बाजूने ताराबाई महाराणीसाहेबां-सारख्या रणरागिणी धुरंधर स्त्रीने निर्माण केलेल्या आणि जिजाबाईसारख्या मुत्सद्दी महाराणी साहेबांच्या राजकारणाने समर्थ बनलेल्या कोल्हापूर राज्याचा वारसा त्यांना प्राप्त होतो; हा शुभयोग होय. 'बाहेरुन' आलेल्या 'आतल्या' शाहू छत्रपतींनी परंपरेचे अचूक भान ठेवून हा वारसा आणि ही परंपरा अधिक तेजस्वी बनविली. पुढे जाऊन शाहू महाराजांनी आधुनिक काळाला उचित असा दृष्टीकोन स्वीकारला व सामाजिक शैक्षणिक क्षेत्रात प्रभावी कार्य केले. त्यानी कोल्हापूर राज्याला 'आधुनिक' बनविले आणि महाराष्ट्रात समतेचा विचार प्रसृत केला. कोल्हापूर रियासत 'सुपीक' बनविली.

शाहू महाराज कोल्हापूर संस्थानच्या गादीवर आले, त्यापूर्वी कोल्हापूर राज्यावर पंचावन्न वर्षे 'अज्ञान राजवट' ( Minority Regim ) होती. शाहू छत्रपतींच्या १८९४ मधील राज्याधिकार प्राप्तीने ती संपली आणि कोल्हापूर राज्यात सामाजिक, राजकीय आणि शैक्षणिक क्षेत्रात एक नवे युग निर्माण झाले. एका आधुनिक उज्ज्वल कालखंडाची प्रभात झाली. संध्याकाळ संपून नव्या प्रभातकाळास प्रारंभ झाला.

राजर्षी शाहू महाराजांचा २६ जुलै, १८७४ मध्ये जन्म झाला त्याच साली विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्या 'निबंधमाले'ने रसललोलुप वाङ्मयीन तोफा डागून मराठी माणसाची अस्मिता झळाळत ठेवली, राष्ट्रनिष्ठेचा डांगोरा पिटला आणि थोडेफार भान निसटून त्या बुरख्याआडून क्षत्रिय कुलातील समाजसुधारकांवर टीकेचा अग्निवर्षावही केला. राजकीय स्वातंत्र्यासाठी सामाजिक सुधारणेला शह मिळाला तरी चालेल अशा विचारसरणीचे हे युग होते; त्या युगाला कलाटणी देण्याचेच नव्हे तर राजकीय स्वातंत्र्या-इतक्या सामाजिक सुधारणा सर्वश्रेष्ठ आहेत, अवश्यमेव आहेत, अशा धारणेचे बीजारोपण म. फुले-आगरकर आणि नंतर शाहू छत्रपतींनी केले. मोठ्या जिद्दीने, अस्मितापूर्ण भावनेने केले. 'क्षात्रधर्म हाच सर्वश्रेष्ठ धर्म होय,' ह्यातच सर्व धर्मांचा समावेश होतो, ही विचारसरणी त्यांनी कृतीने रुजविली. जनक पिते आबासाहेब घाटगे यांच्यासारख्या कर्तबगार पित्याचा विधायक वारसा शाहू राजाना लाभला. त्यांच्या सान्निध्यात त्यांनी राजकर्तव्यदक्षतेचे धडे गिरविले. 'प्रजेचे सुख ते राजाचे सुख. तिचे जीवन ते आपले. प्रजेव्यतिरिक्त राजाला अन्य जीवन नसते. राजाला फक्त कर्तव्ये असतात, हक्क नसतात म्हणून प्रजेचा उत्तरदायी राजा असतो', हे राजतत्त्वाचे बाळकडू शाहू महाराजांना बालपणापासूनच मिळत गेले. आणि त्यामुळेच शाहू महाराजांनी स्वकर्तृत्वाने राजधर्माचे

श्रेष्ठत्व सिद्ध करून दाखविले.राजधर्माने मानवी जीवनातील सर्व धर्मांचा विकास साधता येतो हे, त्यांनी राष्ट्रवाद्यांना सज्जडपणे दाखवून दिले. कोल्हापूरच्या छत्रपतींच्या गादीचा वारसा आणि कर्तबगार, उदारमतवादी, मुत्सद्दी आबासाहेबांचा सहवास, शाहूसकट राजकुलातील मुलांच्या शिक्षणाच्या बाबतीत आबासाहेबांनी घेतलेली दक्षता, राजकोटच्या 'प्रिन्स कॉलेजा'त अत्यंत विश्वासू गोखले बंधूंच्या सहवासात देण्यात आलेले शिक्षण त्यामुळे पुढील जीवनात शाहूंच्या मनात उदारमतवादी लोकशाही राज्यपद्धतीचे बीजारोपण होण्यास मदत झाली. सर्वांच्या विकासासाठी अविरत उद्योग हा जो आबासाहेबांचा स्वभावविशेष तोच शाहू महाराजांनी अंगिकारला. सर्व राज्यकारभार पॉलिटिकल एजंटच्या सल्ल्याने चालत असला तरी मोठ्या मुत्सद्दीपणाने त्यांनी त्यातूनही कार्यकर्तृत्वाचे स्तंभ उभारले. केवळ मराठा जातीसाठी नव्हे, केवळ ब्राह्मणेतरांसाठीच नव्हे तर जातपात कुठलीही असो, जो दलित–छलित–पतित असेल त्याच्या उद्धारासाठी विशिष्ट ध्येयनिष्ठेने मराठ देशातील एकजात अवघ्यांच्या प्रगतीची स्वप्ने पाहणारे शाहूराजे हे कार्यकर्त्यांचे नेते होते. सामाजिक सुधारणांसाठी राजकीय सत्तेचा वापर करून क्षात्रधर्म हा सर्वश्रेष्ठ धर्म आहे हे सिद्ध करणारे ते तत्त्वज्ञानी राजर्षी होते.

## शाहूंचे स्वातंत्र्यपूर्तीचे राजकारण :

२ एप्रिल, १८८४ मध्ये वयाच्या विसाव्या वर्षी राजर्षी शाहूंना राज्याधिकार मिळाले. तसा हा काळ फार अल्प पण राज्याधिकार मिळता मिळताच १९०० ते १९०५ या काळात, वयाच्या सव्वीसाव्या वर्षी वेदोक्ताची आगडोंब उसळविणारी चळवळ उद्भवली. ताईमहाराज प्रकरण ह्या दरम्यानचेच. १८९८ ते १९०१ मधील. जानेवारी, १९२१ मध्ये वयाच्या सत्तेचाळीसाव्या वर्षी क्षात्रजगद्गुरुपीठाची स्थापना केली. राज्याधिकार स्वीकारापासून ( २ मे, १९२२ ) अखेरच्या एकूण अठ्ठेचाळीस वर्षांच्या काळात शाहू महाराजांनी विविधस्पर्शी कामे केली. दुष्काळी कामे काढून शेतकऱ्यांना तगाई, स्वस्त धान्याची दुकाने उपलब्ध करून देण्यापासून ( १८९७ ) तो वेदोक्त चळवळीचा रणसंग्राम लढविण्यापर्यंत ( १९०० ते १९०५ ), निरनिराळ्या जातींमधील विद्यार्थ्यांसाठी समता वसतिगृहाची–बोर्डिंगची–निर्मिती करण्यापासून ( १९०१ ते १९११ ) तो गोवध बंदी कायद्यापर्यंत ( १९०१ ), मागासलेल्या जातींना नोकरीत पन्नास टक्के जागा राखीव ठेवण्याचा आदेश काढण्यापासून (२६ जुलै, १९०२) तो सहकारी तत्त्वावर 'छत्रपती शाहू मिल्सची' स्थापना करण्यापर्यंत ( सप्टें, १९०६ ), कोल्हापूर येथे 'सत्यशोधक समाजा'ची स्थापना करण्यापासून (१९११) तो 'कोल्हापूर राज्य सहकारी कायदा' मंजूर करण्यापर्यंत ( १९१२ ), प्राथमिक शिक्षण सक्तीचे व

मोफत करण्याचा आदेश काढण्यापासून ( १९१२ ) तो पाटलांच्या मुलांना शिकविण्यासाठी 'पाटील स्कूल्स' ची निर्मिती करण्यापर्यंत (१८१३), 'कोल्हापूर राज्य पुर्नविवाहाचा कायदा' मंजूर करण्यापासून (जुलै, १९१७) तो कुलकर्णी वतने, बलुते पद्धत, महारकी किंवा गुन्हेगारी पद्धत बंद करण्यापर्यंत (१९१८), 'शिवाजी क्षत्रिय वैदिक पाठशाळे'ची स्थापना करण्यापासून (६ जुलै, १९२०) तो 'क्षात्रजगद्गुरू पीठा'ची निर्मिती करण्यापर्यंत (जाने, १९२१) असे अनेक रीतीचे कार्य शाहू छत्रपतींनी उभारले: या साऱ्या कार्याचे पाच प्रकारात वर्गीकरण करता येते; ते असे :

१. लोकशिक्षणातून लोकजागृती

२. त्यासाठी, शिक्षण प्रसाराचे हत्यारासारखे उपयोजन

३. त्याकरिता सामाजिक सुधारणांचे कृतिशील उच्चारण

४. आणि आर्थिक विकासादी प्रकल्पांचे/उपायांचे नियोजन

५. त्यामधून स्वातंत्र्याचे जागरण

या दृष्टीतून, शाहू छत्रपतीनी हयातभर कार्य केले.

राजर्षीनी व्यापकपणे बहुजनांचे शिक्षण, स्त्रियांचे शिक्षण, अस्पृश्यांचा उद्धार, मागासलेल्यासकट बहुजनांना उद्योगधंद्यात व शासकीय नोकऱ्यांत प्रतिनिधित्व, अल्प संख्यांकामध्ये सौहार्दभाव वगैरे गोष्टी जीवितांचे एकमेव कार्य या नात्याने केल्या. 'लोकसेवा' हा त्यातील मूलभूत भाग होता. त्यात विशेष महत्त्वाची गोष्ट म्हणजे पूर्वसुरीपेक्षा हरिजन आणि आदिवासी यांच्या शिक्षणाकडे प्रथमतःच भरीवपणे लक्ष देण्यास प्रारंभ झाला होता. शाहू छत्रपती हे 'मराठा' सरदार ; ब्रिटिशांचे मांडलिक सरदार या नात्याने त्यांना काही मर्यादा आहेत आणि मांडलिक म्हणून त्यांच्यावर काही बंधन होती. ह्या मर्यादा आणि ही बंधने स्वीकारून मराठा राजा लोकनेतृत्व करीत आहे. नेतृत्वाची परंपरा हे काही तसे मराठा मंडळींचे व्यवच्छेदक लक्षण नव्हे. लढणे, प्राणपणाने लढणे, सर्वस्वाचा होम करून लढणे ही मराठ्यांची परंपरा. हेवेदावे, मदमत्सर, पाय ओढणे, वगैरे त्यांचाच वारसा. हे सर्व टाकून, म्हणजेच बाजूला ठेवून लोकसेवेच्या आघाडीवर शाहू छत्रपती अखंड झुंजले. परिणामी काही विशेष गोष्टी घडल्या. 'शाहू छत्रपती हे 'मराठा' सरदार आणि सरदार हा सरंजामदार असतो, सरंजामदार हा प्रतिगामी आणि प्रतिगामी लोकशाहीवादी कधीच असत नाही.' असेही एक सांगितले जाते.पण हे खोटे ठरते.आणि शाहू छत्रपतींच्या कार्याचे मूल्यमापन केल्यास ते लोकशाही सूत्रांनाच जवळ येते, हे लक्षात येते.

शाहू छत्रपतींनी आजकालच्या लोकशाहीच्या संदर्भाने कार्याची उभारणी केली, असे म्हणणे किंवा ते ' हरित् क्रांतीचे जनक आहेत ' वगैरे वगैरे चालू काळातील परवलीचे शब्द तारस्वराने उच्चारीत राहणे ही अतिव्याप्ती झाली. मात्र शाहू छत्रपतींनी निव्वळ तत्त्वज्ञान सांगितले नाही, तर कार्याच्या अनुषंगाने तत्त्वज्ञानाची उभारणी झाली आणि ' सरंजामदार हा लोकशाहीवादी होऊ शकत नाही ' असा हट्टाग्रह बाळगून, इतिहास नाकारू पाहणाऱ्या मंडळींचे तसे पानिपत झाले. लोकशाहीचे रुजणे न रुजणे हे देशातल्या दगडा–धोंड्यांवर, कडेकपारीवर थोडेच अवलंबून आहे ? ते त्यामधील माणसांच्या समृद्ध जाणिवेवर उभे आहे. राजर्षींच्या संदर्भात ही जाणीव समृद्ध असणे जरूर आहे.

शाहू छत्रपतींनी इतिहासाच्या सिद्धांताना कलाटणी देण्याचे काम केले. कार्याने आणि कार्यामधील धोरणाने. ब्रिटिशांचे मांडलिकत्व सांभाळतानाही स्वदेशी वाण नोकरीधंद्यात रिचवून, बहुजनसमाजाच्या घडीसकट स्वतःबरोबर कोल्हापूर संस्थानचे बस्तान स्थिर करण्याचा शाहू छत्रपतींचा प्रयत्न होता. परिस्थितीच्या गर्तेत खितपत पडलेल्या ब्राह्मणेतरांना अस्मितापूर्वक जीवनाचा वेद, वेदोक्त चळवळीच्या माध्यमाने त्यांनी दिला. लोकोद्धाराच्या प्रक्रियेत सर्व समाज–येतील त्यास घेऊन; न येतील त्यास मागे ठेवून अंतर्भूत करण्याची दृष्टी दिली. ' मराठा, ' ' संस्थानिक ', ' मांडलिक ' व 'कोल्हापूर संस्थान 'या चौखांबांच्या बाहेर असलेल्या, शाहू छत्रपतींच्या ठोक व्यक्तिमत्वातून ही अर्थपूर्णता आकाराला आली. या चौकटीतच शाहू छत्रपती राहते तर शाहू छत्रपती ' शाहू छत्रपती ' या नात्याने दृष्टीसमोर न येता एक मांडलिक संस्थानिक एवढीच त्यांची संकुचित प्रतिमा बाकी राहिली असती. तेवढेच शक्य होते. एकूणच शाहू छत्रपतींचा लढा, म्हणजेच बहुजनेतरांचा लढा हा मानव्याच्या प्रतिष्ठापनेसाठी होता. माणसांमधून विरत जाणाऱ्या माणुसकीच्या मूल्यांच्या प्रस्थापनेसाठी होता. असे लढे अधून-मधून करावे लागतात. त्यामुळे रूळावरुन घसरलेल्या समाजाच्या गाड्या मार्गावर येणे सोपे जाते. शाहू छत्रपतींचा लढा हा कुणा एका जातीपातीच्या प्रतिष्ठापनेसाठी नव्हता. प्रतिष्ठेसाठी नव्हता.तो माणसाच्या मूलभूत स्वातंत्र्याच्या मागणीचा लढा होता.वेदोक्ताच्या अधिकाराची मागणी काय किंवा व्यापक शिक्षण प्रसाराची दृष्टी काय, शेवटी चार्तुवर्ण्याच्या चौकटीतील हरवलेल्या अधिकारांच्या प्राप्तीचीच मागणी होती. आणि त्याची पूर्तता म्हणजे चार्तुवर्ण्याची मर्यादित मोडतोड होती. पण मर्यादितपणातही मूलभूतता होती हे विसरून चालत नाही. केवळ कुठल्या विशिष्ट विभागाला हक्क प्राप्त व्हावेत, म्हणजे सारे संपले एवढी ही संकुचित मागणी नव्हती. आव्हान होते ते सर्वकष वर्णाश्रमाधिष्ठित जातीय चौकटीलाच होते.

शाहू छत्रपतींनी दूरदृष्टीने, दूरगामी परिणाम करणाऱ्या कार्याची संस्थारुप पायाभरणी करण्याकडे सतत लक्ष दिले. केवळ मराठा किंवा अन्य एखादा समाजच नव्हे तर खऱ्या अर्थाने 'बहुजन समाज' नजरेसमोर राखून शास्त्रशुद्धदृष्टीने कार्य केले. या बहुजनसमाजात बहुजनांचा हितवाद एकवटलेला होता आणि तो जातपातपंथभेद या पलीकडचा होता. राजर्षींच्या कार्याचा हा मुळी दोराच होता. तो कुठेही तुटू नये आणि विविध घटकावयवांनी बनणारा एकसंघ समाज दुभंगू नये याची काळजी राजर्षींनी, समाजाला धक्के देत असतानाही घेतली. शाहू छत्रपतींना खरे तर स्वाऱ्याशिकारीमध्ये, ख्यालीखुशालीने आयुष्य बेतशिरपणे कंठता आले असते. अवघड काहीच नव्हते. पण ते होऊ शकले नाही. स्वतःला विसरुन जगणाऱ्या लोकसमूहामध्ये, जागृतीचे बी पेरुन त्यांना मानवी हक्कांच्या सनदेसाठी कार्यप्रवृत्त करणे हे राजर्षींचे अंगिकृत कार्य होते.त्यांनी ते स्वीकारले, 'प्रसंगी गादीचा त्यागही करीन पण हातातले कार्य टाकणार नाही.'असा राजर्षींचा बाणा त्यांच्या दृढ निर्धाराचे प्रतिक झाला. हा आत्मसमपर्णाचा आवेश शाहू छत्रपतींच्या असामान्यत्वाचे लक्षण होय. हे असामान्यत्व फक्त ब्रिटिश राज्यकर्त्यापुरतेच नव्हे तर सर्वसाधारण जनतेमधील हितसंबंधियांच्या रागालोभाच्या बाबतीतही दाखविले गेले. करायचे ते करणारच, सोडणार नाही; मग त्याचे परिणाम काय व्हायचे असतील ते व्होवोत, या जिद्दीने पेटलेल्या शाहू छत्रपतींनी परकियाबरोबर स्वकियांचाही रोष ओढवून घेण्याची तयारी केली. आणि स्वकियांचा रोष तर फारच बोचक व दाहक असतो. निर्ममतेने परकियांसमोर लढयाच्या पवित्र्यात झटकन उभे राहता येते; तर ममता सोडता येत नाही हीच मुळी स्वकियांच्याबाबतीत अडचण असते. एका बाजुने ब्राह्मण समाज त्यातही सरंजामी मनोवृत्तीचा ' मराठा ' समाज आणि त्यामध्ये कुचंबणारे इतर अशी ही अडचण होती. वरवरचे दोष बदलता येतात पण मूळ प्रवृत्तीला वळण देणे जिकीरीचे असते. 'हक्कदार ब्राह्मण' समाज, 'सरंजामदार मराठा' समाज आणि त्यामध्ये कुचंबणारे इतर यामधील 'हक्कदारी' आणि 'सरंजामदारी' या दोन्ही, स्वकिय बांधवांच्या प्रवृत्ती बदलणे ही कठीण गोष्ट होती. कुठल्याही बाबीवरची स्वामित्वाची भावना काढून टाकणे ही अवघडच गोष्ट असते. शाहू छत्रपतींनी ते केले. सत्तेच्या पटावर असलेल्या आणि सत्तेच्या राजकारणात घुटमळलेल्या दोघांच्याही नाडया राजर्षींनी सैल करण्याचे आणि सामान्यांपर्यंत सत्ता नेण्याचे काम केले. शाहू छत्रपतींचे हे असामान्यत्व होय.

## राजर्षींचे स्वातंत्र्यवादी कार्य

राजर्षी शाहूंचा विचार करताना त्यांनी प्रामुख्याने सामाजिक स्वरूपाचे काम केले. सामाजिक क्रांती केली आणि सामाजिक काम हे राजकीय कामाहून गौण आहे,

असे मानण्याकडे कल आहे. हा कल इतका प्रभावी आहे की, त्याव्यतिरिक्त त्यांचे काम, सामाजिक क्रांतीचा एक गौण भाग आहे, स्वाभाविकपणेच त्याचा वेगळा परामर्श घेण्याची गरज नाही; अशी सर्वसाधारण वृत्ती दिसते. याचा एक परिणाम असा घडला आहे की, शाहू महाराजांच्या फक्त सामाजिक कार्यकर्तृत्वावरच लक्ष केंद्रित झाले आहे. आणि तेवढ्या प्रमाणात इतरांकडे दुर्लक्ष आहे. त्यामुळे शाहू महाराज एकांगाने एकारलेले आहेत, बहुअंगांनी समृद्ध नाहीत, अशी भावना दिसते. त्यामुळे आणखी असे घडले आहे की, शाहू महाराजांच्या शिक्षण व समाज या विषयीच्या पैलूंचाच विचार प्रामुख्याने होत गेला; पण तेवढ्या प्रमाणात आर्थिक प्रश्न, सहकाराचे क्षेत्र, पाटबंधारे–दळणवळण, लागवडींचे नवनवीन प्रयोग, दुष्काळविषयक तात्पुरती आणि कायम स्वरुपाची उपाययोजना, कारभार यंत्रणा आणि कायदेकानू, नोकरवर्ग आणि शिस्त, मागास वर्ग आणि त्यांच्यासाठीच्या सोयीसवलती इत्यादी अनेक प्रयत्न–धडपडींबाबत व्हावा तसा विचार होणे कठीण झाले. तसा विचार फारसा झालाही नाही. साहजिकच शाहू महाराज हे थोर क्रांतिकारक आहेत, समाजपरिवर्तक आहेत; एवढ्या शब्दापुरताच शाहू छत्रपतींचा विचार मर्यादित राहिला. उच्चभ्रूंच्यादृष्टीने शाहू महाराज हा त्यांचा विषयच नव्हता, आजही अपवादानेच आहे; गर्जना करणाऱ्या ब्राह्मणेतरांच्या डोळ्या–समोर तो असला तरी त्या विषयाकडे ज्या डोळ्यांनी पाहणे आवश्यक ते डोळेच कालपरवापर्यंत, स्वत:ला बहुजनसमाज म्हणविणाऱ्या समाजाकडे नव्हते. असे डोळे आता थोडेफार प्राप्त होत आहेत. आणि म्हणून शाहू छत्रपतींनी केलेली क्रांती ही फक्त सामाजिकच नव्हती तर ती धार्मिक, आर्थिक, शैक्षणिक, सांस्कृतिक आणि राजकीयही होती, हे हळूहळू मांडले जात आहे. मान्य होत आहे. इतिहास सापडू लागला आहे, अर्थ लागू लागला आहे, संशोधन होऊ लागले आहे; हे जाणीव प्रगल्भ होत चालल्याचे चिन्ह आहे.

शाहू महाराजांच्या क्रांतीचे स्वरूप दुहेरी होते : परकिय आणि स्वकिय अशी ही रूपे. परकियांशी लढाई त्यांच्यामधील चांगले स्वीकारण्याबाबत होती, त्याचबरोबर त्यांनी हिरावून घेतलेले हिंदुस्थान देशाचे स्वातंत्र्य मिळविण्यासाठीही होती. दुसऱ्या लढाईला मर्यादा होत्या. शाहू महाराजांचे कोल्हापूर संस्थान हे मांडलिक संस्थान असल्याने मांडलिकीच्या मर्यादेत राहून करता येणे शक्य ते करण्याचा यांचा अटाकोट प्रयत्न होता. शक्यतो ब्रिटिश सत्तेशी संबंध अत्यंत सलोख्याचे, गोडीगुलाबीचे असल्याचा बहाणा करून, त्यांच्या पोटात शिरून त्यांचा काटा काढण्याचा त्यात मुत्सद्दीपणा होता. मांडलिकीची मर्यादा सांभाळून शाहू छत्रपतींना नम्रपणे एवढेच करणे शक्य होते. अधिक काही करावयाचे म्हणजे मांडलिकीच्या रिकीबीवरील मांड निसटण्यासारखे होते. ही मांड

सुटणे याचा अर्थ, आधाराचे दोर स्वतःच स्वतःच्या हाताने कापून घेऊन निराधार होणे— म्हणजेच त्या आधारावर करू घातलेल्या सर्वंकष क्रांतीला पाठमोरे होणे! शाहू महाराजांना हे अभिप्रेत नाही. मांडलिकीमुळे येणारे दोषारोप आणि निंदानालस्ती पत्करूनही शाहू महाराज मांडलिकीमधून प्रकट होणारी ' निष्ठा ' टाकू पाहत नाहीत; त्याचा अर्थ मुत्सद्दीपणा हे आहे. दुसरा काहीच नाही.

म्हणूनच शाहू महाराजांची परकियांशी लढाई नव्हती असे नाही. ती होती; म्हणून तर शाहू महाराजांच्या संस्थानावर आणि त्यांच्या व्यक्तिगत हालचालींवर—उदा. विषप्रयोग प्रकरण—ब्रिटिश सत्तेचे बारीक लक्ष होते. शाहू महाराज राज्याचा भोग घेऊन धाटेमोठे किती होतात हे पाहण्यासाठी काही एवढी ही टेहळनजर नव्हती; हे ध्यानात घ्यायला हवे. रूढ अर्थाने परकिय सत्तेशी उघड उघड दोन हात करणारा तेवढाच ' क्रांतिकारक ' ठरविण्याची, ' बंडखोर ' म्हटला जाण्याची सर्वसाधारण पद्धत अगदीच व्यर्थ म्हटली पाहिजे. लढा प्रकट आणि अप्रकट दोन्हीही रीतींचा असू शकतो. आणि ह्या दोन्ही रीतींमध्ये अमुक एक रीतीचा लढा श्रेष्ठ किंवा कनिष्ठ असे म्हणता येत नाही. तसे म्हणणे आणि समजणे किंवा समजून—उमजून म्हणणे हे समंजसपणाचे लक्षण नव्हे. लढा लहान किंवा मोठा, कसाही असला तरी तो लढाच असतो. त्याचे परिणाम आणि त्याचा प्रभाव, त्याची तीव्रता आणि व्यापकता यावर तो अवलंबून असतो. शाहू महाराजांनी ब्रिटिशाशी अप्रकट—प्रकट लढा दिला. पारतंत्र्यात खितपत पडलेल्या मानवी मनांच्या गुलाम देशाला मुक्त करण्यासाठी ब्रिटिश सत्तेशी आणि स्वकियांशी, दोघांशीही गनिमी काव्याने लढा दिला. एक अप्रकटपणे दिला, दुसरा प्रकटपणे. पहिल्याचे स्वरूप अत्यंत वेगळे—सुईच्या नेढ्यातून, डोळे किलकिले करून दोरा ओवावा तसे! दुसरे एकदम वेगळे—खुल्या मैदानात डफावर थाप पडल्यावर आसमंत साद—पडसादांनी दुमदुमून जावे तसे! पण दोन्ही लढे परस्परांस पूरक होते. परस्परावलंबी व परस्पराश्रयी होते. शाहू महाराजांनी स्वकियांशी केलेला लढा, सर्वच अर्थाने विराट होता. समाजाच्या सर्वंकष पारतंत्र्यापासून मुक्तता हा ह्या लढ्याचा हेतू होता. आणि सर्वंकष पारतंत्र्य म्हणजे किती रीतीचे पारतंत्र्य ? आर्थिक, धार्मिक, शैक्षणिक, सांस्कृतिक, सामाजिक, सर्वरीतींचे ; सर्व प्रकारचे. आणि ह्या स्थूल प्रकाराच्या परी तरी किती ? असंख्य, अगणित. स्त्रिया, पुरुष या सर्वांना सर्वत्र व्यापून उरणाऱ्या. समाजाच्या तळामुळात खोलवर रुजून जीवनरस शोषून घेऊन, समाजजीवनाचा चोथा करणाऱ्या. त्याला अटक म्हणून

कसली ती नाहीच! ‘ गुलामगिरी ’ हाच ज्या समाजजीवनाचा जाहीरनामा, त्यास गुलामीच्या परिसीमेची देखील अटक नसते. दीनदलित वर्ग, त्याची अत्यंत शोचनीय अवस्था, शोषणाच्या विविध वाटा, अज्ञान–दारिद्रय–विषमतेचे थैमान याविरुद्ध लढा हा स्वकियांशी उभारलेला होता. आणि स्वातंत्र्याच्या दिशेने मुक्त मने निर्माण करावीत हा त्याचा हेतू होता. म्हणजे त्यांची एक बाजू सामाजिकतेची तर दुसरी राजकीय होती. शाहू महाराजाना स्वातंत्र्याचा लढा–राजकीय लढा–उघड उघड उभारणे शक्य नव्हते. परिस्थिती आणि मुत्सद्दीपणा या दोहोंनीही या बंडाला अडसर टाकले होते. ते उल्लंघणे केवळ अशक्य होते. शाहू महाराजांना जे अशक्य होते ते शक्य होते, असे मानता येईल पण वस्तुस्थिती तशी नव्हती; हे लक्षात घ्यायला हवे. सूक्ष्म दृष्टीने पाहता, शाहू महाराजांच्या वरवर दिसणाऱ्या सामाजिक लढ्यात राजकीय लढा अंतर्भूत होता. शाहू महाराज मानवाच्या स्वातंत्र्याचें आवाहन करीत होते. मानवाचे स्वातंत्र्य हे सर्वात मोठे स्वातंत्र्य. त्या वेगळे दुसरे स्वातंत्र्य कुठे असते ? ते मिळविणे आणि मिळविलेले टिकविणे हेच सर्वोच्च असते. त्यात देशासकट सगळी स्वातंत्र्ये येतात. शाहू महाराजांची व्यापक नजर इतरांप्रमाणे सामाजिक स्वातंत्र्याकडे कानाडोळा करून, राजकीय स्वातंत्र्याचीच फक्त बांग देत नसली तरी ऐकू येणारी बांग सर्वांगांनी हडबडून जागी करणारी आहे. हे विशेषत्वाने लक्षात घेतले पाहिजे. आणखी एक विशेषत्वाने ध्यानात आले पाहिजे ते हे की, परकियांपेक्षा स्वकियांशी द्यावयाचा लढा हा नेहमी अधिक अवघड असतो. आणि स्वकिय, अनेक जीर्णशीर्ण रूढींनी भेगाळलेला असला, फुटलेला-तुटलेला असला की, त्यास स्वातंत्र्योन्मुख करू पाहाणाऱ्याचे हाल कुत्रेही खात नाही. अविकसित समाजाची, समाजसुधारकाला, कुत्र्यानिपट वागविण्याची रीतच असते. म्हणजे अवहेलना, उपेक्षा, आणि वंचना याखेरीज त्याच्या पदरी काहीच पडत नाही. लोकप्रियता सात हात दूर असते. दोन हातांनी भरभरून घेण्यासाठी स्वकिय आसुसलेले असले तरी काही न देण्यासाठीही उत्सुक असतात. परकिय सत्तेशी झुंज घेण्यात ‘ हिरोवर्शिप ’ असते, ‘ ग्लॅमर ’ असते. स्वकियांच्या घरच्या लढ्यात श्वासही अवघड होतो. म्हणून घरचा लढा अतिशय बिकट, खडतर आणि कठीण असतो. हा लढा देणाऱ्यांना फकिरी पत्करूनच उभे रहावे लागते. त्यामध्ये हयातीत काही बिरूदे लाभतील ही शक्यता कमी असते. मरणोत्तर गौरव आणि कौतुक हे स्वकियांशी लढ्याचे फलित असतेही. पण तें पुढे. शाहू छत्रपती राजे म्हणून काही गोष्टी चुकल्या, पण काही त्यांच्या वाट्याला आल्याच. त्या चुकल्या नाहीत.

अर्थात शाहू महाराजांना हें माहीत नव्हते असे नाही पण देशाच्या स्वातंत्र्याचा प्रश्न जितका महत्त्वाचा तितकाच त्या देशात वावरणाऱ्या ऐंशी–नव्वद टक्के अशिक्षित

लोकांना 'शहाणे' करून सोडण्याचा प्रश्नही तेवढाच महत्त्वाचा. यातील 'शहाणपण' म्हणजे देशाचे 'स्वातंत्र्य' जवळ येणे होय. शाहू महाराजांनी, या देशाच्या मूळ गड्डयालाच हात घालण्याचे लोकोत्तर कार्य केले; त्यात राष्ट्ररचनेची दृष्टी होती एकात्मतेने राष्ट्र बांधले जाते ही भावना असल्याने तसे प्रयत्न होते. म्हणून वेळेचा आणि माणसांचा उपयोग करून घेण्यात, त्यायोगे समाजाला पुढे ढकलण्यात शाहू छत्रपती कार्यशील होते. जगाच्या वाहत्या वाऱ्यात, बहुजन समाजाने कोणती दिशा पकडली पाहिजे, कुठे मोहरा वळवून उभे असले पाहिजे, हे पुन: पुन्हा सांगण्यामधील कृतीमध्ये आणावे याविषयीच्या धडपडीमागील शाहू छत्रपतींचे द्रष्टेपण लक्षणीय आहे. परिस्थिती आणि नियती यांचे, शाहू छत्रपती हे इतिहासदत्त अपत्य होते. एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात ज्या अखिल ब्राह्मणेतर समाजासाठी शाहू छत्रपती काम करीत होते; त्यांच्या जीवनप्रश्नांशी निगडित सत्यशोधक समाजाचे वर्चस्व, बहुजन समाजाच्या मनावर होते. म. फुल्यांनी संस्थापिलेला सत्यशोधक समाज बहुजन समाजाच्या काळजाला हात घालून होता; आणि त्यांच्या व्यथा-कथांना ढवळून काढीत होता. शाहू छत्रपती सत्यशोधक समाजाचे कधी सभासद नव्हते. सत्यशोधक समाजाचे मूळ स्वरूप ब्राह्मणांचा द्वेष किंवा नष्टांश असा कधीच नव्हता, पण चळवळीच्या वावटळीत द्वेषाचा कहार उसळला गेला. हे अमान्य करण्यात इतिहासाला न्याय नाही. त्याचे बरेवाईट काही परिणामही झाले. हरेक चळवळीत हे घडतेच. सत्यशोधक समाजाच्या चळवळीत अगांतुकपणे शिरलेली द्वेषभावना शाहू छत्रपतींना नको होती. शाहू छत्रपतींनी सर्वसाधारणपणे सत्यशोधक समाजाचे कार्य केले असले तरी त्याचा प्रत्यक्ष संपर्क त्यांनी दूर राखला. याचा अर्थ, शाहू छत्रपतींना सत्यशोधक समाज अमान्य होता असा होत नाही. कार्य करताना सुद्धा काही पथ्ये पाळावी लागतात, चळवळीच्या ओघात कुपथ्य होऊ लागले तर ते टाळून पथ्ये सांभाळली जाणे जरूर असते, ही शाहू छत्रपतींची धारणा होती. राजर्षींनी कुणा एकाला आंधळेपणाने बांधून घेतले नाही; तर समाजकारणासाठी सर्वांचा यथोचित उपयोग करून घेतला. हे व्यवहारी धोरण होते. साहजिकच कार्यात राजर्षी शाहू सत्यशोधक समाजाचे, विचारात आर्यसमाजाचे आणि दृष्टीत ब्राह्मो समाजाचे होते. सर्वधर्मिय व सर्वजातीय विश्वकुटुंबाची राजर्षींची कल्पना किती समृद्ध होती ते यावरून लक्षात येते, आणि यथार्थ कर्तृत्वाचा निकषही समजून जातो.

शाहू छत्रपतींनी स्वीकारलेल्या विविधस्पर्शी ध्येय-धोरणांना सामाजिक जाणिवेच्या उत्कटतेबरोबरच आर्थिक विचारांचेही अधिष्ठान होते. केवळ उद्धाराचे ध्येय-धोरण; निखळ सामाजिक जाणिवा किंवा फक्त आर्थिक विचार ही एकेकश: अपुरीच असतात. एकमेकांमध्ये ती गुंततात तेव्हा त्यास फळे धरण्याची आशा करता येते. अर्थात राजर्षींचे

लोकोद्धाराचे ध्येयधोरण, सामाजिक जाणिवांमधील आशयसंपन्नता ठळक रीतीने जाणवावी इतकी स्पष्ट आहे. राजर्षींनी शिक्षणकारण सांगितले आणि केले. समाजसुधारणेच्या चळवळींची सूत्रे मांडली आणि त्यानुसार सुधारणा घडवून आणल्या. त्या कशा घडून येतील याचा प्रयत्न केला. राजकारण सांगितले नाही पण केले. आर्थिककारण मांडले नाही पण उभारुन दाखविले. या सगळ्या सांगण्या-करण्यातही एक संगती आहे. सर्वत्र लोकांशी संबंध आहे, पण लोकांना जेवढे कळणे इष्ट आहे; तेवढ्यासंबंधीच आवर्जून बोलणे आहे. पण जे सांगितले नाही तरी चालू शकेल, सांगण्याने कदाचित गुंतागुंती होतील, कार्यनाश घडून येऊ शकेल अशा बाबींसंबंधीची चर्चा टाळण्याकडे कटाक्ष दिसतो. राजकारण, अर्थकारण हे त्याचेच मासले होत. पण अर्थकारणातील एक वैशिष्ट्यही ध्यानात वागविले पाहिजे. ते हे की, अर्थकारणाचा ग्रंथ न लिहिता किंवा न मांडता, राजर्षींनी आर्थिक क्षेत्रात आपली थोरवी सिद्ध करून दाखविली आहे. याबाबतीत काही स्थूल पण समग्र असा विचार राजर्षींनी केला होता असे दिसते: सर्व सुधारणांचा पाया माणसाचे मन आणि संस्कृतीच्या सर्वांगांवर परिणाम करणारे एक साधन म्हणजे अर्थ; शाहू महाराजांनी हे जाणले होते. हे जाणलेले त्यांनी प्रत्यक्षात आणले.

१९२२ च्या दरम्यान मोठ्या गणल्या गेलेल्या ४२ संस्थानांमध्ये कोल्हापूरचा समावेश होता. त्याचे क्षेत्रफळ सुमारे ३ हजार चौ. मैल व लोकसंख्या सुमारे ८.३ लक्ष होती. तत्कालीन संस्थानात आकार, लोकसंख्या आणि उत्पन्न या दृष्टीने कोल्हापूर संस्थानचा अनुक्रमे चोवीसावा, तेरावा व सतरावा क्रमांक होता. याचा अर्थ, हिंदुस्थानच्या नकाशातील पिवळ्या ठिपक्यांत कोल्हापुरला उल्लेखनीय स्थान होतेच खेरीज कोल्हापूरनें आणखीही एका दृष्टीने ते प्रस्थापित केले होते. हे प्रस्थापन 'इंपिरियल गॅझेटियर'मधील नोंदीच्या अनुषंगाने आहे. या गॅझेटियरमध्ये हिंदी संस्थानिकांच्या हक्क-जबाबदाऱ्या यांची नोंद करण्यात आली असून त्यामध्ये, परराष्ट्रीय कारभार संस्थानिकांतर्फे ब्रिटिश सरकारने पहावा आणि संस्थानिकाच्या अंतर्गत कारभार पाहण्याच्या संपूर्ण अधिकाराला साम्राज्य सरकारने पूर्ण मान द्यावा अशी व्यवस्था होती. या, ' अंतर्गत कारभार पाहण्याच्या संपूर्ण अधिकाराचा ' जास्तीत जास्त उपयोग करण्यात कोल्हापूर संस्थान अग्रेसर होते. अर्थात संपूर्ण अधिकार सरळपणे गाजवता आले नाहीत, त्यासाठी युक्त्या-प्रयुक्त्यांचा अवलंब करावा लागला, हे ध्यानात घेतले की वरवर वाटणाऱ्या राजर्षींच्या साळढाळपणामागील ' बिलंदरपणा'चे कौतुक करण्याखेरीज गत्यंतर उरत नाही. शाहू छत्रपती या निखळ कौतुकाला पात्र ठरले आहेत.

शाहू महाराजांनी, १८९४ ते १९२२ या काळात कोल्हापूर संस्थानात, खाजगी खर्चाला काट देऊन पैसा पेरला. त्यातून लोकविकासाचा बहुस्पर्शी कार्यक्रम राबविला. कोल्हापूर

संस्थानाचे मूळ स्वरूप कृषिप्रधान. ऊस हे महत्त्वाचे नगदी पीक तर भात हे महत्त्वाचे अन्नपीक. संस्थानातील साडेपाच-सहाशे चौरस मैलांच्या वनविभागात हिरडा व चंदन ही महत्त्वाची उत्पन्ने होती. नद्या विपुल, पाऊसमान बरे; त्यामुळे धरणे व बंधारे यास वाव होता. शेतकरी सावकरी पाशात असला तरी त्याच्या सुटकेला सर्वस्वी प्रतिकूल वातावरण नव्हते. आधुनिक तंत्र व दृष्टी यातून नव्या जगाच्या निर्मितीची संधी दुर्मिळ नव्हती. राजर्षींनी या साऱ्याची अटकळ बांधून कामांची उभारणी केली आणि शैक्षणिक; सामाजिक, राजकीय, सांस्कृतिक, मानसिक, धार्मिक, ऐतिहासिक या तटबंदीप्रमाणे आर्थिक तटबंदीही लावून धरली. तिचे तत्त्वज्ञान न सांगता तत्त्वाचार केला.

याचे प्रत्यंतर, शाहू छत्रपतींच्या आर्थिक, शैक्षणिक, सामाजिक वगैरे सर्व रीतीच्या धोरणात ठळकपणे दिसते. राजर्षींच्या आर्थिक धोरणाचे सूत्र ' समताधिष्ठित सामाजिक न्याय व समतोल आर्थिक विकास ' हे त्यांच्या उदारमतवादी सार्वजनिक धोरणाशी सुसंगत होते. न्याय, शिस्त आणि समता ही त्यातील बीजभूत कल्पना होती. त्यासाठी तर शाहू छत्रपतींनी प्रशासकीय कार्यक्षमता वाढविण्याच्या दृष्टीने ' पाटील स्कूल्स, ' 'वेठबिगार आणि ' बलुतेदार ' पद्धती ( १९१७ ), समाजातल्या आर्थिक वगैरे दृष्टचा दुर्बल घटकांच्या विकासासाठी ५० टक्के जागा राखीव ( १९०२ ), ' महार व कुलकर्णी वतने ' खालसा ( १९१७ ), वगैरेबाबत निर्णय घेतले. चौकट आर्थिक विकासाला पोषक नव्हती. अडथळे आणणारी होती. ती दुरुस्त करून घेणे जरुर होते. निरीक्षण, अनुभव, अवलोकन आणि प्रत्यक्ष व्यवहारातील अडचणी इत्यादी गोष्टींच्या प्रचितीने शाहू छत्रपतींना हे बदल अपरिहार्य वाटले. त्यांनी ते धडाक्याने केले. बदल 'सयाजीराव' पद्धतीने होतात. आणि ' शाहू ' पद्धतीनेही होतात. राजर्षींच्या कार्यविस्ताराचे स्वरूप स्वयंभू आहे : शाहू छत्रपतींनी दुष्काळविमोचनाचे मोठे कार्य केले ; स्वतःच्या कारकीर्दीत एकूण पाच वेळा पडलेल्या दुष्काळांवर ( १८९६–९७, १८९९–१९०० १९०१–०२, ९०५–०६ व १९१८–१९ ) राजर्षींनी कायम स्वरूपाच्या उपाययोजनेची आखणी केली. त्यात तातडीच्या आणि दीर्घकाल अशा उपाययोजना होत्या. त्याचे स्थूलमानाने स्वरूप पुढीलप्रमाणे होते :

दुष्काळ पीडितांसाठी झोपड्या बांधल्या. आरोग्य केंद्रे उभारली. दुष्काळी काळात सरकारी जगलातील कुरणावर गोरगरीब शेतकऱ्यांची गुरे मोफत पोसण्याची व्यवस्था केली. आर्थिक मदतीने नियंत्रित दरात धान्यवाटपाची सोय केली. आर्थिक विकासाच्या दृष्टीने हातकणंगले–वडगाव, कोल्हापूर–गगनबावडा, कापशी–गडहिंग्लज, गारगोटी–पाटगाव इत्यादी रस्त्यांची दुरुस्ती करुन वाहतूक व्यवस्था केली. पाण्याचे दुर्भिक्ष्य दूर करण्याच्या दृष्टीने कळंबा, रंकाळा, बहिरेश्वर इत्यादी जुन्या तलावांच्या दुरुस्तीचा कार्यक्रम हाती

घेतला. शिरोळ, वडगाव, रुकडी, आळते, अतिग्रे, सातवे इत्यादी मोठ्या तलावांचे बांधकाम केले. शक्य तिथे नदीला छोटे बंधारे घालून पाण्याचा साठा करण्याचे आदेश देण्यात आले. नव्या विहिरी खणण्याचा, शेतकऱ्यांना कर्ज देण्याचा कार्यक्रम आखण्यात आला. लक्ष्मी तलाव बांधण्याचे काम सुरु करण्यात आले. काळम्मावाडी धरणाचा प्रकल्प आखण्यात आला. हे दीर्घकालीन उपाय करण्यामागे लोकांना पिण्याचे पाणी उपलब्ध करुन देणे, शेतीला पाणीपुरवठ्योची सोय करणे व दुष्काळाचे दुर्भिक्ष्य नष्ट करणे हा हेतू होता. सर्वसामान्य लोक, शेती, शेतकरी, पाणीपुरवठा, उत्पादनवाढ, कृषिक्रांतीतून आर्थिक विकास, स्वावलंबी दृष्टीचें निर्माण आणि राष्ट्रविकास अशी छत्रपतींची एकूण वाटचालीतील दृष्टी होती. शेती विकास, शेती उत्पादन, आधुनिक पद्धतीने शेतीची मशागत, त्यावर आधारित औद्योगिक विकास असे एकूण सूत्र होते. सहकार त्यावरील एक उपाय होता. राजर्षीनी ' देशात ऐश्वर्य कसे वाढेल ?' मध्ये म्हटले आहे, " ......कृषिकर्म वाईट अथवा हल्के असे मी मुळींच मानीत नाही ...... कृषिकर्मापासून दुहेरी उत्पन्न होते. स्वतःला सुख होऊन सर्व मानव जातीलाही सुख मिळते. कृषिकर्माबरोबर पशूपालन व रक्षण यांचाही संबंध येतो. याकरता आपल्याला पशूपालनासंबंधीही पुष्कळ काम करावयाचे आहे. दूध, तूप, वगैरची समृद्धी देशामध्ये झाली पाहिज." शाहू छत्रपती पुढे सांगतात," श्रम, भांडवल व कौशल्य एकत्र करुन मोठ्या प्रमाणावरील उत्पादनाचे फायदे मिळवायचे असतील तर सहकारी पतपेढ्या, सहकारी ग्राहक भांडारे व सहकारी उद्योगधंदेसुद्धा काढले पाहिजेत." आणि त्यासाठी राजर्षींनी दोन्ही बाहू उभारून 'योग्य काम, योग्य दाम' मध्ये सक्रिय आश्वासन दिले आहे, की, " कोल्हापूर संस्थान त्याकरिता वाटेल ती मदत द्यावयास तयार आहे." त्यादृष्टीने शाहू छत्रपतींनी आपल्या संस्थानाच्या आर्थिक विकासाच्या कार्यक्रमात शेती, सहकार, व्यापार, उद्योग, दळणवळण इत्यादी बाबींना अग्रहक्क दिला.

१८९५ व १९०७ मध्ये अनुक्रमे 'कोल्हापूरचे औद्योगिक सर्वेक्षण' व 'कोल्हापूर जल संपत्तीचे सर्वेक्षण' करुन घेण्यात आले असून पाश्चिमात्य औद्योगिक विकासाचे अंधानुकरण न करता भारतीय परिस्थितीला उपयुक्त ठरतील अशा लघु व विकेंद्रित उद्योगांचे धोरण अवलंबिलले आहे.'राजाराम इंडस्ट्रियल बोर्डिंग हाऊस'च्या उद्‌घाटन प्रसंगी शाहू महाराजानी सांगितले आहे, "आजपर्यन्त भांडवलवाल्यांचे दिवस होते. आता मजुरांनी आपला काळ आणला आहे .. . . . पण ... भांडवलवाल्यांच्या मर्जीवर व स्वार्थबुद्धीवर, न्यायबुद्धीवर नव्हे ; हजारो माणसांचे जीवित अवलंबून रहावे ही स्थिती बरोबर नाही. याकरिता पश्चिमेच्या धर्तीवर सर्वस्वी चालणारे कारखाने आमच्या देशात फारसे फायदेशीर होणार नाहीत." राजर्षींची विकेंद्रित उद्योगधंद्यांची दृष्टी लक्षणीय आहे. त्याचबरोबर धंद्यासाठी

आवश्यक लागणाऱ्या तंत्रकौशल्याचे शिक्षण देण्यासाठी ' जयसिंगराव घाटगे टेक्निकल इन्स्टिटयूट ' व ' राजाराम इंडस्ट्रियल स्कूल ' या दोन तांत्रिक शिक्षण केंद्रांची निर्मिती करण्यात आली. १९०५-०६ मध्ये प्रथम खाजगी आणि नंतर सार्वजनिक ' श्री शाहू स्पिनिंग व वीव्हिंग मिल' सुरू करण्यात आली. औद्योगिक विकासासाठी जंगल संपत्तीचा उपयोग करून घेण्याच्या हेतूने राधानगरी येथे wood Distilation Factory स्थापण्यात आली. शाहूपुरी, जयसिंगपूर या व्यापारपेठा वसविण्यात आल्या. सुखी, आरोग्यसंपन्न व तृप्त नागरिक तयार व्हावा या हेतुने-मानवी मूल्यांच्या जोपासण्याच्या दृष्टीने – 'अल्बर्ट एडवर्ड हॉस्पिटल', ' अहिल्याबाई देशी दवाखाना', 'होमिओपॅथिक दवाखाना', 'टी. बी. सॅनिटोरियम' इत्यादी आरोग्य केंद्रांची निर्मिती केली. नागरिकांच्या आरोग्यावर वार्षिक रु. ७५,००० खर्च होत राहिले. कामगारांना संघशक्तीचा आदेश दिला. ' पहिला लोक संघ' मध्ये संघटनानिर्मितीची प्रेरणा देताना राजर्षी शाहूनी म्हटले आहे, "ऐक्य, परस्पर प्रेम, विश्वास व चिकाटीने सतत प्रयत्न ही आमची शस्त्रे असली पाहिजेत. ( यापुढे ) बहुजनसमाजाच्या मताप्रमाणेच कारभार चालणार, अल्पसंख्याकांची सत्ता कमी होणारच. ते अटळ आहे. आपणासही असेच अधिकार मिळविले पाहिजेत. त्याकरिता स्वार्थत्याग पूर्वक सतत नेटाने प्रयत्न केले पाहिजेत ... ... येथे ( म्हणजे हिंदुस्थान देशात ) इंग्लंडप्रमाणे मजुरांचे संघ झाले पाहिजेत व सर्वास आपले हक्क काय आहेत, हे कळले पाहिजेत. भांडवलवाल्यांत ब्राह्मण व वैश्य वृत्तीच्या लोकांचा भरणा विशेष आहे. त्यांना दाबात ठेवल्याशिवाय मजूरांची उन्नती होणे कठीण आहे. मजूरदार या शब्दात कमीपणा नाही. हक्क काय आहेत ते कळले पाहिजे. ते समजाऊन घ्या." असे आवर्जून सांगणारे शाहू छत्रपती जनतेची स्वातंत्र्याची मागणी केव्हा ना केव्हा तरी वर येणार हे जाणून होते. एवढे स्वातंत्र्य वगळून बाकी सगळे हक्क जनता मागेल, तेव्हा जनतेला ' स्वराज्य दान'करण्याच्या दृष्टीने मनात त्याबाबत काहीही विचार करण्याचे कारण नाही, एवढे का राजर्षी दूधखुळे थोडेच होते ? त्या दिशेने त्यांची सक्रिय तयारीही दिसते. राजर्षींच्या ह्या नीतिमान दृष्टीचे; जनहितकारी हितबुद्धीचे लक्षण अनुकरणीय आहे.

शाहू छत्रपतींच्या आर्थिक गुंतवणुकीत शिक्षणविषयक मानवी गुंतवणुकीला विशेष महत्त्व आहे. ' शिक्षण स्वराज्यासाठी ' मध्ये राजर्षींनी शिक्षणासंबंधी म्हटले आहे, " शिक्षणाशिवाय कोणत्याही देशाची उन्नती झालेली नाही. अज्ञानात बुडून गेलेल्या देशात उत्तम मुत्सद्दी व लढवय्ये वीर कधीही निपजणार नाहीत. " साहजिकच अवती–भोवतीच्या सर्वंकष सामाजिक, धार्मिक, आर्थिक विषमतेच्या, दारिद्र्याच्या, अज्ञानाच्या सर्वगामी युद्धातील शिक्षण हे प्रभावी हत्यार असल्याच्या प्रखर आणिवेने शाहू छत्रपतींनी ते परजले आहे. परजताना ज्यांना नाही त्यांना ते मिळवून देण्याची तरतूद राजर्षींनी

केल्याचे आढळते. त्यासाठी शाहू महाराज तर सदैव 'दक्ष' स्थितीत होते. शाहू छत्रपतींची शिक्षणविषयक चळवळ तीन पायांवर उभी होती :

१. शिक्षणविषयक सोयीसवलती, शिक्षणासंस्थांची निर्मिती, शिक्षणसंस्थांना मदत, शिक्षणविषयक निरनिराळ्या उपक्रमांचे संयोजन इत्यादी उपलब्ध करून देणे;

२. विविध जातिजमातींसाठी विद्यार्थी वसतिगृहांची सोय करुन शिक्षणाच्या प्राप्तीचे मार्ग सुकर करणे, वसतिगृहयुक्त शिक्षणाला उत्तेजन देऊन जातिभेदासारखी कोळिष्टके झाडून काढणे; आणि

३. सामान्य माणसाच्या मनामध्ये शिक्षणाविषयी अभूतपूर्व ज्ञानलालसा निर्माण करून, त्याच्या अनेकविध मागासलेपणाला सुरंग लावणे;

म्हणजे शाहू छत्रपतींची शिक्षणविषयक चळवळ ही एकप्रकारची विराट मोहिमच होती. समाजाची जुनी व कालबाह्य झालेली घडी संपूर्णतया बदलण्यासाठी शाहू छत्रपतींनी शिक्षणाची दीर्घ पल्ल्याची वाटचाल आरंभिली. अस्पृश्योद्धाराचे विराट कार्य केले· भटी धर्मावर आघात करणारा वेदोक्ताचा लढा लढविला. त्यामुळे आधुनिक महाराष्ट्राचा इतिहास शंभर वर्षांनी पुढे गेला.

कुठलाही समाज जादूच्या कांडीने बदलत नसतो, तर मन, श्रम आणि बुद्धी यासह प्रज्ञा, प्रतीती नि प्रबोध इत्यादींनी पालटत असतो; त्यासाठी उताविळ निखालस कुचकामाची असते. प्रबळ इच्छाशक्तीच्या रगेल शाहू छत्रपतींनी दमदारपणे सगळ्या चळवळी चालवल्या त्यामागे सर्वंकष विषमतेच्या दारिद्र्याच्या व अज्ञानाच्या सर्वगामी युद्धातील शिक्षण हे एक कार्य व तदविषयक प्रयत्न हे एक प्रबळ, प्रभावी आणि प्रखर हत्यार आहे, ही दृष्टी होय. त्यादृष्टीमुळे आधुनिक महाराष्ट्रातील अनेक संस्थोपसंस्थांचीउभारणी झाली.

या सगळ्या संघर्षात राजर्षींनी एक विचार केला. तो हा की, 'आपण पुढे कसे जाऊ?' केवळ टीका करीत बसू तर उठण्याची असेल नसेल ती शक्तीही गमावून राहू. केवळ दुसऱ्याचे दोषच काकदृष्टीने टोकरत बसू तर असलेल्या थोड्याफार गुणांनाही गंज लागून निकामी ठरू. मिरासदारीच्या वल्गनाच करीत राहू तर मिरासदारांच्या दारातले श्वानच बनून बसू. प्रगतीसाठी नकारात्मक उपाय त्याज्यच असतात. काही मर्यादेपर्यंत ते फलदायी वाटले तरी ते तसे नसतात. त्यासाठी आपल्याला कोणते गुण हवे आहेत आणि त्याची वाढ कोणत्या रीतीने करणे शक्य व इष्ट आहे हे जाणणे जरुरीचे आहे. ते जाणून

ते कसे निर्माण करता येतील, ह्याचा शोध आवश्यक आहे. शाहू छत्रपतीनी विविध चळवळींच्या संदर्भात 'आपण पुढे कसे जाऊ ? ' चा शोध घेतला; आणि पुढेच जाण्याची वाट चोखाळली. मागे त्यांनी पाहिलेच नाही. खरे तर, बहुसंख्य विचारवंताना प्रश्न 'पोज्' करण्यामध्ये रस असतो. पण प्रश्नांपेक्षा त्यांचे प्रयोग हे अधिक बोलके ( Instructive ) असतात. सिद्धांत । प्रश्न अपेक्षित काय आहे हे सांगतात. प्रयोग प्रत्यक्ष सिद्धीची मायाच सादर करतात; आपण मागे किंवा पुढे किती राहू–जाऊ याचा प्रत्यक्ष पाठ देतात. शाहू छत्रपतींनी असे प्रयोग केले. ' He created an ideal, a type and a method which have profoundly influenced the nation and still prersist ' असे सर रिचर्ड लिव्हिंगस्टोनने ' Some Tasks for Education ' मध्ये आरनोल्ड बद्दल म्हटले आहे. शाहू छत्रपतींच्या–बद्दलही तेच म्हणता येईल. राजर्षींनी परिणामस्वरूप शास्त्रे वापरून देशाला जागे ठेवले, सुसंस्कृत बनविले. सुसंस्कृत राष्ट्राचा अर्थ पोटभर जेवणारे, अद्यावत् घरादारांतून राहणारे, विपुल करमणुकीच्या साधनात मग्न असणारे राष्ट्र असा नव्हे. संस्कृतीचा संबंध मूल्यभावनेशी निगडीत असतो आणि मूल्य–भावना ( sense of values ) दैनंदिन व्यवहारातून–चारित्र्यामधून दर्शित व्हावी लागते. ती सर्व थरावरती पसरलेली असावी लागते. अन्यथा राष्ट्र अंध बनते. शाहू छत्रपतींनी राष्ट्राला डोळस करण्याचा,, ठेवण्याचा प्रयत्न केला. त्यामुळे महाराष्ट्रात जागोजागी सामाजिक समतेच्या आणि क्रांतीच्या पुरोगामी विचारांची शक्तिशाली केंद्रे निर्माण झाली. मक्तेदारीकडून सार्वजनिकतेकडे प्रवाहत जाणाऱ्या शिक्षणाच्या गंगेने महाराष्ट्र–देशाचा चेहरामोहरा बदलून टाकला.

## लोकशाही जीवनदृष्टीचे आधार

शाहू छत्रपतीनी शिक्षणप्रसार, कृषि औद्योगिक विकास आणि सामाजिक-धार्मिक सुधारणा या तीन प्रकल्पांमधून लोक जागृत आणि त्यांचेद्वारा सर्वांगीण स्वातंत्र्याचे जागरण केले. माणसांमाणसांमधील भेद कमी करणे आणि एकसंध समाजाची निर्मिती हा या प्रयत्नांमागील मुख्य धागा होता. अस्पृश्योद्धार हे त्यातले एक साधन होते. तशी अस्पृश्यता ब्राह्मण–मराठे किंवा जैन–लिंगायत-मराठे यांच्यामध्ये होतीच पण या सर्वांची मिळून महार–मांगासंबंधीची अस्पृश्यता कितीतरी तीव्र होती. चिवट आणि प्रखर होती. तिचे प्रकार, पद्धती आणि तीव्रता दाहक होती. त्यास शह देणाऱ्या म. फुले, महर्षी शिंदे, समाजभूषण बापूसाहेब माटे, डॉ. आंबेडकर, महात्मा गांधी अशा अनेक ज्ञात–अज्ञात प्रहारकांमध्ये शाहू छत्रपतींचा अग्रहक्क विशेष स्वरूपाचा आहे. राजर्षींनी अस्पृश्योद्धाराशी

संबंधित प्रश्नांची चर्चा करताना ' रिलिजस ब्युरॉक्रसी ' मध्ये म्हटले आहे : " सर्व जातीच्या पुढाऱ्यांना माझे सांगणे आहे की, आपली दृष्टी दूरवर ठेवा, पायापुरतेच पाहू नका. जातिभेद मोडणे इष्ट आहे. जरूर आहे. जातिभेद पाळणे हे पाप आहे. देशोन्नतीच्या मार्गातील हा अडथळा आहे. हा दूर करण्याचे प्रयत्न जोराने केले पाहिजेत. ही जाणीव पक्की ध्यानात ठेवून मग ह्या दिशेचा प्रयत्न म्हणून जाती परिषदा भरवा. जातिबंधन दृढ करणे, जातिभेद तीव्र होणे हा परिणाम ह्या परिषदांचा होऊ नये ही खबरदारी घेतली पाहिजे " या व्याख्यानामध्येच छत्रपतींनी ' जातिभेद हा स्वाभाविक आहे व तो पाळणे व रोखणे समाजाच्या उन्नतीस आवश्यक आहे ' असे प्रतिपादन करणाऱ्या उच्च दर्जाच्या मंडळींचा आणि ' जातिभेद नसावा अशा मताचा असूनही जातिमत्सर वाढवीत असल्याच्या; स्वतःवर केल्या जाणाऱ्या मिथ्या आरोपाचा खरपूस समाचार घेतला आहे' आणि अस्पृश्यतेसारखा प्रश्न सोडविण्यासाठी उभयपक्षी काय केले पाहिजे म्हणजे परिस्थितीचा आणि प्रश्नांचा गुंता उकलू लागेल याचे दिग्दर्शन केले आहे. १५ एप्रिल, १९२० रोजी नासिकच्या श्री उदाजी मराठा विद्यार्थी वसतिगृहाच्या इमारतीची पायाभरणी समारंभाच्या निमित्ताने केलेल्या भाषणात, राजर्षींनी उपायांचे हे सूतोवाच केले असून त्यामधून वरिष्ठ–कनिष्ठ यांच्यामधील संघर्षाची भित कमी होण्याचा, ते निकट कसे येतील याचा, जगाच्या इतिहासाने अनुभव म्हणून जपून ठेवलेला मर्मबंध विशद केला आहे. राजर्षी सांगतात, " जपानातील सामुराई लोकांनी आपला जन्माने प्राप्त झालेला उच्च दर्जा सोडून दिला म्हणून जपानमध्ये ऐक्य होऊन त्या देशाची उन्नती झाली. त्याप्रमाणे ब्राह्मणांनी जातिमत्सर सोडल्याशिवाय आमच्या लोकांची उन्नती होणार नाही. सर्व जातींना हात देऊन त्यांना आपल्याबरोबर घेऊन सर्वांची स्थिती सुधारणे हे काम क्षत्रियांनी अवश्य केले पाहिजे. ते त्यांचे कर्तव्य आहे. ब्राह्मण लोकांना जन्मसिद्ध धार्मिक बाबतीत श्रेष्ठपणा आहे. त्याच्या जोरावर त्यांची एक ' धार्मिक ब्युरॉक्रसी ' च झाली आहे. ही ब्युरॉक्रसी मोडल्याशिवाय कधीही देशोद्धार होणार नाही." माजलेल्या वरिष्ठांनी कुचंबलेल्या कनिष्ठांना हक्कांचे प्रदान करण्याची आणि नडलेल्यांनी हवे तर स्वतःचा विकास स्वतः करून घ्यावा या वृत्तीची राजर्षींनी केलेली फोड 'राजकारण' करणाऱ्या संपादक दामले यांना कळली नसली तरी परिस्थितीशी असलेले त्यांचे अविच्छेद्य नाते संपत नाही. संयुक्त महाराष्ट्राच्या निर्मितीनंतर प्रख्यात अर्थशास्त्रज्ञ कै. धनंजयराव गाडगीळ आणि सृजनशील समाजवादी नेते एस्. एम्. जोशी यांनी तांत्रिकदृष्टीने ' स्वक्रिय ' असलेल्या ब्राह्मण समाजाला अशीच सूचना केली होती. इतिहासाचे सूत्र असे हे वाहत असते. म्हणून ३० मे, १९२० रोजी अ. भा. बहिष्कृत समाज परिषदेच्या

अध्यक्षपदावरून शाहू महाराजांनी दिलेल्या भाषणात पुनः एकवार बजावले आहे, "... ज्या जातीच्या लोकांना हलके मानले जाते, त्यांनी कितीही प्रयत्न केले तरी, त्यांचा तादृश उपयोग होणार नाही. याकामी उच्च म्हणविणाऱ्या जातींकडूनच सुरूवात झाली पाहिजे. प्राचीन काळापासून वंशपरंपरागत उपभोगिलेले वर्चस्व त्यांनी सोडून देण्यास तयार झाले पाहिजे. या पवित्र स्वार्थत्यागाचाच कित्ता त्यांनी सर्वास घालून दिला पाहिजे. जपानातील जातिभेदाचा बिमोड होण्यास मोठे कारण उच्च वर्गाच्या सामुराई लोकांनी सुरूवात केली हेच आहे. तसे झाले नसते तर जपानची स्थिती सुधारली नसती. जातिभेद मोडण्याचे प्रयत्न केवळ खालच्या वर्गाकडून सुरू झाल्यास त्याचे परिणाम अनर्थावह होण्याचा संभव आहे. तेच काम उच्च म्हणविणाऱ्या लोकांकडून प्रथम झाल्यास हे स्वार्थत्यागाचे उदाहरण इतर सर्व जातींना बोधप्रद होईल. जोपर्यंत असे होत नाही तोपर्यंत, हल्लींच्या स्थितीचा उपयोग करुन वैमनस्य न वाढविता प्रत्येक जातीने आपली सुधारणा करून, आपला दर्जा वाढवून घेण्याचा व वरच्या पायऱ्यावर चढण्याचे प्रयत्न चालूच ठेविले पाहिजेत. वरील जातींनाही जरूर तर काही पायऱ्या खाली येऊन त्यांना हात देवून; वर घेतले पाहिजे. असे झाले म्हणजे सुरळीतपणे व सलोख्याने हे जातिभेद मोडण्याचे बिकट काम सिद्धीस जाण्याचा संभव आहे आम्हासारख्या मराठ्यांनासुद्धा जात मोडून एकी करण्यास भाग पाडले पाहिजे." याचा अर्थ निश्चित धोरणाने माणूस मुक्त करण्याचा राजर्षींचा प्रयत्न होता. म. फुल्यांची ही दृष्टी होती. त्यात सत्यान्वेषण आणि आत्मपरीक्षण दोन्हीही होते. त्यातूनच शाहू छत्रपतींनी भिन्न भिन्न जातींचे शरीरसंबंध व्यापक प्रमाणावर व्हावेत असे सांगितले. रोटीव्यवहाराची आवश्यकता प्रतिपादिली. धार्मिक ग्रंथांचे पठण करणाऱ्या व्यावसायिक ब्राह्मण 'भटजी' ना बोलावण्याची गरज नसल्याचे आग्रहाने सांगितले. धार्मिक विधींसाठी अशा व्यावसायिक ब्रह्मवृंदांचे साहाय्य कशासाठी घ्यायचे असा प्रश्न केला. या सर्वामुळे श्रेष्ठत्वाची भावना जोपासली जाते आणि न्यूनत्वाच्या भावनेने माणूस खंगतो; असे शाहू छत्रपतींना वाटते. हे वाटणे नुसते वाटणे नाही तर तो सांस्कृतिक स्वातंत्र्याचा आणि सामाजिक लोकशाहीचा विचार आहे. त्यामध्ये, अविकसित आहेत त्यांना विकसित करण्याचा, ज्यांच्यासाठी समृद्धीच्या महाद्वाराची कवाडे नेहमीच बंद राहिली अशांच्यासाठी ती खुली करण्याचा सरळ तत्वाचार आहे, हीण काहीच नाही. टींका व्हावी किंवा टीकेच्या ज्वाळात सतत उभे केले जावे असे त्यात गैर काय आहे? त्यामुळे 'ब्राह्मणद्वेष' वगैरे खोटे दोष चिकटविण्याचे प्रयोजन तरी काय? राजकारणकर्त्यांनी ते करू नये, असे राजर्षींनी आग्रहपूर्वक सांगितले आहे. 'पुढारी म्हणविणाऱ्यास नम्रपणे' शाहू छत्रपती सांगतात:
"आम्हाला आपण रांगू दिले नाही व पडतझडत उभेही राहू दिले नाही तर आम्ही

कायमचे पंगू होऊ, याकरिता आपण आमच्या रांगण्याचे व उभे राहाण्याचे कौतुक करा व उत्तेजन द्या. प्रतिबंध करू नका. आमची धडपड आमच्या अंगी शक्ती येण्यासाठी आहे. आपल्या द्वेषामुळे आम्ही ती करितो; ही आपली समजूत चुकीची आहे." एक धट्टाकट्टा आणि एक आंधळापांगळा या दोघांची रेस होऊ शकत नाही. त्यासाठी दोघेही समबल किंवा समबलाच्या रेषेत असावे लागतात. थोडेफार समबल नसले तरी स्पर्धेची भावना; ईर्षेची वृत्ती आणि स्वाभिमानाची झलक इत्यादी गोष्टीतून भासणारी उणीव भरून काढू शकतात. पण जिथे तुलनेला वावच नाही तिथे स्पर्धेची शक्यता तरी कशी राहणार? समाज कसा उभा राहतो हे 'समाजशास्त्रज्ञ' छत्रपतीनी समाजशास्त्र येणाऱ्यांना शिकविले. हे शिकविणे सोपे नव्हते. ज्याला मुळातच येत नाही त्याला शिकविणे हे आपल्या कह्यात असते पण ज्यांना येते त्यांच्या दृष्टीने गोष्ट अवघड असते. अहंता, मानपान, श्रेष्ठकनिष्ठता असे कितीतरी ताण-तणाव त्यात गुंतून पडलेले असतात, आणि बारीकशा हेलकाव्यानेही त्यांना नको ते रंगरूप मिळण्याची शक्यता असते. पण शाहू छत्रपतींनी उच्चवर्णिय, ब्राह्मणेतर, अस्पृश्य साऱ्यांनाच प्रसंगी आंजारूनगोंजारून तर प्रसंगी ठणकावून, ह्या वाटा शोधल्या. ह्या वाटा शोधल्या त्या दीनदुबळ्यांना माणुसकीचे हक्क मिळवून देण्यासाठी. माणसाची प्रतिष्ठा त्याला पात्र व्हावी म्हणून. इतर अनेक गोष्टींप्रमाणेच जस्टिनियन व सालॉनप्रमाणे त्यानी कायद्यात सुधारणा केल्या. त्यामागची धारणा, 'थांबा आणि वाट पहा' अशी, नव्हती तर 'चाला आणि करून घ्या' अशी होती. सर्वत्र सामान्यांसाठी सावध योजकता होती. भारतासारख्या गरीब लोकांच्या संपन्न देशात अशी सावधानतेची नितान्त निकड असते. विकासशील देशातील सत्तेच्या महत्त्वाची जाणीव असलेल्या शाहू छत्रपतींच्या ठायी तिचा प्रकर्ष विशेषत्वाने मिळतो. त्यामुळेच त्यांना समाजाच्या अप्रकट दुःखाची चाहूल लागली. आणि त्यांच्या निवारण्याच्या उद्योगाला ते लागले. अनुल्लंघनीय अडचणींना सामोरे जाऊन त्यांनी अनेक गोष्टी इतिहासात नोंद व्हाव्यात अशा पद्धतींने हयातभर निभावून नेल्या.

राजर्षी शाहूनी सर्वसाधारण माणसाला संधी उपलब्ध करून देऊन 'संधीचे तत्त्वज्ञान' रुजविले. त्याद्वारे विराट जनसमूहाचे व्यापक शिक्षण करणारे, 'जेवला कोण, राहिला कोण' हे कळवळयाने पाहणारे राजर्षी लोकोत्तर लोकाग्रणी होते. त्यामुळे राजर्षींनी व्यापार, क्रीडा, कला, शिक्षण इत्यादी समाजजीवनाच्या अनेक व्यवहारांत चैतन्य निर्माण केले. सामान्य माणसातून रुजलेले राजे-राजर्षी, सामान्य माणसाला आपले हक्क, कर्तव्य आणि प्रतिष्ठा यासाठी सतत जागे ठेवण्यास कारण झाले. या त्यांच्या आणि त्यांच्या करवी जनसामान्यांत होणाऱ्या जनजागरणात राजर्षींच्या कार्यकर्तृत्वाची प्रेरणा आहे. या प्रेरणेत जीवन उभारणीची मूलभूत सूत्रे आहेत. त्यांचे दिग्दर्शन

पल्लेदार नसेल, मात्र त्यावर कार्यांने उभारलेले तत्त्वज्ञान अनेक गोष्टींची नोंद करणारे आहे: विज्ञाननिष्ठ दृष्टी, संघटना बांधणीचा विचार, संस्थात्मक जीवनाचा आधार अशा अनेक गोष्टींमुळे राजर्षी जनमानसात रुजून राहिले आहेत. केवळ वादळी व्यक्तिमत्त्वामुळे किंवा उदात्त–उत्कट कथांमुळे नव्हेत. राजर्षीचे ते एक अंग आहे, ही गोष्ट खरीच, पण इतिहास अशा अंगांचा ' गोष्टी ' म्हणून उल्लेख करतो आणि त्यापलिकडे उसळून नव्या दिशेने क्षितिजे कोण कापीत गेला, कातीत गेला नि जागोजागी अवघ्या अनाथांसकट सर्वांगीं जागविणारी ' ज्ञानदीप गृहे ' कोण बसवित गेला, याचा निर्भीडपणे शोध घेतो. सत्याला साक्षी राखणारा इतिहासाचा ज्ञानरथ अशीच वाटचाल करीत असतो. राजर्षी शाहू, अशा वाटचालीतील एक पाईक आहेत. त्यामुळेच राज्यात काय सुधारणा करायच्या ते मनाशी निश्चित करून त्याचे मार्ग राजर्षींनी चाणाक्षपणे अंमलात आणले. त्यासाठी शब्दांचा वापर कमी केला, कृती–धृतीवर जोर दिला. काय करणे शक्य त्याचाच अंदाज घेतला आणि तेवढ्याचीच अचूक उचल केली. कार्यवाहीचे सूत्र पकडले. भरघोस आश्वासन, शब्दबंबाळ व्याख्याने, आश्वासनांचा अशोचनीय भंग, तरीही सभ्यतेचा बुरखा ( आजच्या भ्रष्ट लोकशाहीची ही एक रीत! ) अशा दुर्गूणांना राजर्षींनी चार हात दूर राखले. राजे म्हणून स्वत:च्याच उद्धाराचा वसा घेणे आणि जनतेची भूल–भुलावण करून तिला ' कोरडी ' ठेवणे या दुर्गूणांना राजर्षीनी बाजूला टाकले आणि थेट जनतेशी दळणवळण साधले. त्यामुळे जनता आणि राजर्षी यात अंतराय उरला नाही. जनतेचे मन समजावून घ्यावयाचे आहे, तिचे जीवन पहावयाचे आहे; तिच्यात आणि आपल्यात काही कसनुसेपण येते आहे, जनतेतील शांततेचा आणि प्रक्षोभाचा अर्थ जाणून घ्यावयाचा आहे, अशा एक का अनेक गोष्टी; राजर्षी त्यासाठी दलालाचे–मध्यस्थाचे–साहाय्य घेत नाहीत. सरळ उठतात आणि जनतेत उभे राहतात. कुठे जावून पाणी पितात, कुठे भाकरी खातात, कुणा म्हातारीची ओझ्याची बुट्टी उचलून तिच्या डोक्यावर देतात. हरिजनाला गिऱ्हाईक मिळावे म्हणून त्याच्या हॉटेलात चहा पितात. कुराण केवळ मुसलमानापुरतेच राहू नये, ते मराठी वाचकांनाही समजावे म्हणून त्याच्या भाषांतरावर २५,००० रुपये खर्च करतात, जनावरांची पैदास चांगली निपजावी म्हणून शेतकऱ्यामागे लकडा लावतात. राजर्षीचे मेहुणे–श्रीमंत खानविलकर–पट्टेवाल्याने आपल्या पायातील बूट काढले नाहीत म्हणून त्याला मारतात–पिटतात आणि नोकर, त्याचा अपमान वाटून महाराजांच्याकडे राजीनामा घेऊन येताच त्याच्या स्वाभिमानी वृत्तीबद्दल त्याला बढती देतात. काडप्पाच्या मठाच्या माळावर ससाच्या शिकारीसाठी निघाले असता भुकेल्या मोतद्दारास खाशा स्वारीसाठी आणलेले फराळाचे देतात आणि ' तुम्ही सर्वजण खाऊन मग या, तोपर्यंत

आम्ही पुढे जातो' असे सांगतात, उलटलेली बग्गी सरळ करतात, कोचमनला दवाखान्यात नेतात. त्याच्या जखमा धुतल्या-पुसल्या जाईपर्यंत तिष्ठत राहतात. सोनतळीवरच्या पत्र्याच्या बंगल्यातील शेडमध्ये झोपतात. शिकारीतील माणसाइतकीच शिकारीतील घोडी, उंट, कुत्री या जनावरांचीही काळजी घेतात. तिकोटचाच्वा जंगलात सित्या बेरडाकडचे कोरड्यास खातात. असे सारखे सुरू आहे. त्याला बंधन म्हणून कसले नाही; गणती म्हणून कसली नाही. लोक शाहू महाराज 'राजे' आहेत हे विसरून गेले आहेत, आणि शाहू महाराजांनी आपले राजेपण टाकून लोकांना 'राजे' केले आहे. थेट दळणवळणाची ही पद्धत—मुक्त, विमुक्त पद्धत— राजर्षींच्या व्यक्तिमत्वाला सोनेरी किनार ठरली आहे. त्यामुळ घडले आहे ते असे की, शब्दाने काही पटवून देण्याचा प्रश्नच उपस्थित झालेला नाही. दुराग्रहांचे दंडकारण्य आणि मतभेदांचे मोहोळ कृतीनेच निपटले गेले आहे.

## 'लोकशोधा'साठी 'डायरेक्ट ॲप्रोच'

तसे हे दळणवळण-हा 'डायरेक्ट ॲप्रोच' - दिसतो तितका सोपा नाही. यात उभयपक्षी काही घ्यावे-द्यावे लागते; त्यासाठी राजर्षींना राजेपण टाकावे लागले आहे. आपल्या थाटामाटाने नव्हे तर जनतेच्या अंगारंगाने वावरावे लागले आहे. 'अरे, मी तर तुमचाच; तुमच्यातलाच. तुम्ही मला आपला मानला नाही, समजला नाहीत तर मला कुणीच आपला मानणार नाही, समजणार नाही' असा धोशा जणू राजर्षींनी लावला आहे. राजेपणाच्या दबावाने दूर उभ्या राहणाऱ्या जनतेला त्यांनी आपल्याला 'आपले' म्हणायला लावले आहे. राजर्षींनी जनतेला आपले म्हटलेच आहे, तेव्हा तो प्रश्न नव्हता. पण जनतेने ते मानायला हवे होते. त्यात काही अडचणी होत्या: शिक्षणाचा अभाव, सामाजिक दर्जा, राजेपणाची भीती अशा अनेक अवघड बाबी त्यात होत्या. त्याची सोडवणूक राजर्षींनीच स्वतःच स्वतःच्या अनुभवाने केली आहे. त्यासाठी सामान्य जनतेतील संचार, राजेपणाची वस्त्रे बाजुला ठेवून केलेला 'भणंग' संचार—आणि जनतेच्या जीवनात घुसून त्याच्या बोलभाषेत केलेला व्यवहार इत्यादींचा राजर्षींनी सुरेख वापर केला. राजर्षी ज्ञानवंत होते. ते इंग्रजी, संस्कृत आणि मराठी उत्तम बोलत असत. सर्वसामान्य जनतेशी बेळगावी शुद्ध तुपातील बोलणे काय कामाचे? त्यामुळे अंतरच पडणार. राजर्षींना व्यापक हिताच्या संदर्भात किरकोळ गोष्टीवर अंतर पडायला नको होते. त्यांना अंतरे बुजवीत एकसंध समाज बांधायचा होता. अनपढ आणि अनगड समाजाचे भवितव्य उजळावयाचे होते म्हणून जे जे साधन आपल्या मतप्रचारासाठी उपयुक्त होईल ते ते राजर्षींनी बेमालूम कौशल्याने वापरण्याचा परिपाठ ठेवला. त्यामुळे

दुरावा विरला; जवळिक उपजली. विश्वासाला विश्वास मिळाला. पायावर चक्र कोरलेल्या माणसाने लोकशाहीतील लोकदर्शनाचे–लोकशोधाचे–एक विलक्षण प्रकरण हातावेगळे केले आहे.

या रंगरुपात, शब्दप्रामाण्यापेक्षा कृतिप्रामाण्याला महत्त्व आहे हे स्पष्ट आहे. त्यासाठी खास आयोजन, विशेष प्रयत्न असे काही नाही. मात्र मनाशी दृढ निर्धार आहे, घट्ट समजूत आहे; त्या संदर्भात जाता जाता पण प्रकर्षाने आयोजन आहे.. अवतीभोवती अनेक मंडळी आहेत, पण त्यांना त्यांचा सुगावा नाही, पण राजर्षी काही घडवताहेत. त्यांच्या बोलाकृतीतून काही ना काही होते आहे, हे विशेष आहे. सर्वसाधारण व्यवहार शांत असला तरी राजर्षींचे सावध मन पेटते आहे. असे त्यांच्या जीवनातील बारीकसारीक घटना व त्या घटनांना आकार देण्याची राजर्षींची कुवत आग्रहाने दाखवितात. राजर्षींच्या मनात युद्धसदृश घटना घडताना दिसतात. त्यामध्ये विचार, आचार, प्रचार व कायदा यांचा संमेळ आहे. हा संमेळ धैर्य, चातुर्य, बुद्धी, न्याय, करुणा, आस्था, पारख मुत्सद्दीपणा आणि अष्टावधान इत्यादी मानवी जीवनातल्या उत्तम गुणांनी परिवेष्टित आहे. त्यात राजपुरुष आणि लोकनेता दोन्हीही अंतर्भूत होतात. महाराष्ट्राच्या धार्मिक नि सामाजिक इतिहासाच्या पुर्नघटनेत असे वैभव दुर्मिळ आहे; दुर्लभ आहे.

## लोकसंपर्काच्या सहजरीती

लो. टिळकांनी ‘ गीतारहस्य ’ च्या अर्पण पत्रिकेत, भगवंताचा उल्लेख ‘ श्रीशाय जनतात्मने ’ या मार्मिक शब्दांनी केला आहे. त्याचा अर्थ, “ श्रीचा म्हणजे सर्व संपत्तीचा ईश, पण तो जनतात्मा ! ” असा आहे. हा सुखी, संतृप्त आणि समृद्ध जनतात्मा लोकशाही जीवनदृष्टीचा आधार आहे. लोकशाहीचे ते प्रमेय आहे. छत्रपती शिवाजी महाराजांनी सुमारे साडेतीनशे वर्षांपूर्वी ते कृतीधृतीने उद्घोषिले. त्यानंतर सुमारे दोन शतकांनी त्याचे नेमके मर्म समजाऊन घेऊन ते आचरण्याची मनोबुद्धी आणि कसब राजर्षी शाहूंनी दाखविले. हा ‘ लोकधर्म ’ सामाजिक अभिसरणाचे गतिचक्र गतिमान ठेवतो.

या साऱ्या धडपडीतून शाहू छत्रपतींच्या समाजप्रबोधनाच्या सर्वंकष क्रांतीचे एक रूप दिसते. लोकजागृतीतून लोकदडपण, त्यातून सामुदायिक संघटन, अपरिहार्य परिणाम स्वामित्वाचा त्याग आणि पुर्नस्थापना । नवनिर्माण, या दिशेने वाटचाल हे ते रुप होय.

राजर्षींच्या अनुयायांना याचे कितपत आकलन झाले होते याविषयी इतिहास साशंक दिसतो, पण शाहू राजांनी त्या दिशेने कार्य केले असे इतिहास सांगतो.

राजर्षी शाहूंच्या भाषणांतून त्यांची वाहणारी व्यक्तिरेखा पाहिली असता छत्रपती क्रियावान पंडित होते. व्याख्यानांतून व्यक्त केलेला प्रत्येक विचार त्यांनी कृतीने सिद्ध केलेला आहे हे सहज दिसते, किंबहुना त्यांनी आधी कृती केली आणि मगच व्याख्याने दिली.. कृतीने आणि उक्तीने आपले सामाजिक क्रांतिकारकत्व त्यांनी सर्वार्थाने सिद्ध केलेले आहे.

राजर्षींच्या या ' क्रांतिसूक्ता ' स आजच्या स्वातंत्र्योत्तर काळातील संदर्भ काय, याचाही विचार केला पाहिजे. महाराजांनी ज्यासाठी निर्धाराने झुंज दिली त्या गोष्टी आज पूर्णांशाने साकार झालेल्या नसल्या तरी त्या दिशेने फार मोठी प्रगती झाली आहे हे नाकारता येणार नाही. बहुजन समाजामध्ये शिक्षणाचा प्रसार वेगाने होत आहे. त्यामधील अनेक कर्तृत्वसंपन्न व्यक्ती राजकारणापासून शिक्षणापर्यंतच्या सर्व क्षेत्रांत आपल्या कृतीधृतीने चमकत आहेत. तथापि आपला समाज एकरस आणि एकजीव व्हावा हे राजर्षींचे स्वप्न तेवढ्या प्रमाणात साकार व्हायचे आहे. वाट मोठी आहे; हिमतीने चाल जरूर आहे. राजकीय सत्तेवरून ' ब्राह्मणी वर्चस्व ' कमी झाले असले तरी समाजाच्या प्रत्येक स्तरावर नवीन ब्राह्मण्याची प्रवृत्ती तोंड वर काढताना दिसत आहे. तीही तितकीच हेकट आहे. कुळीचा अभिमान संपलेला नसून वाढता आहे. महाराष्ट्रातील तीस लाख आदिवासींच्या प्रश्नाला आता कुठे तोंड फुटले आहे. किती अज्ञातांचे जीवन बरबाद होत आहे त्याला गणतीच नाही. पक्षोपक्षांचे व स्वतंत्र असे कितीतरी ज्ञात-अज्ञात कार्यकर्ते ठिकठिकाणी मोठ्या नेटाने लहानमोठ्या प्रश्नांची तड लावीत आहेत. बहुजन समाजाचे मोजके का असेनात पण लहानमोठे काही कार्यकर्ते हिमतीने राजकाज सांभाळीत आहेत. दुश्चिन्हे कमी नाहीत पण आशाही थोर आहे. राजर्षी शाहू छत्रपतींना अभिप्रेत असलेली सर्वंकष क्रांती पूर्णत्वाने अजून व्हायची आहे. ' श्रीशाय जनतात्मने ' ची प्रकर्षाने वानवा आहे. या साऱ्याचे तात्पर्य काय ते एवढेच आहे.

